माझी प्रेमळ बहीण

कै. सौ. द्वारकाबाई–सरस्वतीबाई भावे

हिच्या स्मृतीस

# पाझरांच्या कांठावरून

माझ्या कथा–वाङ्मयाचा हा चवथा संग्रह होय. मी लघुकथा–लेखक नाहीं. मी कथा–वाङ्मय लिहितों. लघुकथेच्या मंत्रतंत्राची कैंची तज्ज्ञांनीं बळकट बसवून टाकली आहे. मी त्या कैंचीच्या आसपासहि फिरकत नाहीं ! कथा बहुतांशीं खरी असली, तिच्या मूळ पिंडांतच कांहीं रस असला, वाङ्मयाच्या व कथनाच्या बळावर तो विशेष मधुर बनवितां आला असला आणि विशेषत: शेवटी वाचकांच्या भावना उल्हसित अथवा व्यथित होतील असें वाटलें म्हणजे ती कथा बऱ्यापैकीं तरी आहे असें मी समजतों. हें करतांना तंत्र जर आपोआपच साधत गेलें असलें तर बरेंच झालें असेंहि मला वाटतें. माझा अंदाज असा आहे कीं, देशोदेशीचे लेखक जों जों कथावाङ्मय प्रभूतपणें लिहूं लागतील, समाजांतल्या निरनिराळ्या थरांतील लेखक आपल्या हृदयाच्या व मनाच्या व्यापारांचा आविष्कार आवेशानें करूं लागतील तों तों तंत्राची ठराविक कैंची ढिली होत जाईल, आणि पुढचे पुढचे टीकाकार नवीं नियमनें सांगूं लागतील ! तोंपर्यंत सध्यांच्या टीकाकारांना व तंत्रविशारदांना आदरपूर्वक नमस्कार करून आपल्या योग्य त्या पदवीवर उभें रहाणें येवढेंच मला करतां येण्या-सारखें आहे.

पण, वर सांगितल्याप्रमाणें, मला एवढें मात्र वाटतें कीं, या कथा वाचतांना वाचकाच्या मनाला थोडा तरी झोका बसेल, त्याच्या भावना थोड्या तरी दोलायमान होतील, त्याला कोणी तरी ओळखीचीं माणसें भेटल्यासारखीं वाटतील, आणि क्षणभर तरी मनाचीं किल्मिषें झडून, शुद्ध आनंदाचा अनुभव त्याला येईल. एवढें झालें तरी पुष्कळ झालें. या कथा लिहितांना मला जें वाटलें तें वाचकांना वाटलें म्हणजे कथा बऱ्याच वठल्या असें ठरेल.

लहानपणच्या म्हणजे पूर्ववयांतील आठवणी आपल्याला फार असतात. आणि जों जों वयस्कर होत जातों तों तों मधल्या काळाचा लोप होऊन आपलें मन त्या वयांतील घटितांकडे जास्त जास्त जातें असा माझा तरी अनुभव आहे. मधल्या काळांत उद्दीपक, विचित्र, मनाला झोंबलेलें कांहीं घडलेलें नसतें असें नव्हे. नाना प्रकारचीं माणसें पुढें पुढेंच जास्त भेटलेलीं असतात; पण मन या वयांत त्या पूर्वीच्या जीवनाकडे, तेव्हांच्या मित्रांकडे आणि नातेवाइकांकडे जास्त जास्त वळतें. अर्थात् माझ्या अनेक कथा-वस्तू तेथून उचलेल्या आहेत. उपेक्षितांचे अंतरंग, अनामिका, आणि माणुसकीचा गहिंवर या माझ्या कथासंग्रहांप्रमाणें हाहि संग्रह वाचकांना पसंत पडेल असा भरंवसा आहे. या कथासंग्रहाची पहिली आवृत्ति प्रकाशनासाठीं माझे नवे प्रकाशक मित्र श्री. अनंतराव कुलकर्णी यांस दिली आहे. अर्थात् बाकीचे सारे हक्क माझ्याकडेच आहेत. श्री. अनंतरावांचा मी फार आभारी आहें.

ता. २०।९।५४ **श्रीपाद महादेव माटे**

# अनुक्रमणिका

# १

# त्यांच्या सौभाग्याचा बावटा

त्यांचें मूळ नांव सत्यभामाबाई असें होतें. पण त्यांच्या नात्याचीं आणि आसपासचीं सारी माणसें त्यांना सत्यंकाकू असेंच म्हणत. पुष्कळदां असें घडतें की, लहान मुलांच्या तोंडांतला शब्द मोठी माणसें उचलतात. त्याप्रमाणें वयानें पोक्त झालेले लोकसुद्धां काकूंना सत्यंकाकू अशीच हांक मारीत. सत्यंकाकूंचें सध्यांचें ध्यान कसें आहे, तें आपण मला विचारूं नका. तें पुढें आपोआप प्रकट होईल. पण त्या जेव्हां चाळीस–पंचेचाळीसच्या दरम्यान होत्या, तेव्हां त्या कशा दिसत ते सांगतों.

सत्यंकाकू खूप उंच होत्या. इतक्या की, कांहीं कांहीं वेळां गणूकाकांचा उल्लेख अनोळखी लोक 'त्या शेलाट्या बाईचा नवरा' असाच करीत. गणूकाकांच्या मानानें सत्यंकाकू खरोखर फारच उंच होत्या. अगदी विजोडच होता. पण पूर्वीच्या काळीं लग्नें फार लहानपणीं होत असल्यामुळें, पुढें कोण किती उंच होईल, याचा अंदाज सात आठ वर्षांच्या वयाला कसल्याही दूरदर्शी आईबापांनासुद्धां करतां येत नसे. सत्यभामा न्हातीधुती झाली आणि पुढें जी सरळत गेली, ती उंच व्हायची थांबेचना! गणू उंच होतां होतां थकला आणि थांबला. सत्यंकाकूंना मूलबाळ झालेंच नाहीं. नवससायास, देव–देवऋषी इत्यादि सारे प्रकार झाले; परंतु कोणीच पावलें नाहीं; आणि सत्यंकाकूंना हौस असली तरी मातृपदाचा लाभ त्यांना कधीं झालाच नाहीं. तथापि, आपण वांझ आहोत, ही कल्पना त्यांना शेवटपर्यंत भावली नाहीं. त्यांना वाटे की, 'गुरुचरित्रां'तल्या गोष्टीप्रमाणें आपल्या साठीच्या वयालासुद्धां दत्तात्रयाचा अनुग्रह होईल आणि घरांत पाळणा हलूं लागेल. परंतु त्यांची ही वासना कधीं तृप्त झाली नाहीं. त्या आपल्या मध्याच राहून गेल्या.

मूल नसल्याचा उदासपणा जरी त्यांच्या चेहऱ्यावर नेहमींच उमटलेला

असे, तरी त्यांची प्रपंचाची हौस कधीं मावळली नाहीं. हें हवें, तें हवें, हें केवढ्याला मिळतें, तें केवढ्याला मिळतें, असा त्यांचा हव्यास सारखा चाललेला असे. कपाळावर मोठा थोरला कुंकवाचा टिळा, हातांत काळ्या बांगड्यांचा कणकणाट, एक एक पांढुरक्या सोन्याची पाटली, आणि बाजरीपेक्षांही लहान मोत्यांची आजेसासूबाईपासूनची चालत आलेली एक कळकट नथ, हा सत्यंकाकूंचा नेहमींचा साज असे. सारें घर ओकें ओकें असलें तरी, काकूंच्या तोंडावर आशेची छाया मधून मधून झळकत असे. गणूकाका त्यांना नकळत त्यांच्याकडे पहात आणि मनांत म्हणत, ‘ हिला काय वाटतें आहे, कोणास ठाऊक ! पोर ना सोर, पण हिचा संसाराचा पिंगा काय चाललाय तो पहा. ’ पण सत्यंकाकूंनीं अजून आशा सोडली नव्हती. आणि त्या आशेच्या पोटींच, त्यांना हा उल्हास वाटत असे. न्हातीधुती झाल्यावर कितीतरी वर्षांनीं त्या अमकीला चार मुलें झालीं, आणि तमकीला सहा मुलगे झाले अशीं अनेक उदाहरणें सत्यंकाकूंच्या मनाच्या स्मरणवहीत लिहिलेलीं असत. आणि गणूकाका एखाद्या वेळीं कांहीं निराशेचें बोलूं लागले तर ती सगळी चोपडी त्या त्यांच्यापुढें उघडून दाखवीत.

गणूकाका आडव्या अंगाचे, ठेंगणे आणि बोजड दिसत. आपण देखणे आहों, असा त्यांचा समज असे. आणि त्या देखणेपणांत भर घालण्यासाठीं त्यांची कांहीं खटपट चालू असे. भिक्षुकीचा व्यवसाय—तेव्हां चार घरीं जावें लागे, आणि बायकापुरुषांत हिंडावें लागे,–तेव्हां यजमानांनीं निभ्रांत रहावें म्हणून साधीभोळी चर्या ठेवणें अवश्यच होतें; पण त्या साधेपणांत-सुद्धां बारकासा नखरा करण्याकडे गणूकाकांचा ओढा असे. ते दोन भुवयांत चोंचदार शेंदूर लावीत आणि घरीं एकटे बसलेले असले म्हणजे हातांत चिमटा घेऊन कपाळाच्या भोंवतालचे केस कमानीसारखे करून ठेवण्याचा त्यांना नाद असे. त्यांच्या बंडीच्या खिशांत एक लहानशी आरशाची डबीही असे. पण आपण फार नखरा करूं लागलों तर यजमानांच्या डोळ्यावर येईल अशी धाकधुक मात्र त्यांना नेहमीं असे. ते वर्णानें फार सुंदर दिसत. त्यांना पायांच्या शिरांचा वगैरे कसलाहि रोग नव्हता; पण त्यांनीं पायांच्या दोन्ही आंगठ्यांना चांदीची घट्ट वेढणीं बसवलेलीं होतीं.

चालतांना, त्यांचा होणारा मंद आघात आपल्या सौंदर्यांत भरच घालतो, असें गणूकाका समजत. यजमानकृत्याच्या वेळीं मंत्रादिकांचा मोठाच घडघडाट त्यांच्या मुखांतून चाले, आणि त्यांची वाणीही चांगली स्पष्ट होती. अर्थात् गांवांतील दहावीस घरें त्यांच्या भिक्षुकीचीं म्हणून ठरलेलीं होतीं; तेवढ्यांवरच त्यांचें चांगलें चालत असे.

सवाष्ण–ब्राह्मण घालण्याचा प्रघात आतां मोडत चालला आहे. पण पूर्वी तो फार जारी होता. टूं झालें कीं मेहुण सांगण्याची वहिवाट होती. त्यामुळें गणूकाकांच्या बरोबर सत्यंकाकूही जेवावयास जात. आपल्याला जर एक मुलगा असता आणि एक मुलगी असती, तर सवाष्ण, ब्राह्मण, मुंजा आणि कुंवारीण असा साराच संच आपल्या घरीं सजून राहिला असता, असें काकूंना कितीदां तरी वाटे. तें नाहीं तर नाहीं, पण आपला सवाष्ण-पणाचा हक्क काकू यथासांग भोगत असत. अशा प्रकारें वर्षांमागें वर्षें गेलीं, आणि दोघां नवरा-बायकोंच्या मुखावर जरेची कळा येऊं लागली.

कालमान बदललें, यजमानांचीं घरें कमी झालीं; प्राप्ति घटूं लागली; आणि गणूकाकांना कांहीं नवा व्यवसाय पाहणें प्राप्त झालें. चैत्र महिना सुरू झाला म्हणजे घरोघरीं हळदीकुंकवाचे समारंभ होत आणि सुवासिनींना आमंत्रणें करावीं लागत. सौभाग्याचा सोहाळा वर्षांतून एकदां व्हावयाचा; अर्थात् जितक्या जास्त घरीं आमंत्रण देतां येईल तितक्या घरीं देण्याची वहिवाट असे. हीं आमंत्रणें देण्याचें काम गणूकाका पत्करूं लागले. ते तरी काय करणार ? भिक्षुकीतून पुरेशी प्राप्ति होईना; आणि या महिन्याची त्या महिन्याला गांठ पडेना.—चूल तर कशी ना कशी चालली पाहिजे; तेव्हां असलें कांहीं काम करणें त्यांना भागच असे. गणूकाका हें त्यांचें नांव हळूहळू मागें पडूं लागलें आणि ' गणू बोलावणेकरी ' असें नवीं पोरें त्यांना म्हणूं लागलीं. दोषी कोणीच नव्हतें, पण काळाच्या ओघांत असा अनिष्ट फरक पडत गेला.

चैत्र सुरू झाला कीं बोलावण्यांची झुंबड उडे, आणि ' गणू बोलावणेकरी घरांत आहेत का, ' असें विचारीत रोज पांचसहा माणसें तरी येत. नव-ऱ्याला मिळालेलें हें नवें नांव कानावर आलें म्हणजे सत्यंकाकूंना रागाचा अगदीं कढ येई. त्या म्हणत, " अहो, आम्हीं भिक्षुक, पंचवीस यजमानांच्या

घरीं वागलेले; आणि थोरामोठ्यांशी आमचा संबंध; पण हीं माणसें यांना ' बोलावणेकरी ' म्हणूं लागलीं ! " नांव आवडत नाहीं म्हणून गप्प बसणें कसें बरें शक्य होतें ? ' गणू बोलावणेकरी आहेत का ' असें कोणी विचारलें म्हणजे, ' होय आहेत, ' असें म्हणणें भागच असे. अपमानाची ही गोळी गिळून सत्यंकाकू परसांत जात आणि गणूकाकांना सांगत, ' बोलावण्याची यादी आली आहे. ' हातांतलें काम टाकून काका चटकन् ओसरीवर येत. कारण गिऱ्हाईक वायां जाऊं देणें बरोबर झालें नसतें. एका सकाळांत अशा पांचसहा याद्या जमा झाल्या, म्हणजे जेवणाच्या आधींच, गणूकाका आमंत्रणें करून येत. मग स्नानसंध्या, जेवण आटपून, मळक्या तक्क्याला डोई देत, आणि घटका अर्धी घटका घोरत पडत.

तेवढ्या वेळांत सत्यंकाकूंच्या दोनचार खेपा तरी बाहेर होत. ओसरीवरील गोणपाटाच्या बैठकीवर याद्या पडलेल्या असत. पण सत्यंकाकूंना त्यांचा कांहीं उपयोग नव्हता. बायकांनीं लिहावेंवाचावें, ही चाल पुढें पडली. काका जागे झाले म्हणजे सत्यंकाकू मोठ्या आस्थेनें कोणाकोणाच्या घरीं हळदीकुंकू आहे, हें विचारीत. आणि काकाही चंची गुंडाळीत गुंडाळींत त्यांना नीट खाणाखुणा सांगत. काकांकडे बोलावण्याचें काम देणारे लोक तरी इतके निष्काळजी कीं, काकूंना आमंत्रण द्यावें हें सुद्धां त्यांना सुचत नसे. पण त्यांना सुचलें नाहीं तरी, सत्यंकाकू गृहीतच धरून चालत कीं आमंत्रणें आलेलींच आहेत. काकांचीही याला हरकत नसे.

चार वाजले, म्हणजे त्या पांढुरक्या झालेल्या पाटल्या, तो कळकट नथेचा गाडा, असा नेमस्त शृंगार करून सत्यंकाकू घरांतून बाहेर पडत. बरोबर एक मोठा थोरला धडपा असे. बायकांचे तांडे गांवांतून हिंडूं लागले, म्हणजे सत्यंकाकू त्यांतच शिरत; आणि जिथें जिथें वसंतोत्सव असे, तिथें तिथें जाऊन त्या सौभाग्याची खंडणी वसूल करीत. दिवस आतांच्यासारखे भिकारडे नव्हते ! अगदीं गरिबाच्या घरींसुद्धां ओंजळ दीड ओंजळ हरभरे घालीत; एखादी कांकडी देत; चांगली द्रोणभर हरभऱ्याची डाळ देत; पण माणसें जर थोडीं जिवट असलीं तर बायकांना सौभाग्यलेणींहीं मिळत. बांगड्या, खण, हळदीकुंकवाच्या मोठाल्या पुड्या, बत्तासे हे देऊन, सवाष्णींना रस किंवा पन्हेंही पाजीत. सत्यंकाकू जमलेली खंडणी धडप्यांत

घेत; पण रस किंवा पन्हें त्यांना नाइलाजास्तव तेथेंच प्यावें लागे. पितांना त्यांना काकांची आठवण नेहमीं होई. आणि साधलें असतें तर त्यांनीं कासंडीभर रस किंवा पन्हें घरीं नेलेंही असतें. पण तशी चाल नव्हती.

वसंतोत्सवाचे पत्ते काकूंना घरांतच कळलेले असत. त्या ठिकाणीं तर त्या जातच; पण आणखी कोणाच्या दारापुढें जर का रांगोळी दिसली, तर सवाष्णपणाच्या अधिकारावर, त्या बेलाशक तेथेंही जात. बोलून-चालून वसंतोत्सव ! आणि सवाष्ण आपल्या पायानें चालत आलेली, म्हणून काकूंचा कोणी अव्हेर करीत नसे. शिवाय घरांतील यजमानीणबाई, सुना, लेकी, नणंदा, यांपैकीं कोणाच्या तरी स्वतंत्र ओळखीच्या या असतील, असें बाकीच्या बायका समजत असत. अर्थातच, जमलेल्या अनेक सवाष्णींत घुसमटून जाऊन आपला ओटीचा हक्क त्या बजावीत. कांहीं कांहीं वेळां तर, कोणी श्रीमंतिणी स्त्रिया त्यांना बरोबर घेऊन जात. बाईसाहेबांचा ज्या मानानें आदरसत्कार व्हावयाचा त्या मानानेंच भटीणबाईंचाही थोडाबहुत तरी होई. अशा प्रकारें चैत्राच्या महिन्यांत सत्यंकाकू पुष्कळच हरभरे गोळा करीत. बोलावणें आलें नसतांना आपण जातों, अशी रुखरुख त्यांच्या मनाला असे; आणि ‘ ही सगळ्या गांवांत हिंडते, पण हिला एक तरी आमंत्रण असतें का नाहीं, ’ असें गणूकाका आपल्या मनाशीं पुटपुटत असत. पण काकू किंवा काका यांनीं या गोष्टीचा कधींही उच्चार केला नाहीं. मनोमन साक्ष दोघांनाही असे. पण गौरीचे दिवस; तर सौभाग्याचा अधिकार म्हणून ओटीला जायला काय हरकत आहे, अशी स्वतःची समजूत तीं उभयतां घालीत असत.

संध्याकाळपर्यंत आलेले भिजवलेले हरभरे काकू दुसऱ्या दिवशीं उन्हांत घालीत; आणि जसजसे वाळतील तसतसे भरून ठेवून, महिन्याच्या शेवटीं एकदां भरडून टाकीत. रोज थोडी थोडी भर पडत आहे, हें पाहून त्यांना भारी आनंद वाटे. आणि शेवटीं एकदां डाळ झाली म्हणजे त्या म्हणत, ‘ चला, वर्ष सहा महिन्यांची डाळ झाली. ’ पाखडून उरलेल्या चुणीचीं केलेलीं शेंगोळीं, गणूकाकांना पुढें चारदोन दिवस खावीं लागत. असें हें जोडपें कसें ना कसें दिवस कंठीत होतें.

लग्नामुंजींचे दिवस आले म्हणजे वशिल्याच्या भटजींच्याबरोबर गणूकाका

लग्नमंडपांत जात, आणि इकडलें सामान तिकडे, तिकडलें इकडे, अशी कांहीं उमेदवारी करूं लागत. विद्वान् भटजींना माहीत असे कीं, या गृहस्थाचें नीट चालत नाहीं, आणि म्हणून याला कांहीं आश्रय दिला पाहिजे. यजमान व यजमानीण यांच्या देखत ते मुद्दामच म्हणत, “ गणूकाका, बोहल्याच्या वह्या नीट आणल्या आहेत का नाहीं, पहा; ही रांगोळी घालायची चुकलेली दिसते. ” हे शब्द कानीं पडतांच आपण मुख्य भटजींचे दुय्यम आहों, आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणें, कांहीं बारीकसारीक कामें करण्याचा अधिकार आपल्याकडे आलेला आहे, असें काकांना वाटूं लागे. आगंतुकीची ओशाळगत त्यांच्या मनांतून निघून जाई; आणि मग आपली स्वतंत्रच ओळख आतां झाली आहे असें मानून, ते नवी कामें यजमानीणबाईंना मोठ्या तरतुदीनें विचारून घेत. व्याह्यांची पंगत कुठें बसायची ? नवऱ्यामुलाचें ताट कुठें ठेवायचें ? हें ठरवण्याचें जोखमाचें कामसुद्धां ते शिरावर घेत असत.

दरम्यान एखादेवेळीं अथवा बहुधा, सत्यंकाकू मध्येंच मंडपांत येत आणि ‘ आहेत का, आहेत का ’ म्हणत थेट माजघरापर्यंत जात ! ‘ कोण हवें ’ म्हणून यजमानीणबाईंनीं विचारलें, म्हणजे थोडी मान वांकडी करून सलज्ज मुखानें त्या काकांच्याकडे पहात, यावर बाईसाहेब म्हणत, “ होय का ? आम्हांला नाहीं हें माहीत ! गणूकाका, तुम्हीं यांना कां नाहीं घेऊन आलांत ? ’ गणूकाका विनयानें म्हणत, “ आपल्याला आगंतुकीचा भारी कंटाळा आहे ! ” बाईसाहेबांनीं म्हणावें, “ अहो, यांत आगंतुकी कसली अन् काय ? चार माणसें आलीं गेलीं, तर आपल्याला हवींच असतात. त्यांतून एक सवाष्ण जास्त जेवली, तर आम्हांला पुण्याचीच जोड आहे.” बाईचे हे शब्द ऐकतांच, सौभाग्याचें नवें स्फुरण येऊन, सत्यंकाकू ओंचा-पदर घट्ट आंवळीत; आणि जणूं कांहीं आपण पडेल त्या कामाला तत्पर आहों, असा आविर्भाव करीत. अशा प्रकारें, लहानसें कार्य असलें तर दोन दिवस; मोठें कार्य असलें तर चारपांच दिवस; असें उभयतांचें परभारें भागत असे; शिवाय दक्षणा कनवटीला लागे ती निराळीच !

श्रावण महिना; भाद्रपद महिना; हे दिवस आले म्हणजे सत्यंकाकू आपला सौभाग्याचा अधिकार निरनिराळ्या तऱ्हेनें चालवीत असत.

गणूकाका फार जल्दीनें थकूं लागले होते. त्यांची गांवांतील भ्रमन्ति कमी होऊं लागली होती. पण याच कारणासाठीं, सत्यंकाकू अधिकाधिक हिंडूं लागल्या होत्या. आणि याला त्यांच्यापाशीं एकच परवाना होता, आणि तो म्हणजे त्यांचें सौभाग्य हा होय. नवरात्राची सवाष्ण म्हणून दहा दिवस जेवायला जातां आलें तर पहावें, अशी त्यांची टेहेळणी नेहमीं चालू असे. सुदैवानें त्यांना या कामांत यशही मिळे. जेवायला जावयाचें म्हणजे त्या बऱ्याच आधीं जात; कांहीं थोडी उमेदवारी करूं लागत. केळीचीं पानें पुसावींत, लिंबें चिरावींत, यजमानीणबाई ताक घुसळूं लागल्या, तर त्यांच्या हातांतील रवी आपण घ्यावी, पंक्तीचें पाहिलें वाढप आपल्याकडे घ्यावें, अशी ही उमेदवारी असे. बोलणें निघे आणि मग काकू म्हणत, "त्यांना कांहीं फारसें जात नाहीं. येवढें खाल्लें म्हणजे ते संध्याकाळीं तोंडसुद्धां उघडीत नाहींत." 'मग आतां घरीं कोण आहे?' असें यजमानीणबाई विचारीत. काकू उत्तर करीत, "घरीं कुठलं कोण आहे! मी आतां इथनं जाईन, तेव्हां भात करून घालीन. यायच्या आधींच केला असता, पण आपलें अडेल म्हणून आधीं आले." काकूंचें हें सौजन्य पाहून यजमानीण बाई गहिंवरून जात. त्या म्हणत, "काकू, गेल्यावर करायला कशाला हवं? वाढूनच घेऊन जा इथून." एखाद्या वेळीं तर कोणी कोणी म्हणत कीं, "आम्हांला आयतं मेहूणच होईल. तुम्हीं त्यांना दहा दिवस घेऊन या. आम्हीं त्यांना बोलावणं पाठवतों बरं." काकूंच्या या करामतीला असें सुंदर फळ येई आणि मग नवराबायको दहा दिवसपर्यंत सुखानें गोड घांस खात असत. पण हा नवरात्राचा हंगाम नुसत्या गोड घांसावारी जात नसे. दसऱ्याच्या दिवशीं बाईसाहेब काकूंची ओटी खणानारळानें भरीत, आणि एखाद्या वेळीं लुगडेंही देत. असा हा सौभाग्याचा महिमा होता.

गणूकाकांची शरीराची ऐट आतां जवळ जवळ नाहींशी झाली होती. अनवाणी चालून चालून त्यांचे पाय पातळ होत गेले. हातापायांचीं बोटें सुरकुतून गेलीं. अर्थातच ठेक्यावर चालण्यासाठी पायांच्या अंगठ्यात घातलेलीं चांदीचीं वेढणीं गळून पडलीं; त्यांच्या बंडीच्या खिशांत आतां आरशाची डबी राहीनाशी झाली; आणि कपाळावरची केंसांची कमानही नाहींशी होऊन त्यांच्या चरबट आणि करड्या दाढी–मिशा कशा तरी

वाढूं लागल्या. सत्यंकाकू अगोदरच उंचच्या उंच; पण अंगावर थोडें मांस असल्यामुळें त्या जरा तरी बऱ्या दिसत; पण वयानें आणि कष्टानें त्या अगदीं वाळत चालल्या; आणि अधिकच शेलाट्या दिसूं लागल्या. एखाद्या वेळीं वाटे कीं, ही बाई तिरकमठ्यासारखी वांकडी होईल कीं काय कोणास ठाऊक!

स्नानसंध्या आवरून परसांतल्या चांफ्याच्या झाडाखालीं एक आडनिडा कट्टा होता त्यावर गणूकाका सुन्नपणानें बसत. आतां तर काकूंना फारच कष्ट पडूं लागले. कारण गांवांतील ये–जा अगदीं संपत आली. पण सुवासिनीपणाची पताका कपाळावर लावून, काकू सर्वत्र संचार करीत; आणि एखादें वाण, एखादा खण, एखादी ओटी, एखादें आमंत्रण असें कांहीं तरी घेऊन परत येत. रोज बारा वाजेपर्यंत चुलीला मिलिट लागलेलें असे. न जाणों, आपण भात टाकावा आणि तिकडून जेवायचें आमंत्रण यावें असें होईलसें काका–काकूंना वाटे. आमंत्रणाची वेळ पूर्ण टळली म्हणजे काकू परसांतील गंवरी आणून चुलीला पेटवण घालीत. दोन वाजतां जेवण झालें, म्हणजे 'जेवणें उशीरां झालेलीं असल्यामुळें' रात्रीच्या जेवणाला अर्थातच फाक्या बसे! दोघेही थंडा फराळ करीत आणि अशानें प्रकृति चांगली राहते अशी मनाची समजूत करून घेत.

काकांचें ध्यान आतां सुकून गेलें होतें. त्यांची हडकलेली शरीरयष्टि पाहून, काकूंना खरोखर दुःख होई; आणि आपल्याकडे पाहून हिला दुःख होतें, यामुळें काकांना दुःख होई. आपल्याला आहेवपणें मरण यावें व आपलें सोनें व्हावें असें काकूंना कितीदां तरी वाटे. पण लग्नाच्या वेळीं नवरी नवऱ्यापेक्षां लहान असली पाहिजे; आणि मरायच्या वेळीं ती नवऱ्याच्या आधीं गेली पाहिजे, हा दुहेरी जाचक न्याय कोणालाच संभाळतां येण्यासारखा नसतो. काकू थकल्या खऱ्या, पण त्यांची काठी चांगली टिकून राहिली; मात्र त्यांच्या कपाळावरचा सौभाग्याचा टिळा रोडकेपणामुळें अधिकाधिक उठून दिसूं लागला.

* * * *

... आतां तुम्ही काकूंच्या घरांत पाऊल टाकलंत, तर तुमच्या मनांत चर्रर होऊन जाईल. तुमची दृष्टि दांड्यांकडे गेली तर दोन तांबडीं

जुनेरीं तेथें वाळत असलेलीं तुम्हांला दिसतील. आतां तेथें चोळी किंवा काळें लुगडें दिसावयाचें नाहीं. आंत गेलांत तर एक म्हातारी किडकिडीत बाई चुलखंडापाशीं बसून, भाकरीच्या पिठाचें थालिपीठ थापीत आहे; आणि 'कोण आहे' म्हणून खोकत खोकत बाहेर पहात आहे, असा देखावा दिसेल. याच त्या सत्यंकाकू हें कोणाला खरेंही वाटणार नाहीं. कितीही गरिबी असली, कितीही ओशाळगत वाटत असली आणि आगंतुकी करावी लागली असली, तरी चांफ्याखालील कट्ट्यावर जोंपर्यंत रोडकेही गणूकाका बसलेले होते, तोंपर्यंत सत्यंकाकूंना कोठेंही जाण्याचा अधिकार होता; कारण त्या सौभाग्यवती होत्या; आतां त्यांना कोण विचारतो? त्यांतही त्यांना मुलगा असता तर त्यांचें दर्शन कोणीं अशुभ मानलें नसतें. पण सत्यंकाकू वांझोट्या होत्या; आणि आतां त्या विधवाही झाल्या होत्या. पुढल्या दारापासून परड्याच्या शेवटच्या दारापर्यंत सारें घर आपल्यामागें लागलें आहे, असें त्यांना वाटे. घराचें घरपण गणूकाकांवर अवलंबून होतें आणि सौभाग्याची पताका हातीं घेऊन सत्यंकाकू सगळीकडे मिरवत असत. आतां लग्नें नाहींत, मुंजी नाहींत, वाणें नाहींत, सण नाहींत, जेवणें नाहींत.—आतां फक्त बापुडवाणें वैधव्य पदरीं आहे. कोणी आया-बायांनीं पापड करायला, लोणचें घालायला, नाहीं तर भाजणी दळायला बोलावलें तर एक सातविटका झालेला मुकटा नेसून, भुईकडे बघत काकू ओळखीच्या घरीं जातात; कारण त्यांचा सौभाग्याचा बावटा आतां कायमचा खालीं आलेला आहे !

# २

# सोनसळ आणि शेला

एकाच आईबापांच्या पोटीं आलेल्या बहीणभावांची ही कथा खरोखरच मोठी विस्मयकारक वाटेल. वसंत आणि शरयू हीं दोन भावंडें पोरकीं बनलेली होतीं; आणि वडलांनीं त्यांच्या योगाक्षेमाची तरतूद जरी चांगली करून ठेवलेली असली तरी त्यांच्या अंगावरचें मायेचें पांघरूण उडून गेलेलें असल्यामुळें जगांत आपल्याला कोणी नाहीं, या जाणिवेनें त्यांचें मन पुष्कळदां खिन्न होत असे.

आपले स्नेहीसोबती आईबापांशीं कसा हट्ट करतात, त्यांचें कौतुक कसें होतें, हें पाहिलें म्हणजे ती पोरकेपणाची त्यांची जाणीव अधिकच तीव्र बने. त्यांना कुठलीं बोलावणीं येत नसत. जुन्या आठवणीनें एकाद्यानें लग्नसमारंभाला बोलावलें तर तो दिवस त्यांना सणासुदीसारखा वाटे.

वसंता स्वभावानें चांगला लाघवी व प्रेमळ असल्यामुळें त्याला पुष्कळ मित्र लाभलेले होते; पण त्यांच्या घरीं हा गेला म्हणजे त्याला तेथें सगळेंच नवेनवेसें वाटे. मित्राची आई पाळण्यांतलें नांव सोडून देऊन लाडक्या टोपण नांवानें त्याला हांका मारते; तो लडिवाळपणें तिच्याशीं कांहींतरी हवें नको करतो; ती त्याच्यावर क्षणभर रागावल्यासारखें करते; हा देखावा पाहिला म्हणजे आपल्या जीवनांत कांहींतरी उणेपणा आहे असें वसंताला राहून राहून वाटे. एखाद्या मित्राची धाकटी बहीण कांहींशी दूर उभी राहून हंसतमुखानें आपल्याकडे पहात उभी राहते, पण नजरेला नजर मात्र भिडूं देत नाहीं आणि आईनें थोड्याशा उंच आवाजानें हांक मारल्याबरोबर शेपटा हेलकावीत निघून जाते हें पाहिलें म्हणजे घरांतील प्रेमळ नात्यांच्या शलाका वातावरणांत कशा पसरत असतात याची मधुर प्रतीति त्याला येत असे. मित्राची मोठी लेकुरवाळी बहीण माहेरीं आलेली असली आणि तिच्या लहानग्या बब्यानें ओळख नसतांनासुद्धां, ‘ मामा,

मामा ' म्हणून आपल्या गळ्याला मिठी मारली म्हणजे आपण आपल्या घरांत कसल्या सुखाला अंतरतों, हें ध्यानांत येऊन दिवसभर त्याच्या मनाला हुरहुर लागून राही.

एकाद्या वेळीं दुसऱ्या एकाद्या मित्राची आई आपल्या मुलाला म्हणे कीं, "अरे, त्या दोघांनाही बोलाव; त्या शरयूला ना आई ना बाई; आपल्या या गोपाळकाल्यांत आली म्हणजे तिलाही जरा बरें वाटेल." तीं दोघेंही त्यांच्या घरीं गेलीं म्हणजे तेथलीं माणसें त्यांच्याकडे टक लावून पाहूं लागत. वसंतासारखा खेळकर मुलगा आपल्या माधवाचा मित्र आहे या गोष्टीचाही त्यांना अभिमान वाटे आणि शरयूकडे पाहून किंचित उतावीळ-पणानें कोणी तरी म्हणे, " ही त्याची बहीण का? अरे वा!" या उद्गाराचें मर्म वसंत आणि शरयू या दोघांच्याही ध्यानांत येई आणि तें शरयूला थोडेसें लागट असें असल्यामुळें तिचा चेहरा किंचित् उतरल्यासारखा होई.

दोघेही बहीणभाऊ सुस्वरूप असली तरी त्यांच्या सौंदर्यांत उजवें आणि डावें असा प्रकार होता आणि नवलाची गोष्ट ही कीं, डावें सौंदर्य शरयूच्या वाटेला आलेलें होतें !

नवीन चालीप्रमाणें सारी उपवर आणि उपवधू मुली-मुलें एकत्रच जेवावयास बसत आणि मग आग्रहाच्या हास्यकल्लोळांत माधव आपल्याला मुद्दामच आग्रह करतो, हें शरयूच्या वारंवार ध्यानांत येई. असे अनेक प्रसंग वसंतच्या मित्राच्या घरीं घडत. एकाद्या मित्राची आई शरयूला बाजूला घेई, आणि तिच्या पाठीवरून हात फिरवून 'आतां ऊन कललें म्हणजे परत जा हं ' असें म्हणून तिला राहवून घेई; आणि मग दुपारच्या वेळीं ती पोक्त स्त्री तिच्या दिवंगत आईबाबांविषयीं अनेक प्रेमळपणाच्या गोष्टी सांगूं लागली कीं, शरयूच्या मनाचें तें पात्र आनंदानें दुथड्या भरून जाई. आपली आई जिवंत असती, तर आपलें किती चीज झालें असतें हें मनांत येऊन, शरयू खिन्न होई. घरीं आल्यावर रात्रीच्या वेळीं भावंडांनीं आपल्या अनुभवांचा पाढा वाचला म्हणजे त्यांची पोरकेपणाची जाणीव पुष्कळदां तीव्र बने; आणि वसंतानें जरी निर्धारानें ती गिळून टाकली तरी शरयू बाजूला तोंड करून मुसमुसूं लागली म्हणजे त्याच्याही डोळ्यांत पाणी येई.

तथापि जगाची रहाटी जलदीनें बदलत जाते हें खरेंच आहे !

होतां होतां वसंत व शरयू यांचें महाविद्यालयीन शिक्षण सुरू झालें; आणि मग त्यांच्या मित्र–परिवारांत स्पष्ट फरक पडूं लागला. त्यांच्या अभ्यासाच्या शाखा बदलल्या आणि मग तिच्या मैत्रिणी आणि मित्र निराळे आणि याचे मित्र आणि मैत्रिणी निराळ्या असें होऊं लागलें. वडलांच्या कृपेनें या उभयतांना कसलीही ददात नव्हती. इतकेंच नव्हे तर त्यांची रहाणी चांगली डौलदार रहावी इतपत पैसा वडलांनीं ठेवलेला होता. अर्थातच मैत्रिणी आणि मित्र यांनी आपल्या घरीं यावें असें या दोघांना वाटावें, आणि यांच्या घरीं पुन्हां पुन्हां जावें असें त्या मैत्रिणींना आणि मित्रांना वाटावें हेंही स्वाभाविकच होतें. गवताचीं दोन पंदें बुंध्यांतून बाहेर येतांना एकमेकांना चिकटलेलीं दिसतात; पण त्यांचा पुरेसा पोष झाला म्हणजे तीं एकमेकांपासून विलग होऊं लागतात. वसंत आणि शरयू एकाच घरांत रहात होतीं; आणि एकमेकांना प्रियही होतीं तरी त्यांच्या आवडीचे विषय आणि आवडीचीं माणसें हीं निरनिराळीं होऊं लागलीं; आणि मग याच्याकडे कोणकोण येत आहेत याकडे तिचें लक्ष आणि हिच्याकडे कोण येत आहे याकडे त्याचें लक्ष मधून मधून जाऊं लागलें. जेवायला बसलीं म्हणजे या बाबतींतली आपली पसंती अथवा नापसंती तीं दोघें हास्यविनोदानें एक-मेकांना कळवूं लागलीं.

आपल्या मनाची भूक कसली आहे हें आरंभीं आरंभीं तरुण माणसाला स्वतःचें स्वतःलाच कळत नाहीं. तरुण पुरुषालाही कळत नाहीं; आणि तरुण स्त्रीलाही कळत नाहीं. त्यांचीं मनें जर निसर्गतःच कुढीं नसलीं आणि संकोचवृत्तीनें त्यांच्या चलनवलनाला काच उत्पन्न होत नसला तर त्यांचा प्रेमळपणा मनाच्या पाणलोटावरून सगळीकडे वहात आहे असें दिसून येतें. तीं सर्वांशींच सुहास्य करून बोलतात; कोणाच्याही उपयोगी पडण्याची तत्परता दाखवतात; दुसऱ्यांनीं केलेल्या अल्प विनोदालाही हंसून जाब देतात; आणि ‘ हीं माणसें मोठीं गोड आहेत ’ असा भाव सर्वांच्याच मनांत उत्पन्न करतात. प्रेम करण्याची त्यांची वासना चारी अंगांनीं ओसंडून वहात असते; आणि जो ज्या दृष्टीनें त्यांच्याकडे पहात असेल, त्याला त्या त्या दृष्टीनें तीं प्रियकर वाटूं लागतात. जुन्या ऋणानुबंधी

लोकांचा आणि नव्या मित्रांचा, वसंत आणि शरयू यांचा परिवार वाढतच चाललेला होता; आणि म्हणून त्या परिवारांतील साऱ्या माणसांना हीं दोघेंही अतिशय प्रिय होत चालली. वयस्करांना त्यांच्याविषयीं मधुर वात्सल्य वाटूं लागलें. लहानांच्या मनांत हीं आपलीं दादा आणि ताई आहेत, यांच्याकडे जाऊन खुशाल कसलातरी हट्ट धरावा, अशी आपुलकी उत्पन्न झाली; आणि तरुण स्त्री-पुरुष मित्रांच्या मनांत कांहींसें मादक आकर्षण उत्पन्न झालें. यांच्या प्रेमाचा प्रसर एकच पण तो पात्रापात्राला अनुसरून निरनिराळे रंग पावूं लागला. शेवटीं, वयानुरूप या प्रेमाला जें रूप येणें अटळ असतें तेंच त्याला निश्चितपणें व्यापून रहातें. हा सार्वत्रिक अनुभव या पोरांच्या बाबतींतही हळूहळू खरा ठरत चालला.

एकदां शरयू आपल्या मैत्रिणीच्या घरून परत येतांना तिच्या दीडदोन वर्षांच्या मुलालाच घेऊन आली आणि निरनिराळ्या तऱ्हेच्या रंगीबेरंगी वस्तू त्याच्यापुढें टाकून त्याला गमतीनें खेळवीत बसली. वसंता तिला म्हणाला, " आपण परवां मुंबईला गेलों असतांना, कचकड्याचीं केलेलीं गोजिरवाणीं मुले खांद्यावर टाकून चौपाटीवर फिरायला आलेल्या प्रौढ पारशी कुमारिकांच्याकडे पाहून तूं कांहींशा उपहासबुद्धीनें हंसलीस, याची आठवण तुला आहे का ? "

" मग त्याचं इथें काय ? " शरयूनें विचारलें.

" नाहीं; तसं कांहीं नाहीं, मला सहज आठवण झाली म्हणून म्हणालों. " इतकें बोलून बाजूला पहात पहातच वसंता आपल्या खोलींत निघून गेला; आणि त्यानें आपल्या मनाचा बरोबर वेध केलेला आहे या जाणिवेनें कांहींशी ओशाळलेली शरयू मुद्दामच आपल्या पुस्तकांत तोंड घालून बसली.

भावनांची निवड करतां येणें आणि त्यांचीं निरनिराळीं आंदोलनें अमूक अर्थाचीं आहेत हें समजणें पहिल्या पहिल्यांदा तरी खरोखर कठीण जातें.

सहवासाची गोडी कोणची, शेजारधर्माचें नातें कोणचें, सहकार्याचें अगत्य कोणचें आणि शृंगाराचें प्रेम कोणचें याची निवड करतां येणें फार

कठीण असतें. भावनांचा संकर वेगवेगळा करायला जो अलिप्तपणा हवा असतो, तो या वयांत सर्वथा अशक्य असतो; आणि मग शरीराच्या क्षुधेला अनुसरून तरुणांचीं मनें एकारूं लागलीं, म्हणजे यांच्या प्रीतीला अंतरूं लागलेल्या मित्रांना, शेजाऱ्यांना आणि सहकाऱ्यांना एक प्रकारचें सूक्ष्म दुःख वाटूं लागतें. ज्यांना आपण आपले समजत होतों ते दुसऱ्याचेच कोणाचे तरी आहेत, हें उमगल्यामुळें त्यांच्याविषयीं यांच्या मनांत उपेक्षा उत्पन्न होऊं लागते. वसंता आणि शरयू सर्वांना प्रिय होतीं खरीं; परंतु त्यांच्या प्रेमाचा झोक समवयस्कांकडे अधिक अधिक होऊं लागला आहे हें सर्व संबंधितांना दिसूं लागलें; आणि यांनाही समवयस्कांच्या संगतीशिवाय चैन पडेनासें झालें.

नव्या कल्पनांचे आणि भावनांचे प्रवाह केव्हां आणि कसे वाहूं लागतात, हें सहजासहजीं ध्यानांतच येत नाहीं.

वसंता हा नाकाडोळ्यांनीं इतका नीटस होता कीं, त्याच्याकडे पाहतांच पाहणारांची दृष्टि थोडावेळ तरी तेथें खिळून रहावी. रूपाच्या नीटसपणांत यौवनाची भर पडत चालल्यामुळें तो मोठा झोंकदार दिसूं लागला. केव्हां केव्हां प्रसाधनांनीं सौंदर्य खुलून दिसतें; पण एकाद्या वेळीं त्यांच्या उपेक्षेनेंच तें जास्त खुलून दिसतें; आणि संबंधित माणसें त्याचेंच कौतुक करतात; नीटनेटका आणि सुंदर रोपणाईचा पोशाख करणारा वसंता एकाद्या वेळीं साधा पोशाख करून आणि गालफडावरची एक दिवसाची वाढ तशीच ठेवून कॉलेजच्या मैदानांत हिंडतांना पाहिला म्हणजेही लोकांना मोठी मौज वाटे. ‘ जातीच्या सुंदरांना कांहींही शोभतें ’ हा न्याय अक्षरशः खरा आहे.

वसंता हा सध्यां आपल्याच कॉलेजांत कांहीं संशोधनाचें काम करीत असे. एम्. एस्सीला शिकविण्यासाठी एक मोठ्या तरतरीत बाई अलीकडे येऊं लागल्या होत्या. बाईंना रूपसंपदा बेताचीच लाभलेली होती; पण या वैगुण्याची भरपाई प्रसाधनांनीं करण्याकडे त्यांचा विशेष कटाक्ष असे. शिकविण्याचें काम एकीकडे चालू असतां, म्हणजे बुद्धीचा व्यापार योग्य तसा चालू असतां, त्यांचें चोरटें मन दुसऱ्या एका आकर्षणांत गुंतलेलें असे. तत्त्वज्ञानी माणसें सांगतात कीं, ‘ माणसाला दोन

मनें असतात, पण दोनच कशासाठीं ? आपल्याला तीन, चार सुद्धां मनें असतील ; किंबहुना आपण किती आहों, हें मनाचें मनालासुद्धां समजत नाहीं. शिकवण्याचें काम चालू असलें तर माणसानें फक्त शिकवावयासच हवें. मग पातळाची जरीकांठी पट्टी पुरुषाच्या जानव्याच्या दिशेनें चापून-चोपून बसली आहे ना, हें पाहण्याकडे त्यांचा हात पुन्हां पुन्हां कां वळावा ? वाराविरा सुटलेला नसतांनाही केस विस्कटलेले असतील कीं काय या भीतीनें, एकमेकाला लागलेल्या बोटांची फणी त्यांनीं आपल्या केसांवरून फिरून फिरून कां फिरवावी ? शिकवायला उभें राहिलें असतांना पायावरचा पातळाचा झोंक, कसलीही हालचाल होत नसल्यामुळें, विस्कटण्याचा संभव जरी यत्किंचितही नसला, तरी तो झोंक पहिल्या-सारखाच शाबूत राहिला आहेना हें अर्धवट कटाक्षानें पाहण्याची आवश्यकता कोठें असते ? पण येथें पहावें तों, बाईचें चलनवलन समोर बसणारांना कांहींसें चमत्कारिक वाटे. मुलें म्हटलीं तरी आतां तीं चांगलीं यौवनांत आलेलीं असतात. आणि त्यांनाही दोन दोन तीन तीन मनें असतातच. विषयाचें विवेचन कानाच्या पाळींत सांचवून धरून समोर उभें असलेल्या माणसाच्या इतर चलनवलनाकडे तीं निराळ्या दृष्टीनें पहातच रहातात; आणि मग आपल्यापैकीं कोणाच्या मनावर काय परिणाम होत आहे याचें परीक्षण चोरट्या नजरेनें करण्यांत तीं कुत्सित आनंद मानतात; आपण सारेजण समोर बसलों असलों तरी बाईचा मोहोरा आपल्यापैकीं कोणाकडे पुन्हां पुन्हां वळतो आणि त्याच वेळीं त्यांच्या हाताला आपोआप कोणची इशारत मिळते; हें सर्वांच्याच ध्यानांत येत असे.

* * *

सहलीला जमलेली मंडळी रानचा वारा पिऊन आणि बासुंदीपुरी खाऊन मोठी खुशींत आलेली होती. ज्याला जें सुचेल तो तें बोलत होता, आणि अर्धवट राहिलेले संभाषणाचे विषय हवेंत तसेच हेलकावत होते.

त्यांतच एकजण म्हणाला, " यानें बाईसाहेबांचं काय पाहिलं कोणास ठाऊक ! "

" तेंच ना ! हा कुठें, अन् ती कुठें ! ! कशाला कांहीं पत्ता नाहीं. "

" अरे बाबा, प्रेम आंधळं असतं म्हणतात ना ! "

" आंधळं कसचं ! रोज एकमेकांकडे बघत होते. " सर्वजण खो खो हसूं लागले.

" आपण आज त्यांना सहलीला बोलवायला हवं होतं. "

" नाहीं कोण म्हणतो ! पण तीं दोघं पंधरा दिवसांच्या रजेवर आहेत हें तुला माहीत नाहीं वाटतं ! "

" हं ? मधुमासाची चाल आपल्याकडंही पडली वाटतं. "

मुलांमुलींचा हा हास्यविनोद एकीकडे चालूं असतां, वसंता आणि इंदिरा या दोघांच्याही घरांत विस्मय, आनंद आणि जिज्ञासा यांचे वारें पसरून राहिलेलें होतें. कोणी म्हणत कीं, या दोघांच्याही मनाचे व्यापार खरोखर नीट कळवून घ्यायला पाहिजेत. आपलेंच काहीतरी गमावलें आहे म्हणूनच जणूं काहीं खिन्न झालेले वसंताच्या वडिलांचे ऋणानुबंधी विस्मयानें म्हणूं लागले कीं, " पोरांचें हें काय चालूं आहे, हेंच कळत नाहीं; याला आम्ही चांगल्या चांगल्यांच्या मुली सांगून आणलेल्या होत्या; पण हा प्रत्येकीच्या ठिकाणीं कांहींतरी खोड काढायचा; आणि असलं हें भूत शेवटीं यानं पसंत केलं."

इंदिरेच्या घरांत आनंदी आनंद चालूं होता. इंदिरेपेक्षां कांहींसा कमी शिकलेला म्हणूनच कोणी नाक मुरडलें असलें तर तें निराळें, आणि या पोरीच्या जाळ्यांत असला सोनमासा कसा काय सांपडला म्हणून मनांतल्या मनांत कोणी टीका केली असली तर तें निराळें; एरवीं तिच्या घरची सारी मंडळी जामातावर बिलकुल खूष होऊन गेली होती. कॉलेजच्या प्रिन्सिपॉलसाहेबांना कोणी कोणी ' हें कसें काय झालें ? ' असा प्रश्न कुतुहूलानें विचारला सुद्धां. त्यांनीं संथपणें उत्तर केलें, " केवळ एकत्र आल्यानें आणि सहवासांत यौवनाची ऊर्मि प्रबळ झाल्यानेंच असें घडून येत असतें; दुसरें कांहीं नाहीं. पण याला इलाज नाहीं. दोघेंही चांगलीं शहाणीं आहेत. घडून येतें तें असें. "

वसंताची परीक्षा म्हणजे बंदुकीचा बार असे; आणि ही त्याची बंदूक कधीं रंगूक प्यायलीच नाहीं! बार नेहमीं काडकन् उडायचा; आणि इंदिरेच्या मादक सहवासांत जरी त्याचे दिवसच्या दिवस निघून गेले होते तरी आपल्या प्रोफेसरीणबाईचें यश कोणकिडल्या कोणीकडे टाकून देऊन या सर्वश्रेष्ठ परीक्षेंत त्यानें आपल्या कॉलेजचें यश साऱ्या विद्यापीठांत गाजवलें. आपला हा पराजय इंदिरेनें फार प्रेमळपणानें पत्करला. 'कांहींसा कमी शिकलेला' हा वसंतावरचा आळ अशा रीतीनें उडून जाऊन आपल्या नात्यांत योग्य तें स्थान आपल्याला मिळालें याचाच स्त्रीमनाला योग्य असा एक नरम आनंद तिला वाटूं लागला.

तथापि, या सगळ्या आनंदांत खरी भर वसंतानें आणलेल्या आणि दोन्ही हातांनीं प्रेमभरानें तिच्या देहाभोंवतीं गुंडाळलेल्या सोनसळीनें घातली. हें तलम, जरकाड्यांनीं चमचमणारें आणि अंजिरी छाया मधून मधून दाखविणारें वस्त्र नेसून इंदिरेनें एकदां लफ्फेदार पदर पाठीवर सोडला म्हणजे वसंताच्या उन्मादांत सांपडलेल्या मनाला जगांतलें सारें सौंदर्य इथेंच विनटलें आहे असा भास होई. टीकाकार माणसें एकमेकांत जरी कुत्सेनें हंसून म्हणालीं कीं, "या वस्त्राची कळा बाईनें घालवली आहे" तरी ज्याला जें सुंदर दिसेल तेंच खरें सुंदर हाच न्याय शेवटीं खरा ठरला.

शरयूचें सौंदर्य डावें होतें असें वर सांगितलें आहे. पण त्याचा अर्थ तरी इतकाच कीं, वसंतच्या मानानें ती कमी सुंदर होती; पण ही तुलना सोडून दिली तर तिचें म्हणून कांहीं एक स्वतंत्र सौंदर्य होतेंच होतें.

आणि आतां तर 'अप्सरा' होण्याचें तिचें वयहि आलें होतें. पण वर्गामध्यें तिच्या एका निराळ्याच गुणाचा प्रभाव पडत चालला होता. प्रश्न विचारण्याची पद्धति कॉलेजांत जरी सरसहा नसली तरी शेलक्या प्रसंगीं एखादा प्रश्न प्राध्यापक विचारतातच. वाघ मागें लागल्यासारखें खूप फसफस करून बोलणें याला कोणी ओघवान वक्तृत्व असें समजतात. माधवरावांच्या ठिकाणीं याचा गंधहि नव्हता. त्यांचें बोलणें धिमें पण आंखीव, रेखीव, आणि त्यांचे वर्णोच्चार शुद्ध आणि कर्णमधुर असत. ज्या त्या शब्दाला अर्थदृष्ट्या स्वतंत्र अस्तित्व आहे, आणि श्रोत्यांना तें भासमान

झालेंच पाहिजे, असा त्यांचा कटाक्ष असे. माधवराव चाळीशीच्या पुढें गेलेले असल्यामुळें–पण त्याहीपेक्षां त्यांच्या स्वभावांतच सारासार विवेकाची प्रवृत्ति जास्त असल्यामुळें–विद्यार्थ्यांच्या पदरांत एकेक माप तोलून टाकण्याकडे त्यांचा कल असे. वाङ्मयांत कांहीं प्रेमाचा किंवा विरहाचा प्रसंग आला म्हणजे ते एकदोन घुटके गिळीत आणि दृष्टि वर न उचलतां आपलें पुढलें विवेचन चालू करीत. नेहमींचा त्यांचा उल्हास अशा प्रसंगीं भंग पावतो हें विद्यार्थ्यांच्या ध्यानांत आलें होतें. आणि ज्यांना हें माहीत होतें कीं, माधवराव विधुर आहेत, त्यांना याचें मर्महि नीट उलगडलेलें होतें. कर्णोपकर्णीं आलेली ही माहिती वसंतानेंसुद्धां एकदां शरयूला सांगितलेली होती; आणि तेव्हांपासून असा प्रसंग केव्हां आला म्हणजे माधवरावांसंबंधानें तिच्या मनांत थोडी करुणा उत्पन्न होई. पण विद्यार्थी झाले काय किंवा विद्यार्थिनी झाल्या काय, कोणीहि त्यांना होत असलेल्या दुःखाची ओळख आपल्याला पटलेली आहे हें कधींहि दाखवलें नाहीं.

असला एखादा प्रसंग सोडला तर माधवरावांचा तास म्हणजे विद्यार्थ्यांना बौद्धिक मेजवानीच असे. मात्र एखाद्या प्रसंगीं त्यांनीं शेलका प्रश्न टाकला म्हणजे विद्यार्थ्यांची ही निशा उतरे, आणि उत्तर देतां येत नाहीं म्हणून त्यांचीं तोंडें विदुळल्यासारखीं होत. पण आपल्या प्रश्नाचें उत्तर कोठून मिळेल हें माधवरावांना पक्कें माहीत झालेलें होतें. माधवराव तेव्हां शरयूकडे पहात. नवल हें कीं, दर वेळीं शरयूहि विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर अतिशय समर्पकपणानें देई. माधवरावांच्या तोंडावर घनदाट पसरलेली संतोषाची छाया पाहून विद्यार्थी मनांत आधीं थोडे खजील झाले असले तरी फार आनंदून जात; आणि बौद्धिक वर्चस्वाची कबूली शरयूला देण्यासाठीं तिच्याकडे ते कौतुकानें पहात. शरयूला केव्हां केव्हां उत्पन्न होणारी माधवरावांबद्दलची करुणा आणि माया मुलीच्या चमकदार बुद्धीचें त्यांना वाटणारें कौतुक, यांचा हळूहळू गुणाकार होऊं लागला. आणि केव्हां केव्हां तर सबंध तास म्हणजे माधवराव आणि शरयू यांच्या बुद्धिविलासाचा आणि विनोदाचा तास असेंच होऊं लागलें.

प्रेमी लोक समजतात त्यापेक्षां जग जास्त रसिक असतें. त्या द्दोघांच्या

बोलण्याचालण्यांत पडत चाललेला फरक सर्वांच्याच ध्यानीं येऊं लागला. पण कोणी म्हणत, "अरे हा प्राध्यापक, ती विद्यार्थिनी!" कोणी म्हणत, "हिचें वय काय, माधवरावांचें वय काय!" परंतु, प्रीतीचा खरा शोध अजून कोणालाहि लागलेला नाहीं हेंच खरें. रूप, बल, साहस, बुद्धि, श्रीमंती, गुण, दारिद्य, करुणा, तत्त्वज्ञान – त्यांतल्या कोणत्या तत्त्वाचा अंमल चढत जातो आणि माणसांचा मनोमिलाफ होतो हें खरोखरच सांगतां येत नाहीं. कोणत्याहि काळांतले आणि कोठलेहि प्रीतिविवाह तपासून पाहिले तर दिसून येईल कीं, आतांच सांगितलेल्या तत्त्वांपैकीं प्रत्येक तत्त्व केव्हांना केव्हां प्रबळ ठरलेलें आहे. कोणाला कशाचें लागीर होईल, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. पण एकदां त्यानें झपाटलें म्हणजे बाकीच्या साऱ्या गोष्टी उपेक्षणीय वाटूं लागतात; आणि प्रेमाला कढ येऊन माणसें विवाहबद्ध होतात. सूक्ष्मपणानें त्यांचा मत्सर करणारे किंवा तत्त्वान्वेषी लोक त्यांना नांवें ठेवूं लागतात. तथापि, हे निरनिराळे विकार आणि विचार प्रेम जागृत करायला आणि तें प्रभावी बनवायला कारणीभूत होतात, हें मान्य करावयास हवें. वसंतालासुद्धां शरयूची ही पसंती पसंत नव्हती. पण वसंताची पसंती तरी शरयूला कोठें पसंत होती? "नट्टया-पट्टयाला भुलून एक कसली तरी कालिका तूं गळयांत बांधून घेत आहेस" असें त्याच्या लग्नापूर्वी ती त्याला एकदां म्हणालीहि होती. आणि लग्नानंतर शरयू त्या दोघांशीं जरी अत्यंत समंजसपणानें आणि प्रेमळपणानें वागली तरी वसंताच्या मनांतील त्या दंशाचा वण कायमच राहिलेला होता. आतां शरयूची पाळी आली! 'हा बथ्थड म्हातारा हिला काय आवडतो कुणास ठाऊक' हे बायकोच्या देखत त्यानें काढलेले उद्‌गार शरयूच्या कानीं पडले होते.

पण कोणाला काय वाटतें, आणि कोण काय म्हणतो इकडे दुर्लक्ष करून शरयूनें माधवरावांचा प्रपंच पुनः उभा केला. या कामांत तिचें एक वर्षहि बुडालें. पण प्राप्त झालेल्या आनंदाला ही किंमत कांहीं फारशी पडली नाहीं असेंच ती म्हणे.

माधवरावांना रसिकतेचें भरतें पुन्हां आलें, आणि या श्रीमंताच्या मुलीच्या रुचीला साजेसा दरबार त्यांनीं घरीं थाटला. नवरा हा नवरीला

वस्त्रभूषणें घेतो. पण प्रीतीची खूण कांहीं निराळीच असते. शरयूनें एक मोठा जरतारी उंची शेला बाजारांतून आणला, आणि दुपारचें जेवण झाल्या-वर माधवराव कोचावर थोडे पहुडले असतांना तिनें तो त्यांच्या अंगावर घातला. त्याच्या बारीक स्पर्शानें त्यांची ती दुपारची हलकी झोंप एकदम गेली; आणि मग त्यांच्या मनांत उठलेले कल्लोळ त्यांनीं हरतऱ्हांनीं व्यक्त केले.

वसंता आणि शरयू हीं दोघेंहि आतां विवाहबद्ध झालेलीं होतीं; आणि आपआपल्या घरीं फार सुखानें नांदत होतीं. नापसंतीचें वेड एकदां मागें पडलें म्हणजे नात्याचें अगतिकत्व पटूं लागतें, आणि माणसें परस्परांवर प्रेम करूं लागतात.

हीं दोन्ही जोडपीं जरी निरनिराळीं रहात होतीं तरी एकमेकांच्या घरीं येणें जाणें, जेवायला रहाणें, एकत्र प्रवासाला जाणें, असे प्रसंग अनेकदां घडत. आपल्याला कोणी तरी नातेवाईक उत्पन्न झाले आहेत या जाणीवेनें दोघेहि नवरदेव आपल्या ठिकाणीं खूष होते; पण पेला भरला म्हणजे तो लवंडायचा, शिखर मोडावयाचें, स्वच्छ वस्त्रावर डाग पडायचा, आणि शेंदऱ्या आम्रफळावर काळा चट्टा उठायचा हें ठरलेलेंच असतें.

एकदां वसंता हा कांहीं धंद्यानिमित्त बाहेरगांवीं गेला असतां शरयू, माधवराव आणि इंदिरा हीं तिघेंहि समुद्रकांठीं स्नानाला गेलीं. समुद्राची नेहमींची मर्जी त्यांना अर्थातच माहीत होती. पण त्या दिवशीं समुद्राला भलतीच ‘ लहर ’ आली आणि त्या झपाट्यांत इंदिरा आणि माधवराव पाण्यांत गडप होऊन गेलीं. भांबावलेल्या आणि धांवत सुटलेल्या शरयूनें पुष्कळ आरडाओरडा केला आणि कोळ्यांनींहि आपली शिकस्त केली; पण त्या दोघांचा पुन्हां मागमूसहि लागला नाहीं. दुर्दैवानें आपल्या हातानें दोन प्रपंचांवर अंगार ठेवला; सुग्रासानें भरलेल्या ताटांत पाल पडली; आणि रसरसलेल्या आम्रवृक्षाला जणूं भुजंग कडकडून चावला.

माणसाचें जीवित आहे याच्याहून जास्त निष्ठेचें झालें असतें तर बरें झालें असतें. पण तें नसतें असें तरी कसें म्हणावें ? निष्ठा आणि चांचल्य हीं दोन्ही शेजारधर्मानेंच रहातात असें कित्येकदां दिसून येतें. बायको मेल्या-मुळें वसंत अगदीं मोडावून गेला. त्याची सुंदर सुरत विद्रूप होतेशी दिसू

लागली. आपल्या शरीराची तो हयगय करूं लागला; आणि धंद्याकडे तर त्याचें मनच लागेना. रात्रीच्या रात्री जागून काढाव्या आणि दिवसा आढ्याकडे बघत पलंगावर पडून रहावें ही त्याची दिनचर्या बनली. डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रुधारांनीं त्याची उशी कितीदां तरी भिजून गेली असेल. समुद्रस्नानाला जातांना इंदिरेनें ती सोनसळ खुंटीवर ठेवलेली होती. तिच्याकडे पाहून पाहून वसंताला हुंदक्यांवर हुंदके येत. शेवटीं एकदां त्याला काय वाटलें कोणास ठाऊक ! त्यानें त्या लफ्फेदार वस्त्राची घडी घातली आणि दोन उशांच्या मध्यें ती घालून तो निजूं लागला. तें वस्त्र म्हणजे आपल्या प्रीतीचें सारसर्वस्व आहे, इंदिरा ती असें नेसली होती, तिला तिच्या मैत्रिणींनीं हें वस्त्र पाहून गंमतीनें पाठीवर थापट्या मारल्या होत्या, हें सारें त्याला पुन्हा पुन्हा आठवे. आणि इंदिरा गेली तरी ज्या वस्त्राचा तिच्या शरीराला एवढा गच्च वेढा पडत असे तेंच वस्त्र हातांत कवटाळून घेऊन निजल्यानें आपल्या निराशलेल्या प्रेमाची थोडी तरी शान्ति होईल असें त्याला वाटे. दोन उशांमधलें त्याचें हें आंजरीःमर्म मित्रांनीं पाहिलें म्हणजे ते एकमेकांना म्हणत, ' या माणसाचें प्रेम किती तीव्र आहे पहा ! '

आतां शरयूला माधवरावांच्या बिऱ्हाडघरांत रहाण्याची कसलीच आवश्यकता नव्हती. मोलाची चीजवस्त घेऊन ती भावाकडेच राहूं लागली. तेंच त्या दोघांचें मूळ घर होतें. आपण येथून निघून दुसरीकडे कुठें तरी गेलों आणि पुन्हा आवरासावर करून मूळ पदावर येऊन ठेपलों, ही घटना एखाद्या तलम स्वप्नासारखी कशी घडून आली याचें तिला राहून राहून नवल वाटे. पहिल्यानें ती ज्या दालनांत रहात असे त्याच दालनांत आतां ती राहूं लागली, आणि सारखींच कष्टी झालेलीं हीं बहीणभावंडें एक-मेकांची समजूत घालून एकमेकांचें दुःख हलकें करूं लागलीं. पण दर वेळीं घडून येई तें हें कीं, दुःख हलकें होण्याच्या ऐवजीं परस्परांच्या संग-तींत त्याला •जास्तच भरती येत असे. वसंत आपल्या बायकोची सोनसळ उशाखालीं घेऊन निजतो हें शरयूनें पाहिलें; आणि मग मोठ्या प्रीतीच्या भरानें आणि दोन्ही हात उभारून जो जरीचा शेला तिनें माधवरावांच्या अंगावर घातला होता तो आतां तिनें भिंतीला टांगलेल्या माधवरावांच्या

तसबिरीवर श्रीकारासारखा घातला. अशा रीतीनें शोभत असलेल्या आपल्या त्या पतीच्या तसबिरीकडे पाहून शरयू दुःखाचे आवंढे सारखे गिळत बसत असे.

दिवसांमागें दिवस गेले. झाडांचीं पानें वाळलीं. गार वारें सुटलें. वनस्पतींचे खराटे झाले. माणसांचीं अंगें थंडीनें फुटलीं. पाण्याचा स्पर्श नकोसा झाला. कांहीं दिवसांनीं वाऱ्याचीं वावटळें होऊं लागलीं. रानावनांतले वाळके पाचोळे गांवाकडेसुद्धां वहात येऊं लागले. सृष्टीचें रूप अगदीं बदललें.

पुन्हां थोडेच दिवस गेले आणि पिंपळाच्या अंगांतून एक लक्ष गुलाबी मुगारे बाहेर पडले. चार पांच दिवसांत त्यांचीं कोंवळीं पानें झालीं. अंगणांतील बागेंतील सगळीं झाडें पुनः हिरवींगार दिसूं लागलीं. वसंताचे उष्ण वारे पुनः वाहूं लागले. शुभ्र चांदण्यांत फुललेल्या बटमोगऱ्याचा सुगंध वाऱ्याबरोबर सगळीकडे दरवळूं लागला. सृष्टीचें रूप साफ बदललें.

करमेनासें झाल्यामुळें वसंतानें शहरांतील एका 'सदनां'त दोन तीन तासांची नोकरी धरली. तो घरचा चांगला सुखी असल्यामुळें नोकरींतून पैसा काढावा हें त्याच्या गांवींहि नव्हतें. तो तीन तास शिकविण्याचें काम करी आणि वाटेंत चहा घेऊन घरीं परत आला म्हणजे त्याच्या त्या उशा डोक्याखालीं घेऊन तो स्वस्थपणें पडून राही. पण एवढ्यानें तरी पुरेशी करमणूक कशी होणार ? शरयूच्या खोलींत जावें तों ती सुकत चाललेल्या वेलीसारखी दिसूं लागल्यामुळें तिच्याशीं बोलल्यानें आपल्या किंवा तिच्या मनाला कांहीं विरंगुळा उत्पन्न होईल असें त्याला बिलकूल दिसेना. माधवरावांचें दर्शन सुखानें होईल, आणि त्यांच्या अंगाभोंवतीं घातलेल्या शेल्यानें खुषींत येऊन आपल्याकडे पाहून ते कदाचित् मंजुळ हास्य करतील या अपेक्षेनेंच जणूं कांहीं ती प्रहर प्रहर आपल्या अंथरुणावर पडून राही. खरोखर आईबापांनीं या भावंडांना सर्वसुखी केलें होतें. पण मुलांच्या साऱ्या जन्माची हमी आईबापांना कधीं घेतां आली आहे काय ? यांना घर ठेवलें होतें, वस्त्रपात्र ठेवलें होतें, कसलीहि ददात ठेवली नव्हती. पण आईबापांनीं केलेल्या तरतुदीचें पांघरूण मुलांच्या जन्माला तोटकें पडतें हेंच खरें.

वसंता 'सदना'मध्यें जाऊन सहा सहा तास काम करूं लागला आणि मग तेथील स्त्री कारभारी मंडळांतहि त्याचा प्रवेश झाला. अशा प्रवेशाची तयारी त्याला सृष्टीनेंच करून दिलेली होती.

सुस्वरूप माणसाला कोठेंहि शिरण्याचा परवानाच तिनें जणूं दिलेला असतो. नकटें आणि खमडें माणूस दाराशीं उभें रहातें आणि सुस्वरूप माणूस बेधडक आंत शिरतें. वर्गात शिकत असतांना नट्टापट्टा केलेलें जें एकच ध्यान त्याला समोर दिसत असे तसलीं अनेक ध्यानें त्याला तिथें दिसूं लागलीं. तें मूळचें ध्यान नाहीसें झाल्यामुळें तो घाबरा झाला होता. पण तसलीं अनेक ध्यानें आतां डोळ्यांसमोर नाचूं लागल्यामुळें त्याच्या मनांत अनेक रुणझुणणारी नर्तनें चालू झालीं. भावनांच्या कल्लोळाबरोबर तो मादकपणानें इकडे तिकडे पाहूं लागला आणि ठरलेल्या वेळीं घरीं परत जाणें त्याला नकोसें वाटूं लागलें; पण घरीं गेला म्हणजे अर्थातच तो शरयूच्या खोलींत डोकावे, आणि कदाचित् तिचा डोळा लागलेला आहे असें पाहून आपल्या खोलींत जाऊन नेहमींचें उसें घेऊन तो आढ्याकडे बघत बसे.

डोळे मिटलेले असल्यामुळें शरयू झोंपीं गेली आहे असें कुणाला वाटलें असतें. पण तिची झोंप अगदीं उडालेली होती. डोळ्याचे पडदे जरी तिनें लावून घेतले असले तरी माधवरावांची ती सुरम्य सुरत आणि त्यांच्या अंगावर घातलेला तो शेला यांचें दर्शन तिला अखंडच होत राही. शरयू सुकत चालली. मैत्रिणींनीं समजूत घालावी. पण दुःख मोठें वेडें असतें. त्याला जों जों दबवावें तों तों तें जास्तच उफाळून येतें. शरयूचा आहारसुद्धां कमी झाला. वस्त्राच्या बाबतींतसुद्धां ती कसलीहि टाकटीक ठेवीना. मैत्रिणींना वाटूं लागलें हें कांहीं बरें नाहीं. अशानें ती थकत जाईल. त्या दुरून दुरून सुचवीत कीं असें करून कसें चालेल ? धीर धरला पाहिजे आणि नशिबा-वरसुद्धां मात केली पाहिजे. शरयू त्यांच्याकडे नुसतीच डोळे वटारून पाही.

एके दिवशीं 'सदनां'तून वसंताला यायला बराच वेळ लागला. शरयूनें खिडकींतून इकडे तिकडे डोकावून पाहिलें आणि गेला असेल कुठें-म्हणून त्या कांटेरी बिछान्यावर तिनें आपला देह टाकून दिला. रात्रीं आठच्या सुमाराला वसंतानें टकूटक् केलें. दार उघडून पहातें तों वसंत

आणि त्याच्यामागें कोणी तरी एक स्त्री आहे असें तिला दिसलें. चपापून थोडें मागें होऊन तिनें निरखून पाहिलें. वसंताचा चेहरा खर्रकन् उतरला. पण नवें अवसान धरून आणि खोटेंच हंसून त्या स्त्रीसह तो आपल्या खोलीकडे गेला आणि त्यानें शरयूलाहि तिकडे खुणेनें बोलाविलें. ता म्हणतां ताकभात न कळण्यासारखी शरयू अडाणी होती काय ? वसंताच्या चेहऱ्यावर उल्हास, उन्माद यांचा रंग असा चढला होता कीं हें काय आहे म्हणून निराळें विचारण्याची आवश्यकताच नव्हती. शरयूपेक्षां एखादी कमी निग्रही स्त्री या धक्क्यानें खालींच कोसळली असती. पण सर्व माणसें सारखीं असतात हें शरयूनें कधीं खरेंच मानलें नव्हतें. जें ज्याला भावेल, जें ज्याला झेपेल तें त्यानें करावें असें तिचें मत बनलें होतें. लटकेंसुद्धां नव्हे – तिनें खरेखुरें सुहास्य केलें, आणि वसंतदादा पुनः प्रपंचांत आला हें पाहून ती म्हणाली, “ दादा, तूं हें बरं केलंस. मला राहून राहून अशी काळजी वाटे कीं तूं एके दिवशीं वेडासुद्धां होऊन जाशील. आतां हें घर उघडं राहील आणि बाब्रांचा वंश तुझ्याद्वारां चालू राहील. तुम्ही दोघं सुखानं रहा. ” वसंताच्या बायकोकडे थोडीशी वळून आणि ओळखल्या-सारखें करून ती म्हणाली, “ वहिनी, मी तुम्हांला पूर्वी कुठें तरी पाहिल्या-सारखं वाटतं. ” थोडेंसें हास्य करून वहिनी म्हणाल्या, “ तुमच्या शाळेंत मी हिंदी शिकवायला येत असे. ”

वसंतानें सारे दागदागिने नव्या इंदिरेच्या अंगावर घातले. ही इंदिरा पहिल्यापेक्षां अर्थात् चांगली होती. त्यानें दोन उशांमधील ती सोनसळ बाहेर काढली आणि घडी मोडून तिचा लफ्फेदार पदर त्यानें इंदिरेच्या खांद्यावर टाकला व अंजिरी छाया मधून मधून दाखविणारी आणि जरीच्या काड्यांनीं चमचमणारी ती सोनसळ पेहेरलेली ती इंदिरा राणी-सारखी शोभूं लागली. वसंताचें दुःख सातासमुद्राच्या पलीकडे गेलें. सोनसळ तीच होती. आंतला देह बदलला इतकेंच काय तें. वसंता तोच. घर तेंच. सोनसळ तीच. प्रेम तेंच. मद तोच. फक्त देह बदलला इतकेंच काय तें.

चार हातांच्या अंतरावर असलेल्या पलीकडच्या खोलींत मात्र मूर्तिमंत दुःख कुढत बसलेलें होतें. तें कण्हत होतें, कुथत होतें, जवळची वस्तु दूर टाकीत होतें, आणि मग तीच वस्तु पुन्हा जवळ घेत होतें. शरयूला हळूहळू

अन्नद्वेष होऊं लागला. नवें आणि सुंदर वस्त्र अंगावर घेणें पातक आहे असें तिला वाटूं लागलें. तिनें माधवरावांवर खरेंखुरें प्रेम केलें होतें. उन्मादासाठीं नव्हे, मुलीसाठीं नव्हे, बुद्धिविलास आणि करुणा यांच्या संगमावर आरूढ होऊन तिचें प्रेम माधवरावांना जाऊन मिळालें होतें. तें ती जागा आतां बिलकुल सोडीना. शेला पांघरलेली तसबीर आतां तिचें दैवत बनलें. कोमेजून चाललेल्या आपल्या बहिणीकडे पाहून वसंताला मनांतून वाटे कीं, आपण थोबाडींतच मारून घेतली पाहिजे. पण इंदिरेचें मनोहर ध्यान मधेंच तेथें आलें म्हणजे त्याच्या पुरुषी प्रेमाला गरगरून भरतें येई आणि शरयूविषयीं मनांत कांहीं पुटपुटत तो तेथून निघून जाई. पण शरयूचें मन आतां शुद्ध प्रेमाच्या स्तंभाला करकरून बांधलेलें आहे. तिला आतां अन्नपाणी नकोसें झालेलें आहे. माधवरावांच्या तसबिरीचें दर्शन घ्यावें, आणि तो जरतारी शेला पुनः पुनः त्या तसबिरीवर सावरून घालावा एवढाच व्यवसाय तिला आतां उरला आहे. सोनसळ जरी दुसऱ्या स्त्रीच्या अंगाभोंवतीं आतां लपेटलेली असली तरी हा शेला मात्र माधवरावांच्या तसबिरीवर अनंतकाळपर्यंत राहणार आहे. शरयूपुढें आतां कोणी जाऊं नये आणि तिचें तें वठत चाललेलें शरीर कोणी पाहूंहि नये.

# ३

# वंदनं पादसेवनम् ।

गणेशपंत आपले साधेभोळे गृहस्थ होते. त्यांना छक्केपंजे कसे ते बिलकुल माहीत नव्हते. खेडेगांवची वस्ती अन् तिथलें कुळकर्णीपणाचें एक आण्याचें वतन; पण गणेशपंत आपले त्याला बिलगून असत. थोरामोठ्यांशीं लागतें ठेवून गांवांत प्रतिष्ठा कशी वाढवावी याचें कसब त्यांना आपो-आपच साधलेलें होतें. पण हें कसब आहे, हें त्यांच्या गांवींहि नव्हतें. त्या तऱ्हेची वागणूक त्यांच्या हातून अगदीं सहज होई.

दहापांच दिवस गेले कीं गणेशपंत तालुक्याच्या गांवीं जात. पण जायच्या आधीं एकदां शेतावर जात; आणि एखादा दुध्या भोपळा, दोन काकड्या, किंवा जोंधळ्याच्या शेताकांठच्या अच्छेर पावशेर गोंवाऱ्याच्या शेंगा येवढें दुहेरी धोतराच्या पदरांत गुंडाळून ते तिकडे जात.

इकडे तिकडे कोठें न पहातां ते आपले मामलेदारसाहेबांच्या घरीं जायचे; ओसरीच्या पायऱ्या चढून माजघराच्या दारांत उभे रहायचे, आणि ‘मनुताई, अहो ऽ मनुताई’ अशी कोमल आवाजानें हांक मारायचे. मामलेदारसाहेबांची सात आठ वर्षांची परकरी मुलगी पुढें आली म्हणजे ते खांद्यावरचें धोतर तिच्यापुढें भुईवर मोकळें करत. भोपळा, काकड्या अन् शेंगा पाहिल्या म्हणजे मनुताई ‘श श श ऽ ऽ’ करून आपला आनंद दर्शवीत. स्वयंपाकघराच्या दारांतून मामलेदारीणबाई पहात आहेत हें गणेशपंतांना दिसतच असे; पण आपण तिकडे पाहिलेंच नाहीं असें दाखवून आणि धोतराच्या निऱ्या हातानें मांड्यांत दाबून ते म्हणत, “आईसाहेबांना सांगा कीं, गणपती आला आहे.” अन् इतकें बोलून ते जिना चढूं लागत.

मामलेदारीणबाई वसवस करत पुढें येत; आणि ओणव्यानें भाजीकडे पहात मनाला म्हणत, “जा! सूप नाहीं तर टोपलं घेऊन ये.”

दुध्या भोपळा आतांच्या भाजीला बाजूला ठेवून बाकीची टोपल्यांत भरतां भरतां मनी विचारायची—

" आई, हे भाजी कोठून आणतात ग ? "

" अग, ते आपल्या शेतावरनं आणतात. "

" मऽ ते आपल्यालाच कां आणून देतात ? "

" अग, वरतीं आपल्याकडे त्यांचीं कामं असतात, म्हणून आणून देतात. "

" मग, ज्यांचीं कामं बाबांच्याकडे असतात ते सगळे अशीच भाजी आणून देतात का ग ? "

" मने, तुला भारी बोलायला हवं बाई ! जा, परडी नेऊन ठेव जा !"

मनीची जिज्ञासा मामलेदारीणबाईंना अशीच मधून मधून मुरगळून टाकावी लागे. दहा पंधरा दिवस गेले कीं पाठीवर भाजीचें छोटेंसें ओझें घेऊन गणेशपंतांची स्वारी माजघराच्या दारांत येऊन दाखल व्हावयाची, आणि मनुताईंना आवाहन करून ओझें रितें करून खालीं बघत माडीवर जायची.

एकदां सुट्टीच्या दिवशीं मामलेदारसाहेबांची सुग्रास जेवणाची सुस्सुरी कांहींशी उतरलेली आहे आणि मनी गजगे खेळण्यासाठीं शेजारींपाजारीं गेली आहे, हें पाहून मामलेदारीणबाई माडीवर गेल्या. ' बहू माजला कर्दमाचा पसारा ' या वचनांत सांगितल्याप्रमाणें मामलेदारीणबाईंच्या देहाचा व्याप मोठाच झालेला होता. त्यांची स्वारी दमादमानें जिन्याच्या पायऱ्या नमवीत वर येत आहे हें मामलेदारांनीं जोडव्याच्या आवाजावरून तेव्हांच ओळखलें. आणि एक मोठी जांभई देऊन, तुम्हांला येण्याला कांहीं हरकत नाहीं, असें राणीसाहेबांना सुचवलें.

सू ऽ ऽ ऽ स्स् करून खुर्चीवर मामलेदारीणबाई विराजमान झाल्यावर उभयतांचा सुखसंवाद चालू झाला. बोलतां बोलतां मामलेदार म्हणाले,

" आतां मनीच्या लग्नाची तयारी मला आत्तांपासूनच केली पाहिजे. "

" हो ! पगाराचं तर काय ! या महिन्याची त्या महिन्याला गांठ पडत

नाहीं. हा आला, तो गेला – अशाखालीं थोडेथोडके नाहीं – शंभर रुपये खर्च होतात."

"तरी तूं सांभाळतेस म्हणून बरं; नाहीं तर माझी मोठीच फजिती झाली असती. बरं, कालचं तें...... "

"होऽऽ, नीट ठेवलंय सारं. असंच कांहीं झालं तर गांठीला चार पैसे रहातील. होऽ, बरी आठवण झाली, मी म्हणत होत्येंऽ, त्या गणेशपंताचं काय काम असेल तें एकदां करून टाका ना!"

"अग करूं ना! त्याची काय एवढी गडबड आहे?"

"दर आठ पंधरा दिसां बापडा खेप टाकतो आणि पोराबाळांच्या तोंडची शेताची भाजी इकडे आणून देतो."

"अग देऊं दे – देऊं दे!"

एकदां गणेशपंत भाजीचें बोचकें रितें करून साहेबांच्या माडीवर गेले; आणि दारांतच एकाएकीं थबकून उभे राहिले. सारी माडी कुळकर्णी मंडळींनीं भरून गेली होती. प्रत्येकाच्या पुढें ज्याचा त्याचा लाल खारव्याचा रुमाल (दप्तर) होता. आणि प्रत्येकजण आपला कोष्टकांनीं भरलेला कागद न्याहाळून पहात होता; पण हें न्याहाळण्याचें काम एकीकडे चालू असलें तरी साहेब त्या अमुक एका कुळकर्ण्याला कसे कडाकड बोलत आहेत याकडे प्रत्येकाचें लक्ष होतें. आणि आतां आपलीहि हजेरी अशीच उडणार या भयानें जो तो आवंढा गिळीत होता.

गणेशपंत पाऊल न वाजवतां भिंतीच्या कांठानें सरकत सरकत बसकराच्या टोंकावर जाऊन बसले. मामलेदारांनीं त्यांच्याकडे नुसतेंच पाहिलें आणि 'हरकत नाहीं' असें दर्शविलें. कागदाकडे वळून ते हणमंतराव कुलकर्ण्याला खेंकसून म्हणाले, "काय हो, तुम्ही आज किती दिवस कुळकर्ण चालवीत आहां? साधीं कोष्टकें भरण्याची अक्कल तुम्हांला नाहीं? हें घ्या; त्या दुसऱ्या कोष्टकांतली बेरीज नीट करा–" "अन् काय हो चिकटोपंत, तुमची मराठी सहावी पास झाली म्हणतां? कुठल्या गाढवानं तुम्हांला पास केलं! साधा चार ओळींचा रपोट (report) तुम्हांला नीट लिहितां येत नाहीं! तुमचं कुलकर्णीपण टिकणार तरी कसं?"

साहेबांचे हे शब्द ऐकतांच चिकटोपंतांच्या अंगावरून वारें गेल्यासारखें झालें... “आम्हाला कळत नाहीं का? जमाबंदीच्या कारकुनानं सांगितलं तसं तुम्हीं लिहून आणलं. पण, अहो, तुमच्या स्वतःच्या खांद्यावर डोकं आहे का नाहीं?...” “हं, राघोपंत इनामदार! तुमचं ठीक आहे.” —राघोपंतांच्या चेहऱ्यावर तजेला आला; आणि बाकीच्या कुळकर्ण्यांच्याकडे ते जिंकल्याच्या मुद्रेनें पाहूं लागले. “—तुमच्या या चिकटोपंतांना अन् त्या चिमाजीपंतांना कांहीं अक्कल शिकवीत जा. त्यांचं कुळकर्ण टिकायचं नाहीं.”

साहेबांचा असा कडाका सारखा चालू होता. आणि कुळकर्ण्यांच्या अंगाला दरदरून घाम येत होता. कुळकर्णी बिचारे “नाहीं रावसाहेब, त्याचं तें... त्याचं तें... त्याचं तें...” असें कांहीं तरी त त ऽ प प करून काम पुढें चालू करीत. मग मामलेदारसाहेब ज्यांचीं कामें बिनचूक त्यांना एकदम रजा देत आणि बाकीच्यांना बसवून घेत. आपल्याला कां बसवून घेतलें आहे हें उमगण्याइतकें शहाणपण कुलकर्ण्यांच्या अंगीं क्वचितच असे; आणि शहाणपणाला अनुसरून आगाऊ तरतूद करूनच ते आलेले असत.

जमाबंदीच्या कारकुनाचे हात ओले केल्याशिवाय त्यांना मामलेदारसाहेबांपर्यंत पोंचतां येत नसे. पण तेवढ्यानेंहि निभाव लागत नसे. कागदावरून मामलेदारसाहेब नेमकें हेरीत कीं कारकुनानें यांची तयारी करून दिलेली आहे; आणि मग ते त्यांना सामस्यांत उंदीर पकडावा तसें एका एका प्रश्नांत पकडीत असत. शेवटीं, शेजारीं ठेवलेल्या टेबलावर रुपयांची चळत ठेवावी तेव्हां त्यांची सुटका व्हावयाची. गणेशपंत तेथेंच बसकराच्या टोंकावर मुंगसासारखी मान पुढें करून आणि गरीब चेहरा करून बसलेले असत. कुळकर्णी मनांत म्हणत, “हा लेकाचा इथं कां बसलेला असतो कुणास ठाऊक? याचं एका दमडीचं कुळकर्ण अन् हा आमची बेअब्रू मात्र पहात बसतो.”

तें कसेंहि असो. जमाबंदीच्या वेळीं मामलेदारसाहेबांच्या घरीं असा गल्ला जमा होई. आणि हें स्वाभाविक होतें. कारण त्यांच्या मनीचें आतां लवकरच लग्न होणार होतें. अन् त्यांच्या साडेतीनशें पगारांतले थोडे थोडके नाहीं, शंभर रुपये चटणीसारखे उडून जात होते.

कुलकर्णी मंडळी निघून गेली म्हणजे आपल्याला हा विषय कळलाच नाहीं अशी मुद्रा करून गणेशपंत माडीवरील सामानसुमानाकडे पहात बसत. केव्हां चट्दिशीं उठून साहेबांच्या तांबड्या पागोट्यावर चिमणीनें कांहीं प्रकार केला असला तर डंचकल्यासारखें करून तरतुदीनें उभे रहात आणि पागोटें झाडून स्वच्छ करून ठेवत.

" काय हो गणेशपंत, काय आहे तें ? " मामलेदार विचारीत.

" कांहीं नाहीं; पांखराची जात–" गणेशपंत पुटपुटत.

" हं, मऽ तुमच्या उत्पन्नाचं काय ? "

" आपण काय कराल तें होईल. आपल्याला कांहींहि सांगायला नको. घरांत चार चिलींपिलीं आहेत. "

असें जों बोलणें चालू आहे तोंच मामलेदारीणबाईनीं वर यावें आणि मध्येंच म्हणावें, " गणेशपंत, आजच्या गोवाऱ्या फारच लुसलुशीत होत्या हो. ऐकलं का ? – अहो, गणेशपंतांच्या उत्पन्नाचं काय झालं ? "

" अग तेंच चाललंय्. "

एकदां गणेशपंतांनीं वर येऊन सांगितलें कीं, " बबणभाई बकरेवाले येत आहेत. " साहेबांनीं त्यांना सांगितलें कीं माडीचा सडकेकांठचा जिना त्यांना उघडून द्या. बबणभाई करडा झालेला आणि चांगला जबरदस्त पोसलेला माणूस होता. ' बसा ' म्हणून हातानें खूण केल्यावर मामलेदारांनीं चाळिशीच्या कांचेवरून त्यांच्याकडे कांहींसें रोखानें पाहिलें. बबणभाई पानपट्टी चघळीतच होता.

" हं. काय ? "

" आम्हांला गुरांच्या बाजाराचा मक्ता मिळायला हवा. "

" ठीक आहे. तुम्ही अर्ज दिला आहे ना ! निकाल झाल्यावर तुम्हांला कळवूं;–सरकारांत जो जास्त पैसा भरील त्याला मक्ता मिळेल. '

" पन साएब, हमीं तीनदां मक्ता केला हाये. "

" मग काय तुमची वहिवाट आहे म्हणतां ! इथं वहिवाटीचं कांहीं चालायचं नाहीं. "

" अफ़सोस की बात है ! "

" तें तुम्ही कांहीं म्हणा. सरकारांत जास्त पैसा कोण भरतो तें आम्ही पाहूं. " इतकें करडया आवाजानें बोलून मामलेदार खाड्कन् उठले आणि मुलाखत संपल्याचें दाखवून त्यांनीं बब्रणभाईला चालतें केलें. गणेशपंत हा सारा नकाशा पहातच होते.

मामलेदारसाहेब टांकाला मोठे बळकट होते. आपले अधिकार, कायदे-कानू, वरिष्ठांच्या मर्जीचा झोक यांची त्यांना फार चांगली माहिती असे. तालुक्यांत ठिकाठिकाणीं हिंडून कोणाची आसामी कशी आहे, कोण किती गबर आहे, आणि आपल्याकडे आलेल्या अर्जदारांतील कोणाचें काम कसें करतां येण्यासारखें आहे व कोणाचें मुद्दामच पुढें ढकलण्यासारखें आहे, याची बरोबर अटकळ ते बांधीत असत. सरकारचें काम खरें, पण श्रम आपले आहेत; तर ते कोणासाठीं किती खर्च करायचे आणि त्याची किंमत किती काढायची याचा हिशोब करून ठेवण्यांत ते फार पटाईत असत. अशा प्रकारें मजबुतीनें वागत असल्यामुळें आपल्यावर सरकारांतून किंवा प्रजेकडून कोठून अचानक छापा येईल कीं काय, याची भीति त्यांना बिलकुल वाटत नसे. वाटेल त्या माणसाला ते बेलाशक दरडावून बोलत, यांतलें इंगित हेंच होतें.

एकदां तर, नेहमींप्रमाणें गणेशपंत बसकराच्या टोंकावर बसलेले असतांनाच, ते बहिरोपंत मोकाशावर कडाडून उठले. साहेबांना भेटायला जायचें म्हणून बहिरोपंत रुमालाचे अनेक आडवे तिडवे पट्टे गुंडाळून कानावरून रेशीमकांठी उपरण्याचे वेढे देऊन, हातांत एक दोन वळीं घालून घोड्यावरून आलेले दिसत होते. आपण आपल्या गांवचे मोकाशी, तर साहेब आपल्याला थोड्याशा इतमामानें वागवतील अशी त्यांची कल्पना; पण आपण उत्पन्न सोडवून घेण्यासाठीं साहेबांच्याकडे आलों आहोंत हें त्यांनीं ध्यानांत ठेवायला हवें होतें.

हुश्श करून तक्क्यावरून खालीं सरकत सरकत ते पुरते बसल्यावर मामलेदार म्हणाले, " काय हो ! काय काम आहे ? "

मामलेदारांचा करडा आवाज कानीं पडतांच बहिरोपंत थोडेसे

वरमल्यासारखे झाले. बाहेर काढलेली जी तपकिरीची डबी त्यांनीं कदाचित् साहेबांच्या पुढें केली असती ती त्यांनीं झटकन् बाराबंदीच्या खिशांत लपविली आणि कांहींशा आर्जवी स्वरानें ते म्हणाले, " साहेब, माझं काम मी आतां काय उन्यानदां सांगू ? "

" पण तुम्ही काय म्हणून हेलपाटे घालतां ? तुमचं उत्पन्न कां म्हणून सोडायचं ? अन् तुमचं सोडायचं तर त्या टिकमदासाचं कां नाहीं सोडायचं ? तुम्ही सारे सरकारला बुडवायला बसलेले आहां. सरकारनं मला नेमलं आहे तें मी त्यालाच बुडवावं म्हणून नाहीं. मला सरकारचं हित पाहिलं पाहिजे. तुम्हांला फुकट खायला हवं. "

" साहेब, आम्हांला हीं उत्पन्नं वाडवडलांनीं—" " तें आतां जाऊं द्या. वाडवडलांनीं काय केलं तें केलं,—पण तुम्ही मात्र गांवांत गुंडगिरी करून, आणि चार पैसे हाताशीं ठेवून लोकांना सतावीत असतां हाच तुमचा अन् त्या नारू पाटलाचा धंदा—"

" साहेब, आतां मात्र कहर झाला—"

" अहो कशाचा कहर ! मला चटसारं माहीत आहे. तेच तुमचे धंदे जोरानं चालायला हवेत म्हणून तुमचीं उत्पन्नं सरकारनं सोडावीं म्हणतां ? "

इतकें होत आहे तोंच मनुलाई खालून बाबांना बोलवायला आल्या. उसन्या रागाचें आणि आवेशाचें पूर्ण विसर्जन करून मोठ्या प्रेमळ आवाजानें ते मनीला म्हणाले, " आलों हं—"

साहेब खालीं गेले आणि मोकाशी व गणेशपंत दोघेच सदरेला राहिले. गणेशपंत तट्कन् उठले; थोडेंसें विस्कटलेलें बस्कर त्यांनीं नीट केलें; साहेबांची वांकडी झालेली खुर्ची त्यांनीं नीट करून ठेवली; आणि त्यांच्या अंगरख्यावर चिमण्यांनीं पाडलेला केर त्यांनीं झटकून टाकला. आपल्या पिवळसर डोळ्यांनीं गणेशपंताकडे पाहून बहिरोपंतांनीं विचारलें, " तुम्ही साहेबांच्याकडे नोकरीला आलांत वाटतं ? "

" नाहीं; मी आपला इथं......मी आपला इथं...... "

" काय आपलं नांव ? "

" गणेशपंत घोगरे. "

" असं काय ! " बाहिरोपंत मनांत म्हणाले, " गणेशपंत म्हणतात तो हाच लेकाचा दिसतोय. "

" आतां साहेब वर केव्हांशी येतील ? " इतकें ते विचारीत आहेत तोंच साहेबांची स्वारी मिशा पुशीत आणि ढेकरा देत वर येऊन खुर्चीवर विराजमान झाली.

" साहेब, आपण आमच्यावर कृपा करा. "

" अहो कृपा उगीच होते काय ? "

" मी सेवा करायला तयार आहे. "

गणेशपंत मोठे धोरणी असत. बाहिरोपंत सेवा कसली करणार हें त्यांनीं एकदम ताडलें; आणि साहेब व बहिरोपंत यांना अवघड होऊं नये म्हणून, खालून कोणी तरी हांक मारत आहे असें लटकेंच दाखवून ' आलों, आलों ' असें म्हणत ते जिन्यांतून निसटले.

बाहिरोपंत तट्कन् उठले आणि गोल वळकट्या करून आणलेल्या रुपयांच्या चवडी त्यांनीं साहेबांच्या टेबलावर ठेवल्या; आणि " आतां काय म्हणतां ? " अशा मुद्रेनें त्यांच्याकडे बघत तक्क्याशीं जाऊन बसले. सुटणाऱ्या उत्पन्नाच्या एका वर्षाच्या वसुलीइतका हा ऐवज असावा. कागदावर कांहीं लिहिण्याच्या तंद्रींत आपण आहों असें दाखवून मामलेदार जिन्याकडे तोंड करून म्हणाले, " अहो गणेशपंत, हे येवढे बाहिरोपंत मोकाशी आलेले आहेत, त्यांच्याकडे कांहीं पहाल कीं नाहीं ? "

गणेशपंतांना या गोष्टी सरावाच्याच होत्या. त्यांनीं चहाचे पेले भरून आणले. एक मोठ्या इतमामानें बाहिरोपंतांना दिला; दुसरा साहेबांच्या पुढ्यांत ठेवला. आणि ठेवतांना टेबलावरचे ते रुपयांचे उंच उंच मनोरे त्यांनीं कांहींशा चोरट्या नजरेनें पाहिले. दरबार खलास झाला. मामलेदार-साहेब बाहिरोपंतांना म्हणाले, " हुकूम लवकरच येईल. "

" साहेब, गरीबावर नजर असावी. "

" अहो, तुमची आमच्यावर असली म्हणजे आमची तुमच्याव आहेच. "

नमस्कार चमत्कार होऊन मंडळी आपापल्या कामाला निघून गेली. जातां जातां मामलेदार म्हणाले, "काय गणेशपंत, कसं काय आहे ?"

" साहेब, आमचं कसं व्हायचं ? "

साहेब नुसतेच हंसले; पण त्यांतच गणेशपंतांना आश्वासनाचे अणुरेणु दिसले.

शेतची भाजी घेऊन गणेशपंत मामलेदारसाहेबांच्याकडे निघाले म्हणजे त्यांची पत्नी बगळूताई अगदीं जळफळूं लागे. ती म्हणे, " निघाले वाटतं त्या मामलेदाराच्या डोंबलावर भाजी घालायला ! घरांत ठेवली तर चार पोरंबाळं खातील तरी; पण ह्यांचं आपलं उठल्या सुटल्या गोळा करायचं अन् त्या मामलेदाराच्या बोडक्यावर नेऊन घालायचं. येवढा नैवेद्य नेमानं देवाला दाखवला असता तर तोसुद्धां आतांपर्यंत पावला असता. सारखे खेटे चालले आहेत. ऊन नाही पाऊस नाहीं – काय रे गण्या, गेले का ? "

" हो, हो ! गेले. "

" तहान नाहीं, भूक नाहीं – यांची मामलेदारांची बारी कांहीं चुकायची नाहीं—"

बगळूताईचा हा कडकडाट कानांवर घेत घेतच गणेशपंतांची स्वारी मान पुढें करून साहेबांच्याकडे रवाना होत असे. जोडा ही एक अनावश्यक गोष्ट आहे असें त्यांचें कायमचें मत होतें; आणि छत्री तर श्रीमंतांनींच घ्यायची असा त्यांचा समज असे. अंगांत एक सदरा, कमरेखालीं एक मळकट धोतर, डोक्याला मागल्या पिढींत घेतलेला एक कळकट रुमाल, आणि खांद्यावर दुहेरी धोतरांतलें एक बारकेंसें ओझें, असें हें गणेशपंतांचें ध्यान जाणाऱ्यायेणारांच्या चांगलें ओळखीचें झालेलें होतें. ते अंगावरून गेले म्हणजे वाटसरू एकमेकांत म्हणत, " बापड्याचं तप कधीं फळास येणार आहे, कुणास ठाऊक ! पण गुलामाची चिकाटी मोठी—" गणेशपंत मात्र बायको काय बोलते, किंवा वाटसरू काय

कुजबुजतात याकडे बिलकुल लक्ष न देतां समोर बघत चाललेले असायचे. कोणीं मुद्दामच हटकलें तर दोन्ही हातांनीं त्याला नमस्कार करून, मान ओवाळून आणि थोडें हलकेंच हंसून ते पुढें झटकायचे.

हिरालाल मारवाडी असेच एकदां आले होते. माडीवर येतांच त्यांनीं साहेबांना जयगोपाल केला. हिरालालची मुखश्री मोठी मोहक आणि मार्दव-युक्त असे. त्यांचे पुढले दोनतीन दांत पडलेले असले तरी त्यांच्या मृदु चेहऱ्याला त्यामुळें कसलाहि उणेपणा येत नव्हता. कपाळाला पांढरा त्रिपुंड, कानांत वेलावेलांची बाळी, बरेच दिवस बांधल्यामुळें किंचित् वांकडें झालेलें पिवळया पट्ट्यांचें पागोटें, धोतराचा काचा, आंतल्या अंगाला अनेक खिसे असलेला आणि बरगड्यांच्या बाजूला फुगीर दिसणारा कोट — अशी हिरालालची मूर्ति पाहून कडवे मामलेदारसुद्धां कांहींसे स्मित करते झाले. त्यांनीं हिरालालला चांगलें या–बसा केलें; आणि तुमच्या दुकानच्या जागेचा हा काय गुंता आहे ' म्हणून विचारलें. हिरालाल यांनीं आपलें प्रकरण थोडक्यांत सांगितलें. पण कागदांच्या टाचणीकडे पहात मामलेदार-साहेबांनीं गप्प बसून पण मानेनें नकार दिला. हिरालाल कांहीं वेळ स्तब्ध झाले. ते धीर करून म्हणाले, " साहेब, माझा एवढा काम व्हायला हवा. दुकान गेला तर मी कोठें जाणार ! माझा बाप येथेंच होता; अन् माझा लेक बी येथेंच राहणार आहे. माझा दुकान टिकला पाहिजे."

" शेटजी, हें काम सोपें नाहीं. "

" साहेब, आपण सोपा करा म्हणजे समदा होतो. "

" अहो पण सोपा करा कसा ?" मामलेदारांनीं कांहींसें हंसून विचारलें.

" त्येलाबी इलाज हाये. " इतकें बोलून आणि पलीकडे बसलेल्या गणेशपंतांकडे कांहींशा वहिमी दृष्टीनें पाहून कोटाच्या खिशांत त्यांनीं हात घातला, आणि एक गच्च भरलेलें पाकीट साहेबांच्या टेबलावर ठेवलें व हिरालाल पुढें म्हणाले,

" इलाज कोनचा तो समदा यांत लिवला आहे. साहेबनीं मंग वाचून पहावा. "

मामलेदारांनीं हंसून उत्तर केलें, " ठीक आहे. तुम्हांला एक दोन

दिवसांत उत्तर येईल. " हिरालाल खालीं उतरले. गणेशपंतांनीं मामलेदारांचा डोळा चुकवून त्या पाकिटाकडे आश्चर्यानें पाहिलें.

दर दहा-पंधरा दिवसांनीं मामलेदारसाहेबांच्या घरीं गणेशपंतांचा एक खेटा तरी व्हायचाच. गणेशपंत अश्राप होते हें आपण पाहिलेंच आहे. पण असल्या माणसालासुद्धां निंदक होतेच. पाठीवर भाजीचें बोंचकें टाकून, किंवा खाकोटीला दुध्या घेऊन गणेशपंत चालले असले म्हणजे हे निंदक एकमेकांत हलकेच म्हणत, " ते बघा, गणेशपंत साहेबांच्याकडे चालले ! हा खालमान्या आपल उत्पन्न सोडवल्याशिवाय रहाणार नाहीं. "

आणि निंदकांची ही टीका कांहींशी खरीच होती. गणेशपंत खालमानेच होते. पण त्यांच्या उत्पन्नाचें काय होणार होतें कुणास ठाऊक ! दर खेपेला साहेबांच्या घरीं जावें; कुणी ना कुणी तरी बडी आसामी येऊन मामलेदारसाहेबांच्या विनवण्या करीत असलेली गणेशपंतांना दिसावी, आणि या आलेल्या माणसाचा भरलेला खिसा जातांना रिकामा झाला आहे हेंहि त्यांच्या ध्यानांत यावें. मनांत म्हणत, "आपल्यापाशीं काय आहे ? चार वांगीं नाहीं तर मुळ्याची एखादी पेंडी, कुटें दुध्या नाहीं तर गोवाऱ्या !! "

सरकारचें काम ११ ते ५ कचेरींत चाले. पण मामलेदारसाहेबांचें खरें काम सकाळ-संध्याकाळ किंवा रात्रीं घरींच चालत असे. गणेशपंतांच्या गांवचे किंवा आसपासचे अनेक लहान – मोठे लोक आपआपलीं कामें साधून घेण्यासाठीं साहेबांच्याकडे येत. गणेशपंत हा साहेबांच्याकडे वरचेवर कां येतो हें त्यांना पक्कें माहीत होतें; पण आपल्याला येतांना गरम खिसा आणावा लागतो आणि हा गणेशपंत केवळ पालापाचोळा घेऊन येतो, हेंहि त्यांना माहीत होतें. ते एकमेकांना म्हणत, " अहो, असल्या पाचोळ्यावारी जर उत्पन्नं सुटण्यासारखीं असलीं तर आम्ही भरलेले खिसे कशाला घेऊन आलों असतों ? पण या भोळसटाला वाटतें कीं आपण आंवळा देऊन कोहाळा काढूं शकूं. मामलेदारसाहेब त्याला सारखे टल्ले देतच असतात, अन् हा वेडा शेतांतून कांहीं कुरतडून आणून माजघरांत ओततच असतो. यांच्याऐवजीं त्यानं आपल्या पोराबाळांना जर हेंच माळवं खाऊं घातलं तरी बिचारीं हरकून जातील. "

ही टीका गणेशपंतांच्या तोंडावरसुद्धां होत असे. पण गणेशपंत आपले मान पुढें काढीत आणि जणूं कांहीं कांहींच झालें नाहीं असें दाखवून पुढें निघून जात. आपली पंधरा दिवसांची ‘ वारी ’ मात्र त्यांनीं कधीं चुकूं दिली नाहीं. एखाद्या वारीला जर ते आले नाहींत तर मामलेदारीणबाई म्हणत, “ मने, आज गणेशपंत आले नाहींत. ” आणि मग चर्चा होतां होतां हा बोभाटा माडीवर जाऊन पोहोंचे. मामलेदारसाहेब म्हणत, “ बापडा कां नाहीं आला कुणास ठाऊक ! ”

“ पण मी म्हणतें, गणेशपंतांचं काम एकदां करून कां नाही टाकत ? ”

“ अहो मामलेदारीणबाईसाहेब, ”—बाई लाजून त्यांच्याकडे पहातात; “ उत्पन्न सोडवायचं म्हणजे काय परड्यांतली भाजी खुडून आणायची असते कीं काय ? आतां पंधरा दिवसांनीं कलेक्टरसाहेबांची स्वारी इथं येईल; तेव्हां हा डाव उरकून टाकूं. ”

जिल्ह्याचे कलेक्टरसाहेब हे ज्यू जातीचे होते. साहेब मोठे मनमिळाऊ असून अवदन्नें खाणारे नसले तरी निरनिराळीं अन्नें खाणारे होते. त्यांना आपल्याकडचे नाना प्रकारचे पदार्थ खावेसे वाटत. ही त्यांची गोम मामलेदारसाहेबांना अर्थातच माहीत झालेली होती. कलेक्टरसाहेब एखाद्या वेळीं येणार, तर त्यांचा आदरसत्कार मामलेदारांनीं करावा यांत कांहीं चूक नव्हती. मेजवानी हा एक आदरसत्काराचाच अवश्य भाग असतो; आणि त्यांतहि जर ही मेजवानी कलेक्टरसाहेबांना विशेष मौजेची वाटली तर त्यांची मर्जी अधिकच खूष होईल, हें ओळखून आज मामलेदारांनीं नाना तऱ्हेचे पदार्थ करावयास बाईसाहेबांना आज्ञा केली. तुपांत तळलेली पुरणाची पोळी कलेक्टरसाहेबांना भारी आवडे. अर्थात् ती मध्यभागीं ठेवून भोंवतालीं नाना प्रकारचे रुचकर आणि स्वादिष्ट पदार्थ भरलेली अशी मोठी परात साहेबांच्या बंगल्यावर पाठवून देण्यास हुकूम करून मामलेदार रहदारी बंगल्यावर निघून गेले.

सरकारी कामकाज आटपलें. जेवणाची वेळ झाली; आणि झांकलेली परात शिपायाच्या डोक्यावर देऊन गणेशपंत मोठ्या तरतुदीनें ठरल्याप्रमाणें बंगल्याच्या जेवणघरांत येऊन दाखल झाले. साहेब टेबलाशीं बसले. मामलेदार उभे राहून समजावून सांगूं लागले; आणि गणेशपंत

निरनिराळे पदार्थ वाढूं लागले. निरनिराळ्या खिरी, त्यांच्यामध्येंच एखादी चटणी, मग एखादें पक्वान्न, – असें होतां होतां शेवटीं गणेशपंतांनीं मिष्ट पुरणपोळी वाढली, अन् ती खाऊन साहेब संतुष्ट झाले व प्रसन्न नजरेनें गणेशपंतांकडे पाहूं लागले.

मामलेदार म्हणाले, " उत्पन्न सोडावं म्हणून मी मघांशीं म्हणत होतों ना, तोच हा गणेशपंत कुलकर्णी. " हात खरकटे म्हणून गणेशपंतांनीं विनयानें नुसती मान लवविली.

" अरे मामलेदारसाहेब, पो..." पोळीचा बकाणा कलेक्टरसाहेबांच्या तोंडांत अजून तसाच होता. " अरे मामलेदारसाहेब, आमाला तुमीं मागल्या वक्तींच का न्हाय सांगितलं? बरा, बरा......गणेशपंत, तुमचा उत्पन्न छुटला हाये. " इतकें बोलून साहेब टेबलावरून उठले.

गणेशपंतांनीं शरीर दुमतें तिमतें करून साहेबांना वंदन केलें आणि ते बाजूला सरले. साहेब पलीकडच्या दालनांत जातांच गणेशपंतांनीं मामलेदारांचे पाय घट्ट धरले. मामलेदार म्हणाले, " येत्या पहिल्या तारखेला तुम्हांला हुकूम मिळेल. "

आणलेल्या परातींत गणेशपंतांनीं दिलेली थोडीशी भाजी सोडली तर बाकीचा सगळा खर्च अर्थातच मामलेदारसाहेबांचाच होता.

आज बगडुताईच्या मनांत आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. उत्पन्न सुटल्याचा हुकूम घेऊन एकदोन घटकांपूर्वीं गणेशपंतच घरीं आले होते. पोरांना फारसें कांहीं कळत नव्हतें; पण आईबाप खूप आनंदांत आहेत हें पाहून तींहि नाचूं उडूं लागलीं.

गणेशपंत म्हणाले, " घे ! मला सारखी शिव्या देत होतीस ना ? पाहिलंस साहेब किती कृपाळू आहेत तें ! आपण त्यांना काय देत होतों– शेतांतून कुरतडून आणलेल्या गोवाऱ्या, नाहीं तर भेंड्या ! पण अग, – आज सातशांचं अविच्छिन्न उत्पन्न साहेबांनीं घरांत आणून घातलं. "

आज मात्र बगडुताईनीं ओशाळून त्यांच्याकडे पाहिलें.

संध्याकाळच्या वेळीं बगडुताई आणि गणेशपंत गणपतीच्या देवळांत गेलीं आणि त्यांनीं देवापुढें साष्टांग दंडवत घातले. गणेशपंतांच्या डोळ्यांत

प्रत्यक्ष अश्रु आले. खिशांतले पांच रुपये काढून त्यांनीं गाभाऱ्याच्या उंबऱ्यावर ठेवले. पुजारीबोवा थक्क झाले......

गणेशपंतांचें उत्पन्न सुटल्याची वार्ता हां हां म्हणतां गांवांत पसरली, आणि ' सुसरीच्या दाढेंतलं माणिक तुम्हीं काढलं ' अशी शाबासकी मित्रांनीं त्यांना दिली.

आज गणेशपंतांच्या शेतावर हुरडा खाण्यासाठीं साहेब, बाईसाहेब, आणि मनुताई आलेल्या आहेत. पसरलेल्या जाजमावर सर्वांना बसवून गणेशपंत स्वतः हातावर कोंवळा हुरडा चोळून फुंकून त्यांच्यापुढें ठेवत आहेत. बगडुताई दह्याच्या, चटणीच्या वाट्या आदरानें त्यांच्यापुढें सरकवीत आहेत. गणेशपंत दारिद्र्यांतून मुक्त झाले आहेत, आणि हें केवळ ' वंदनं पादसेवनम् ' याचें फळ आहे.

# ४

# तान्या रनर

कुणाची गांठ कुठें पडते आणि कोणता बनाव कसा बनत जातो याचा खरोखर नेमच नसतो. दिवेलागणीच्या सुमाराला पुण्याच्या बुधवार चौकांतील एका लहानशा चिंचोळया दुकानाच्या तोंडाशींच मालकाबरोबर बोलत मी उभा होतों. सडकेच्या पलीकडे बुधवारच्या बागेच्या अंगाला एक छकडा सुटून पडलेला होता. संध्याकाळची वेळ; अर्थात् माणसांची ये-जा जोरानें चालू होती. परंतु कामधंदा संपवून विश्रान्तीसाठीं आलेले किंवा कामधंदा न मिळाल्यामुळें बसून बसून आंबून गेलेले किती तरी लोक बागेच्या आसपास पिचकाऱ्या मारीत किंवा विड्या फुंकीत बसलेले होते.

काय झालें असेल तें असो,—त्यांतल्याच एखाद्या नादार बेकारानें विडीचें थोटुक फेंकून दिलेलें असो, किंवा छकडेवाल्यानें नुकताच लावलेला कंदील वाऱ्यानें एकाएकीं पेटला असो, पण छकड्याच्या कण्याखालीं लोंबत असलेला पोत्याचा धडपा एकाएकीं पेटला, आणि 'अरे – दसरत, दसरत, छकडा पेटला — छकडा पेटला ! –' असें भोंवतालचे अनेक लोक ओरडले. छकड्याचा मालक दशरथ खिन्न मनानें इकडे तिकडे बघत शेजारींच उभा होता. तोहि दचकून तिकडे वळला. पण आसपासचे लोक आग विझवण्यासाठीं जसे आवेशानें धांवले तसा तो धांवला नाहीं. लोकांनीं दोनतीन मिनिटांत आग विझवून टाकली. दशरथ मात्र अधिकच खिन्न होऊन त्या जळिताकडे बघत राहिला.

इतर चारचौघांबरोबर मीहि लगबगीनें तिकडे गेलों होतों. दशरथाची ती तटस्थ वृत्ति पाहून मला नवल वाटलें. आग विझली होती; दिवेलागणी झाली होती; आणि ज्याला त्याला आपापल्या घरचे कामधंदे होते. भोंवतालची गर्दी जलदीनें कमी झाली; आणि मग जणूं कांहीं माझी मागल्या जन्मींची ओळख असावी, अशा आपुलकीच्या आवाजानें दशरथ मला म्हणाला, " काका ! दुस्टांनीं आग विझवली हो ! "

हे त्याचे शब्द ऐकून मीं चकितच झालों ! लोकांनीं त्याचा छकडा वांचवला होता, आणि ज्यांनीं ती आग विझवली त्यांना इतर लोकांनीं दुवा दिला होता कीं, ‘ तुम्हीं गरिबाच्या पोटाचं साधन जिवंत ठेवलंत. पण दशरथकडे बघावें तर तो अधिकच खिन्न झालेला,—आणि तो मला पुन्हां म्हणतो, “ काका, दुस्टांनीं आग विझवली हो ! ”

मी दशरथच्या तोंडाकडे निरखून पाहूं लागलों. तों मला वाटलें कीं हा छकडे-वाला केव्हांचा तरी आपल्या ओळखीचा असावा. पण मला त्याची खरी ओळख पटत होती ती त्याच्या आवाजावरून. तीसतीस चाळीसचाळीस वर्षें गेलेलीं असलीं तरी लहानपणीं ऐकलेला आवाज आणि माहीत झालेली बोलण्याची ढब जर पुन्हा ऐकली तर इतक्या दिवसांनंतरहि ती जुनी ओळख पटते, आणि हा मनुष्य अमकाच असला पाहिजे असें ठाम वाटूं लागतें, असा माझा तरी अनुभव आहे. दशरथच्या आवाजावरून मला निश्चित वाटूं लागलें कीं, हा आपल्या ओळखीचा असला पाहिजे. पण त्या माझ्या ओळखीच्या माणसाचें नांव दशरथ नव्हतें, त्याचें नांव तानाजी होतें.

मी त्याच्याकडे पुन्हा पुन्हा पाहिलें. तोहि थोडासा गांगरल्यासारखा झाला. या गृहस्थापुढें जें बोलूं नये तें आपण बोलून गेलों, असें त्याला वाटत आहेसें दिसलें. पण आतां त्याला इलाज नव्हता. सहजगत्या टाकलेला विश्वास अधिकच दृढ करून दशरथ माझ्याकडे बघत उभा राहिला.

लोकांना आपापलीं कामें होतीं. आग लागली ती विझली.—हा थोडयाशा वेळापूर्वीं घडून आलेला लौकिक चमत्कार सडकेवरील घडामोडींत एकदम मागें पडला; आणि दशरथ व मी येवढेच शिल्लक राहिलों.

रोखून पाहतां पाहतां, तीस वर्षांपूर्वींची माझी बालपणची स्मृति जागी झाली, आणि दशरथचा दंड धरून मी त्याला आपुलकीच्या पण ठाम आवाजानें म्हटलें, “ तानाजी ! तूं इकडे कोणीकडे ? ”

तानाजी वयानें माझ्यापेक्षां किती तरी मोठा होता. त्याच्या दाढीमिशा कांहींशा पिकलेल्या होत्या. पण मंडईच्या खुंटावर त्यानें आदल्या दिवशींच हजामत केलेली असल्यामुळें त्याचा चेहरा बराच साफ दिसत होता. त्याचे नाकडोळे मीं चांगले ओळखले.

' तानाजी ' हें नांव माझ्या तोंडून बाहेर पडतांच दशरथ अगदीं गोरामोरा होऊन गेला, आणि त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. चमत्कारानें आणि उत्सुकतेनें तो माझ्याकडे पाहूं लागला; आणि मी पुढचा प्रश्न टाकतांच त्याची उत्सुकता अगदीं कळसाला पोंहोंचली. मीं त्याला विचारलें, " तानाजी, तूं मुळ्याच्या वाडीचा, नव्हेस का ? "

गोष्ट अगदींच जवळ येऊन ठेपली; आणि उत्सुकतेनें तो थोडा प्रफुल्लित झालेला असला तरी विस्मयानें थिजून गेला. माझ्या प्रश्नाला ' हो ' म्हणण्यापलीकडे तानाजीला दुसरी गतीच नव्हती. उपासमारीनें आणि काळजीनें क्षीण झालेले पण मूळचे बळकट असलेले बाहू तानाजीनें पसरले, आणि आम्हांमधलें सांस्कृतिक अंतर दूर झुगारून देऊन मला कवटाळून घेऊन तो म्हणाला, " काका, खरी गोष्ट. मी वाडीचाच हाए. मी तानाजीच हाए. " आणि मग डोळ्यांतील टिपें पुरतीं पुसून तो मला म्हणाला, " पन काका, तुम्ही कोन व्ह ? "

तीस वर्षांच्या बोगद्यांतून आम्ही दोघेहि मागें पलीकडे गेलों. तानाजीचें म्हातारपण पुण्याच्या छकड्यांत राहिलें, आणि आतां तो मुळ्याच्या वाडीचा तरणा बांड तानू बनला. माझीहि ताठर जवानी छकड्यापाशीच राहून गेली आणि मी दहा-अकरा वर्षांचा खेडेगांवचा लहानसा पोरगा बनलों.

तानूनें पुष्कळ कल्पना चालवून पाहिली; पण त्याला ओळख पटेना. मी तानूला लहानपणीं पाहिलें होतें, तेव्हां तो चांगला वीसपंचवीस वर्षांचा असेल. त्या वयापर्यंत त्याची छबी कायम झाली होती. अर्थात् आतां तीस वर्षें पुढें गेलीं तरी ओळख पुरती बुजावी इतका फरक त्याच्या चेहऱ्यांत घडला नव्हता. उन्हातान्हांत जन्मभर केलेल्या कष्टांनीं त्याचा चेहरा रांपलेला, ओठावरच्या मिशा वयानें करड्या झालेल्या, आणि दारिद्र्यानें अंगाची कळा मालवलेली होती; पण इतकें असूनहि तानूचें खेडेगांवचें तें रूप मला येथें दिसूं लागलें. वाढत्या वयाबरोबर माझी चर्या अर्थात् पुष्कळच बदललेली होती. मोठमोठ्या काळ्याभोर मिशा, उग्र चेहरा, आणि जाडजूड बनलेली खंबीर शरीरयष्टि यांची भर पडल्यामुळें तानूनें ओळखावा असा मी उरलों नव्हतों. अर्थातच त्याच्या मनांतील अनोळखीचा गोंधळ चालूच राहिला.

मीं त्याला म्हटलें, " सुळ्याच्या वाडीचे गणू आणि महादू तुझ्या ओळखीचे होते ना ? "

" काका, तुमी तर लांबच्या गोष्टी सांगताया. गणू अन् महादू हे तर माझ्या मावळणीचे मुलगे. त्यांना जाऊन लई दीस झालं. "

" तानू, तुला नानांची आठवण आहे ना ? " आतां त्याचा चेहरा जास्तच खुलला. आपल्या मूळच्या गांवांत आपण आहों असें त्याला वाटूं लागलें.

" व्हय, व्हय. नाना तर आमच्या गांवचं जमीनदार अन् सावकार ! "

" प्लेगाच्या वेळीं तुमच्या वाडीच्या रानांत रहायला नानांच्या बरोबर पुष्कळ माणसं आलीं होतीं, हें तुला आठवतं ना तानाजी ? "

" व्हय, व्हय. पिलेगांत लई मानसं आमच्या शिवाराला आलीं हुतीं. एकदां तर समद्यांच्या झोंपडया जळून खाक झाल्या !—"

" बरोबर ! मग आम्ही सारे तुमच्या वाडींत रहायला आलों होतों. "

आतां मात्र वस्तु अगदीं जवळ आलीशी पाहून आपले जीर्ण डोळे विस्फारून तानूनें माझ्याकडे पाहिलें, आणि माझ्या हाताला धरून तो म्हणाला, " दादांचं न्हानगं भाऊ न्हवं का तुमी ? "

त्याच्या हाताचा तो खरबरीत पंजा दोन्ही हातांनीं धरून मी आनदांतिशयानें म्हणालों, " हो, मीच तो. मीच तो ! माझ्या डोक्यावरचं जोंधळ्याचं बोचकं वरची गांठ सुटून चारी दिशा सांडलं, तेव्हां जवळ येऊन, तानू, तूं तें मला पुन्हा भरून बांधून दिलंस, याची आठवण तुला आतां होत असेल ! "

ओळख नक्कीच पटली; आणि मी उचलण्यासारखा असतों तर तानूनें मला दोन्ही हातांनीं उचललेंहि असतें.

इतक्यांत माझ्या मनांत एक लहर चमकून गेली. ' थोडा थांब ' असें म्हणून मी तट्कन् निघालों आणि दगडू हलवायाच्या दुकानाकडे जाऊन थोडीशी मिठाई घेऊन आलों. इतक्या वर्षांपूर्वीच्या एका अश्राप जिवाच्या ओळखीचें पुनरुज्जीवन आतां व्हावयाचें होतें !

बुधवार चौकाच्या तेव्हांच्या बागेंतील एका दगडावर बसून आम्ही ती मिठाई खाल्ली, आणि मग विश्वासाच्या आवाजानें मी त्याला म्हणालों, " तानू, तूं पुण्याला इतक्या दूरच्या ठिकाणाहून कसा रे आलास ? अन् तुझ्या छकडयाची आग विझवणारे दुष्ट रे कसे ? "

" त्याचं असं झालं बघा, काका, तुमी न्हान होतां; दुष्काळ पडला; वाडीला पाण्याचा थेंब उरला नाहीं. "

" न्हाव्याची विहीरसुद्धां आटून गेली ? "

" हां, न्हाव्याची विहीर – बिहीर सारं — रान कोरडं ठनठनीत होऊन गेलं. वाडीचं सारं शिवार उन्हानं होरपळून निगालं. सारा मुलूख चिनचिन करूं लागला. "

" मग तुला गणूनं जवळ केलं असेल ? "

" त्यांनीं चार दीस तुकडा घातला; पण मला लाज वाटूं लागली. म्हणून तुमी व्हतां त्या गांवाला आलों, आन् एका वान्याच्या दुकानावर नोकरीला ऱ्हायलों. माझ्याकडे पाहून वाणीदादा म्हणे, ' हा केवढा दांड गडी, पर अन्नावांचून सुकत चालला आहे ! ' मला वाटलं, बरे दिवस आले. पोट भरूं लागलं. अन् मी पुन्हां अंग धरलं. पन् कुसाबाई कुरकुरूं लागली, ' हा नवा गडी दुकानांतला माल चोरून खातो. '

थोडेंसें हसून मीं तानूकडे पाहिलें.

माझा रोख ओळखून तो म्हणाला, " काका, भुकेच्या वेळीं मूठभर हरभऱ्याची डाळ अन् गुळाचा खडा म्यां खाल्लाबी असल. "

" एखादी खोबऱ्याची वाटी, नाहीं तर दोन खारका.— अरे, पोतं पोतं पडलेलं असायचं. "

" त्येच म्हनतों न्हवं का ! तळं राखील तो पाणी चाखीलच. व्हय का न्हवं ? "

" हो, पण हें पाणी तुला चांगलं मानवलं ना ? "

" हा, काका. पोटांत भुकेनं आग पडलेली; जेवणाच्या वेळच्या तुकड्यानं भागत नसे. डोळ्यांपुढं तर इतका माल पसरलेला, अन् राकनदार मीच. तुमी चोरी म्हना, काईबी म्हना, पन— "

" अरे कशाची आल्येय चोरी! जाऊं दे. तूं खाल्लेस ना? याचंच मला समाधान आहे. "

" पन् दादा, त्ये अंगावर आलं. मी अंगानं चांगला सावरलों, अन् कुसाबाई भारीच वरडायला लागली. सरतशेवटीं वाणीदादानं बायकूचं त्वांड बंद करायसाठीं मला निरोप दिला. "

" चला ऽऽऽ! मग पुढं कुठं गेलास? का एकदम पुण्यालाच आलास?"

" अव कुठलं पुन्याला येतोंय! पुन्याचं नांवबी मीं तवां ऐकलं न्हवतं. वाण्याच्या दुकानावर होतों, तवां लई गिऱ्हाइकांच्या वळखी झालेल्या. त्यांत एक पोस्ट-मास्तर व्हता, त्याच्याकडं गेलों. त्यानं माझ्याकडं पाहिलं अन् तो म्हणाला, ' तान्या, लेका, तुला नोकरी देतों. पण करशील का? रनरची नोकरी आहे. वाण्याच्या घरचं खारीक-खोबरं खाऊन चांगला गलेलठ्ठ झालायस. दहा रुपये पगार मिळेल. अरे, चार रुपयांत पोट, सहा रुपये शिल्लक. पुढच्या वर्षाला लगीन ठोक! लग्नाचं नांव निघतांच माझा जीव एकदम खुलला. पण रनरची नोकरी डोळ्यांपुढं दिसूं लागली. "

" हां, पांच मैल पळत यायचं अन् पांच मैल पळत जायचं; खांदाडीला टपालाची कातडी पिशवी, अन् हातांत खुळखुळ्याची काठी; – होय ना? मला तो लहानपणचा दुसरा एक रनर आठवतो. "

" म्या ' होय ' म्हटलं. अन् दुसऱ्या दिसापासून गळ्याला कातड्याची पिशवी अन् हातांत खुळखुळ्याची काठी घेऊन मी स्टेशनच्या रस्त्याला रात्रींअपरात्रीं धावूं लागलों. लोक मला ' तान्या रनर ' म्हणूं लागले. "

" काय रे, मग पुढल्या वर्षी लग्न ठोकलंस ना?"

" त्येंच सांगतु ना काका! ते दहा रुपये अंगावाटे निघूं लागले. पळतां पळतां तोंडाला फेस येई, अन् निढळाचा घाम दहादां निरपावा लागे. एकदां पोस्टांत येऊन ' हुश्श ' केलं म्हणजे तास दोन तास मुडद्यासारखा पडत असे. मास्तरदादा बरा माणूस होता. जागा झालों म्हणजे दोनचार झुरके मारलेली आपली चिलीम तो माझ्यापुढें करी. छापी झाडून जोरजोरानं

झुरका मारला म्हंजे जरा बरं वाटे. पुन्हां गळ्यांत पिशवी अडकवून परत डाक न्यायची, असं सत ना नीत चालू झालं."

"होय, पन लग्नाचं काय झालं?"

"हां, पण त्यें का सयजीं होतंय का? चारपांच वरसं तरी ही पिशवी अडकवून पळत होतों. वाण्याच्या घरचं खारीक-खोबरं पार बाहेर पडलं. पळतांना चेपल्यासुद्धां नकोशा वाटत. मग धुळींतनं पळतांना गुडघ्यापर्यंतचे पाय घामांत मुरलेल्या धुळीच्या किटणानं बरबटून जात. पण एक गोष्ट बरी होती कीं, मी पोटभर खात व्हतों. एक बंदा टाकला म्हणजे सहा पायली जोंधळे मिळत असत. कांदा, लसून, उडदाची डाळ,-होय, नव्हे- आणखी तीन रुपये जात. चार रुपयांत पोटाचा दरा चांगला भरत असे. महिन्याच्या महिन्याला मी सहा रुपयांची माया करी."

"तानाजी, तुला तेव्हां सुख लागूं लागलं हें ऐकून मला आजहि बरं वाटतं आहे. पण इतकं असूनसुद्धां तुला एकटं एकटं वाटत असेल."

"खरी गोष्ट. पण एकदां असं झालं, कीं मी ज्या सडकेनं पळायचा तिच्या कांठाला एक मळा होता. त्याचा मालक पिलेगांत उलातला. बायको अन् आठदहा पोरं—जशी खंडोबाची जत्रा—अशीं मागं राहिलीं. मधून मधून मी केव्हां तरी त्या मळ्यांतल्या गोठ्यांत पाणी पिण्यासाठीं थांबायचा, म्हणून माणसांची वग पडली. जानकाबाई एके दिवशीं मला म्हणाली, 'तानबा, माझी मदली मुलगी तुम्हीं करतां का? धा वर्सांची झाली, आतां तिचं लगीन केलं पाहिजे.' माझ्या आणि मुलीच्या वयांत किती तरी अंतर होतं. पण न्हवरी याच्याहून मोठी कधीं मिळायचीच नाहीं. जानकाबाईची चिमी गोरीभुरकी होती; मलाहि लोभ सुटला. चारपांच वर्षांत होईल न्हातीधुती, असं समजून म्यां होकार दिला."

"छान! हा योग बरा जमला. जानकाबाईनं शब्द टाकला अन् तूं होकार दिलास. आड नाहीं अडचण नाहीं."

"तसं कुठं व्हतंय काका! जानकानं माझा होकार घेतला अन् मग तिडा घातला. ती म्हणाली, 'मला तुम्ही पोरीचं पांचशें रुपई द्या!'

काका, मी तर दचकलोंच. जानकाबाई आपला हट सोडीना. अतां मी एकला जीव; आय न्हाय, बाय न्हाय, भाऊ न्हाई, भईन न्हाई. वाटलं, लगीन झालं तर बायकुपरी बायकु होईल अन् चार मायेचीं माणसं मिळतील. म्हणून कणतकुथत पन ' व्हय ' म्हणालों. लगीन झालं, पोस्ट मास्तरनीं पांच दिवसांची रजा दिली. मग हळदीनं पिवळ्या झालेल्या अंगावर पुन्हां पत्रांची परवाल लटकावली, अन् पळायला लागलों.

" पण तानाजी, आतां जानकाबाईच्या गोठ्यांत तुम्ही रोज थांबायला लागलां असाल; आतां तुम्हांला रोज तहान लागूं लागली असेल ! "

तानू मनापासून हंसला.

" तुम्हीं बराबर वळखलं. चिमी लहानच व्हती; माझा खुळखुळा ऐकूं येऊं लागला कीं; विहिरीवर धुणं धूत असलेल्या आईला ओरडून ती सांगायची, ' तानुजी रनर आले, तानुजी रनर आले. '—लहान पोरगी, तिला न्हवरा काय अन् बायकु काय ? "

" मग कांहीं घरबीर केलं का नाहीं रे ? "

" कसलं करताय घर, काका ! सारा पैसा जानकाच्या वस्त्यांत वतला—अन् आतां चिमीला हें घ्या, चिमीला तें घ्या, हें सुरू झालं. शेवटीं पैसा पुरेना; अन् मी कावराबावरा झालों. "

" म्हणजे रनरकी सोडून दिलीस कीं काय ? "

" बराबर बोललांत ! वाडीला एक लष्करचा शिपाई व्हता. तो म्हमईहून आला म्हणजे सगळीं माणसं त्याच्याकडे टकमका बघत. तो मला एकदां म्हणाला, ' लेका तान्या, बरा आडवातिडवा दिसतोस, अन् चामडं गळ्यांत अडकवून तोंडाला फेस आणतोस; तुला लाज न्हाई का वाटत ? चल माझ्याबरोबर म्हमईला." मी लगीन झाल्याचं बोललों. तो म्हणाला, ' लेका, बायकु बुरखुंड्यासारखी टिचभर; हितं राहून काय करतोस ? ' अन् कोणाला न कळवतां या लष्करच्या शिपायाबरोबर मी म्हमईला गेलों. "

" शाबास ! अन् मग जानकाई अन् चिमी ? त्यांना तर कळवायचं ? "

" म्हमईहून कागुद लावला अन् धा रुपये धाडले. शिपायानं मला एका गिरणींत चिकटवून दिलं. "

" म्हणजे तूं आतां मुंबईकर झालास."

" मग माझा पेहराव पालटला. मी तीन बीचा फेटा घालूं लागलों. पांच हाती पंचा टाकून सात हाती गुंडाळूं लागलों. पर काका, माझ्या ध्यानीं ना मनीं अशी एक गोष्ट घडली. "

" मी सांगतों तुला काय झाली असेल ती ! तूं गिरणीवाल्याचा वैरी बनला असशील, अन् श्रीमंताला शिव्या देऊं लागला असशील. "

" तुमी बरोबर वळखलंत. तरणीं तरणीं बामनाचीं पोरं फाड् फाड् बोलत, अन् तुमी काई म्हणा, मला तें खरं वाटाया लागलं. "

" अरे, मी काय म्हणूं ? मलासुद्धां तें खरं वाटतं."

" मग म्हमईला मोटी चळवळ झाली, संप झाले. घसा फोडून मी 'झिंदाबाद मुर्दाबाद' करायला लागलों. माझी मर्दाची गर्दन फुगवून मी ओरडूं लागलों म्हंजे सारे कामकरी अन् पुढारी माझी वाहवा करीत. मी स्वतःच लहानसा पुढारी झालों अन् चांगला जोगावूं लागलों."

" अरे, पण चिमीचं काय झालं ? "

" खरं सांगूं काका ? माझं मन चिमीकडं पुन्हा पुन्हा जाई. एकदोनदां मी गांवाला जाऊनहि आलों; पण चिमी जेवढी होती तेवढीच दिसली. तिला पालवी बी फुटंना अन् रंगबी भरंना ! बायकोच्या आशेनं असाच पुन्हां आलों—गेलों. पण म्हमईला माझ्या हातनं चुका झाल्या. "

" तानाजी, तें तूं सांगूं नकोस. तुमच्या दोघांच्या वयांत इतकी तफावत; तूं दांड गडी, अन् तुझ्या खिशांत पैसा खुळखुळणार. तुझ्या हातून चुका होणारच. "

" अन् काका, शेवटीं सासुबाईच्या मनांत पातक आलं. "

" काय, जानकानं फिर्याद केली काय ? "

" फिर्याद कुठली करत्येय ! एक दिवशीं तिच्या तालुक्याच्या गांवचं एक वर्तमानपत्र माझ्याकडं आलं. त्यांत एका वाकिलानं चिमीच्या नांवची

मला नोटिस दिलेली होती, ‘ तुमचं–माझं लग्न होऊन इतके दिवस झाला पण तुम्हीं मला कधीं नांदायला नेलं नाहीं. पंधरा दिवसाच्या आंत जर नेलं नाहीं, आणि न्यायच्या आधीं माझ्या आईला माझ्यासाठीं आतां-पर्यंत जो पांचशें रुपये खर्च झाला तो दिला नाहीं तर मी जातिरिवाजा-प्रमाणें दुसरा घरोबा करीन. आणि मग तुमचा माझ्यावर नवरेपणाचा हक्क रहाणार नाहीं.’ ही नोटिस वाचून मी अगदीं थिजून गेलों. मला वाटलं, हें शहाणपण चिमीचं न्हवं.’

“ मग यांत जानकाईच्या मनांतलं पातक कोणतं रे ? ”

“ अहो, माझ्याकडनं चिमी एकदां मोकळी झाली म्हणजे तिचा दुसरा घरोबा करतांना पुन्हा एकदां चार-पांचशें रुपये काडायचं ! ”

“ अरे बाप रे ! ”

“ मीबी संतापलों. माझाबी जीव तिथून उडालाच व्हता; कारण मी फार दिवस खोळंबलों व्हतों; आणि माझा जीव दुसरीकडं लागूं लागला व्हता. ”

“ पण तुझ्या त्या ‘ झिंदाबाद ’कडून या छकड्यावर तुझी बदली कशी झाली ? ”

“ या नोटिशीनं माझं हुर्द (हृदय) नुसतं जळत होतं. इतक्यांत चळवळ ओसरली; बावटेपुढारी आपापल्या घरीं निघून गेले; प्रसंग गिरणीमालकाशीं पडला. ‘ मालकाचा मुर्दाबाद ओरडणारा तो हाच ’ म्हणून मालकाची नजर माझ्यावर होतीच. मी वेळेवर येत नाहीं, अशी लटकीच सबब काढून मला त्यानं चारचौघांच्या देखत गिरणींतनं हांकून लावलं. ”

“ पण तुझा पक्ष घेऊन कुणी भांडायला आलं असेल कीं नाहीं ? ”

“ अव काका, तें सारं चळवळ जोरांत असली म्हनजे व्हतं. ती थंड झाली म्हंजे मालक पुन्हा शिरजोर व्हतात. संतापानं बेभान होऊन मी म्हमई सोडली अन् हिकडं पुण्याला आलों. स्वाराच्या गेटाकडं एका पावन्याच्या घरीं उतरलों. पावन्यानं एक छकडा ठेवला व्हता. ह्योच तो

छकडा. इकल्यांत पावना दगावला अन् छकडा मीं पत्करला. मालकाला रोज दोन रुपये द्यायचे; बाकी कमाई आपली. ”

“ मालकाला तुझ्या हातनं रोजचे पैसे गेले नसतील खास. ”

“ खरी गोष्ट. बाकी थकतां थकतां मालक म्हणाला, ‘ आतां जर पैसे दिले नाहींस तर तुरुंग दाखवीन.’ मला छकडा सोडतांहि येईना नि ठेवतांहि येईना. जळला असता तर मी मोकळा तरी झालों असतों, नाहीं तर जाळला म्हणून तुरुंगांत तरी गेलों असतों. ”

“ म्हणून आग विझविणारे दुष्ट होय ? अरेरे ! तानाजी, तुझ्या मनाची ही दैना पाहून मला भारी वाईट वाटतं. पण तूं घाबरूं नकोस. कांहीं ना कांहीं तरी घडेल, अन् तूं या जाचांतून मोकळा होशील. ”

मेवामिठाईहि संपली होती अन् भाषणांतली गोडीहि संपली होती. तोंडाला कडवट चव येऊन मी आपल्या घरीं गेलों, आणि तानाजीहि खिन्न होऊन छकड्यांत जाऊन पसरला.

मधूनमधून चार-सहा दिवसांनीं त्याची माझी गांठ पडत असे. कांहीं भाडें असलें, सामानाची ने–आण करायची असली तर मी नेमका तानाजीला बोलावूं लागलों. होतां होतां, एक दिवशीं मोठा चमत्कार घडून आला. आमच्या पलीकडच्या वाड्याच्या अंगणांत दोन बाया वाड्याच्या मालकिणीशीं बोलत उभ्या होत्या. आमच्या घराच्या माडीतून त्यांचें बोलणें मला ऐकूं येत होतें आणि त्या बायाहि दिसत होत्या. एक चाळिशीच्या बेताची गोरीभुरकी अन् तिच्या डोक्यावर एक धान्याचें बोचकें. दुसरी तिच्याहून लहान, आणि तिला वागवून घेण्याच्या ऐटीनें बोलणारी.

ती मालकिणीला म्हणाली, “ काकी, कुणाला नकळत बाजरी आणावी लागते, अन् तुमी इक्ती सस्त कशी मागतां ? ”

कांहीं थोडें होय–नको झालें, सौदा पटला, आणि त्या पहिल्या बाईनें बाजरीचें गांठोडें मालकिणीच्या पातेल्यांत ओतलें.

दोन–तीन दिवसांनीं पुन्हा तसेंच झालें. या वेळीं त्या बायांनीं तांदूळ आणले होते. तांदूळ घेतल्यावर मालकीण सहज म्हणाली, “ ही ओझं घेणारी तुझी कोण ग ? ”

" ती माझी भन,— मोठी भन. "

" मग हिला कुणी नाहीं वाटतं ? "

" काकी, हिचं लगीन झालं व्हतं; पन न्हवरा नेईना; खेडेगांवची वस्ती; त्यो बाबा कुठं हाये तेंबी कळंना. कागदांतनं नोटिस दिली तरीबी त्यो येईना. आई म्हंगाली, ' तूं दुसरा न्होवरा कर. '—" मी जागचा तट्कन् उठून हें सारें काळजीपूर्वक ऐकूं लागलों. " पन ही चांडाळीण म्हंगाली, " मी दुसरा न्हवरा करायची न्हाई. पइलाच कधीं ना कधीं भेटंल. "

मी उठलों आणि पलीकडच्या घरीं जाऊन त्या बाईची जास्त चौकशी केली. नवरा काय करीत होता, तो कोणत्या मुलखांतला, तो मुम्बईला गेला होता का—ही सारी चौकशी मीं केली.

आडाखे जमूं लागले, आणि माझ्या मनांत निराळाच तरंग आला. मीं त्या बोचकेवाल्या बाईला विचारलें, " तुमचं लग्न झालं तेव्हां नवऱ्याला काय म्हणत असत, सांगाल का ? " अशा निराश्रित, विमनस्क आणि हताश स्थितींतसुद्धां ती कष्टी स्त्री कांहींशी लाजली, भुईकडे बघूं लागली आणि म्हणाली, " त्येस्नीं ' तानाजी रनर ' म्हनत.

माझी अर्थातच खात्री होऊन चुकली कीं, तानाजीची चिमी हीच. मी तिला म्हणालों, " बाई, तुमचं नांव चिमी आहे का ? "

मान वर करून आणि डोळे पूर्ण उघडून ती विस्मयानें मला म्हणाली, " व्हय, मला चिमीच म्हनत्यात. पन दादा, तुमीं कसं वळाखलं ? "

" थांबा चिमाबाई, मी तुम्हांला हें उद्यां सांगतों. "

खरोखर या वेळीं चिमीचें ध्यान इतकें अश्राप, निरागस, केविलवाणें दिसत होतें कीं, माझी करुणाबुद्धि डोळ्यावाटे बाहेर पडेल कीं काय असें मला वाटूं लागलें. ती एक लांडें लुगडें नेसली होती. लुगडें दोनतीन निरनिराळ्या रंगांचीं जुनेरीं एकत्र शिवूनच केलेलें होतें. लुगड्याला पायघोळपणा नव्हता; म्हणून तिनें गुडघ्याइतका काचा मारला होता. ती बहिणीच्या घरीं होती खरी, पण हिचा उपयोग बहीण केवळ एक

मोलकरीण म्हणून करून घेत असली पाहिजे, हें तिच्या चर्येवरून स्पष्ट दिसून येत होतें.

तानुजी रनर, चिमी इत्यादि शब्द कानीं पडतांच या आपद्ग्रस्त स्त्रीचा मोक्षकाल जवळ आला आहे, हें मी उमगलं आणि त्या दोघींना मी मुद्दामच सांगितलं कीं, "मलाहि थोडे तांदूळ हवे आहेत. उद्यां तुम्ही दोन दोन पायल्या घेऊन या."

दोघी परतल्या; परत जातांना चिमीच्या मनांत काय कालवाकालव झाली हें सहज ओळखतां येत होतें.

मी संध्याकाळच्या वेळीं निघालों, तो बुधवारच्या बागेंतच आलों. खिन्न असलेले दशरथ राजे छकड्याशेजारीं बसून म्हमईच्या गोष्टी तिथल्या बेकार लोकांना सांगत होते. मी त्यांना बाजूला बोलावलें आणि म्हणालों, "तानुजी, तूं उद्यां दुपारीं माझ्या घरीं हटकून ये. असा चार वाजतां ये."

"काय कमजास्त, काका?"

"तानाजी, तूं जरा शान्त मनानं ऐक. तूं दिवसेंदिवस वठत चालला आहेस. तुला आई नाहीं, माई नाहीं, भाऊ नाहीं, बहीण नाहीं. —बायको होती, तीहि......" तानाजीनें मुक्यानेंच कपाळावर हात मारून घेतला! "—तुला मायेचं कुणी नाहीं. हा छकडा तुला भाकरी देतो. पण तो तुझीं आंतडीं जाळतो आहे. तुझ्या गांवाजवळ रेवणसिद्ध राखणीला उभा असतो. त्याची कृपादृष्टि तुझ्यावर वळेल असं वाटतं—" तानुजी माझ्याकडे आशेनें बघूं लागला. "—तो तुला आई देईल, बाई देईल, माई देईल, भाऊ देईल, बहीण देईल—" मी पुढें काय म्हणतों इकडे तानाजी उत्सुकतेनें पाहूं लागला. "पण आतां असं कर–" इतकें म्हणून मीं खिशांतले पंचवीस रुपये काढले.

"काका, तुमी हें काय करतां?" तानूनें भांबावून विचारलें.

"तें मी आतां तुला सांगत बसत नाहीं. असं कर, एक चांगली काळी चंद्रकळा घे; दोन सुंदर खण घे; वेणीफणीची पेटी बाजारांत मिळते ती विकत घे."

"काका, माझे केंस आतां करडे झाले आहेत. मला आतां लगीन करायचं न्हाई. गरिबीनं मी एकटा मरतोंय् त्याच्याऐवजीं दोघं कशाला मारतां ?"

"तानूजी, तूं असं अभद्र बोलूं नकोस. पण मी तुला लग्नहि करायला सांगत नाहीं."

"काका, तुम्ही म्हनताय तरी काय ?"

"माझ्यावर तुझा विश्वास आहे ना ? मीं तुला इतकी लहानपणची ओळख दिली ना ?"

"व्हय. तुमी माझं बरंच कराल."

"तर मग मी सांगतों हें सगळं सामान आणि एक शेरभर पेढ्यांचा पुडा,—एवढं घेऊन सांगितल्या वेळीं माझ्या घरीं ये."

इतकें सांगून मी परतलों. तानाजीच्या मनांत चमत्कारिक काहूर सुरू झालेलें मला लख्ख दिसलें. एक मंगल दिवस उगवणार म्हणून मलाहि हर्ष होत होता. दुसऱ्या दिवशीं ठरल्या वेळेच्या आधींच तासभर तानाजी आमच्या घरीं येऊन बसला. पुढें काय होणार आहे याचा सुगावा काढण्याची त्यानें थोडीशी खटपट करून पाहिली. पण मी जाणूनबुजूनच धुम्म बसलों.

थोडासा वेळ गेला, आणि डोक्यावर बोचकीं घेऊन त्या दोन्ही बाया आमच्या अंगणांत आल्या. बोचकी खालीं ठेवून विश्रान्तीसाठीं त्यांनीं 'हुश्श' केलें. आम्ही दोघेहि त्यांच्याकडे पहात होतों.

मीं मुद्दामच म्हटलें, "बाई, तुम्ही आपल्या मोठ्या बहिणीला आश्रय दिला हें बरं केलं."

"काय करावं काका ! बाप मेला, आई इचारीना, पैसा मातुर गिळून बसली.——"

तानाजी तिच्याकडे चमकून पाहूं लागला.

"ही दिली एका बाप्याला, तिला काय–कायबी कळत नव्हतं.–"

—तानाजीचें लक्ष अधिकच वेधलें.

" मग त्यानं काय तिला टाकून दिली ? "

" अवं टाकायला कशाला पाहिजे ! त्यो गेला म्हमईला निघून. "

" बरं बाई, तीं बोचकीं तेवढीं सोडा. " तेवढ्यांत सांगितल्याप्रमाणें घरांतून आमची मोलकरीण पातेलें घेऊन बाहेर आली. तिच्या पातेल्यांत बोचकीं रिकामीं होत असतांना आमचें बोलणें इकडे चालूच होतें.

" मी म्हंगाल्यें का ? – त्यो बाबा गेला म्हमईला निघून; अन् ही इकडं बसली झुरत. आतां न्हातीधुती झाली, तवा आई म्हंगाली, ' त्यो बाबा आपल्याला नंग ' —" तानाजीच्या जाड्याभरड्या देहांतली सारी माणुसकी, सगळा आत्मा डोळयांच्या आड एकत्र होऊन पाहूं लागला. तो भारीच अस्वस्थ झाला, आणि माझ्याकडे नि त्या मोठ्या बहिणीकडे आलटून पालटून पाहूं लागला.

" आई म्हंगाली, ' त्येला तूं नगस तर तुलाबी त्यो कशापायीं हुआ ? आपुन त्येला लोटिस दिऊं कागदांतनं '—"

" हां, नोटिसहि दिली का ? " मी उसन्या उत्सुकतेनें विचारलें.

" तर ! दिलीबी. पन त्यो बाबा हालंना का डोलंना. त्यो आपला म्हमईत मजा करतुया. "

तानाजी डोळे विस्फारून पाहूं लागला.

" तवां आई म्हंगाली, ' तूं दुसरा दादला कर ! ' पन ही चंडाळीण काय म्हनं, ' मला दुसरा दादला करायचा न्हाई, त्योच पयला कंदी ना कंदी भेटंल—' "

तानाजी एकदम म्हणाला, " काका, मला आतां कळलं ! बया, तुमचं म्हायराचं नांव चंद्राबाय का ? "

" व्हय, व्हय ! अन् हिचं—? "

तानाजी म्हणाला, " मीच तिचं सांगतों, ' चिमाबाई !' व्हय ना ?–"

तीं तीनहि माणसें एकदम उठून उभीं राहिलीं. तानूजी भावनेनें वेडा झाला. तो गेला अन् त्या मोठ्या बहिणीच्या हाताला धरून—

ती बिचकली !—म्हणाला, "चिमाबाई, नीट बघ, नीट बघ. तुला तुझा तानाजी रनर दिसतुया का ? "

चिमानें डोळे भरून त्याच्याकडे पाहिलें,–अन् तिचे डोळे भरून आले. निराशा, दुःख, एकाकीपणा, दैन्य, नश्वरता—सारें डोळ्यांतल्या एका एका टिपाबरोबर मनांतून वाहून गेलें. चिमीचें तोंड उल्हासानें न्हाऊन गेलें. मधलीं सारीं वर्षे लुप्त झालीं, आणि आपण पुन्हां नवऱ्याची बायको होत आहों या जाणिवेनें चिमी देहभान विसरून गेली.

" तानाजी, काढ ती चंद्रकळा, ते खण, काढ तें सारं–" मी म्हणालों.

दोन्ही हातांनीं आनंदाश्रु पुशीत तानाजीनें त्या वस्तु ओसरीवरून आणल्या. मी चिमीला म्हणालों, " चिमाबाई, तुम्ही वर या; आंत जाऊन नेसून या. "

चंद्राबाई केवळ बावरूनच हा देखावा पहात होती. ती चिमी पण लुगडें बदलतांच चिमाबाई दिसूं लागली. चंद्राबाईनें तिचा मळवट भरला. इतकें होईतों आमच्या घरांतील बायकामाणसें जमा झालीं. सर्वांनीं चिमाबाईची ओटी भरली, तिच्या हातांत नवे चुडे घातले.

" काका, ज्या मुखानं माजी चिमी म्हणाली, 'मी दुसरा दादला करनार न्हाई' त्या मुखांत तुम्ही आपल्या हातानं हे पेढे घाला."

" नाहीं, नाहीं. तानू, तो अधिकार तुझा आहे. तूंच तें तोंड गोड करायला पाहिजे ! "

मग त्यानें तिच्या मुखांत पेढे घातले. मी दोघांचे हात एकमेकांच्या हातांत दिले. दशरथाला कौसल्या मिळाली, तानाजीला चिमाबाई मिळाली. कुतूहल, चमत्कार, दैवयोग या भावनांनीं घर भरून गेलें.

—तानाजी आपला छकडा आतांशीं फार तरतुदीनें, इमानानें चालवितो. रामचंद्राच्या जन्माची वाट या उभयतां पहात आहेत.

## ५

# जनावर आणि माणूस

चंद्ररावांनीं पुष्कळ चुचकारून पाहिलें, आर्जवें केलीं, ' गंभीर ' ' गंभीर ' म्हणून त्याचें भजनहि केलें, पण हत्ती जाब म्हणून देईना. तो चारा खाईना, पाणी पिईना, आणि कुणी समोर आलेंच तर आसपास पडलेलें गवताचें चघळ तो त्याच्या तोंडावर फुत्कारूं लागला. काय करावें हें चंद्ररावाला कळेना.

गंभीर बाळपणापासून प्रतापसिंहमहाराजांच्या घरीं वाढलेला होता. रशीद माहुताच्या माहितीप्रमाणें गंभीरची अवलाद चांगलीच तजेल होती. रानावनांत हत्तीचें स्वातंत्र्य कायम रहात असलें तरी त्याच्या पोटाची पुष्कळदां आबाळच होते. एखाद्या वर्षी जशीं आपलीं पिकें येत नाहींत तसा रानांतसुद्धां गवताला आणि वनस्पतीला यावा तितका बहर येत नाहीं. कधीं झाडावर कीड पडते, आणि एखाद्या वेळीं वारें असें चमत्कारिक सुटतें कीं गवत हैराणच होऊन जातें. आणि मग स्वतंत्र वनवृत्ति भोगणाऱ्या ह्या गजराजांना दुष्काळाची हाय पोंचून ते अगदीं रोडावून जातात. पण प्रतापसिंहमहाराजांच्या हत्तीखान्यांत आल्यानंतर ' गंभीर ' नांव मिळालेल्या या छोट्या पिल्लाला कसलीच वाण पडली नाहीं. गंभीर मोठा भाग्यशाली निघाला. उंसाच्या मोळ्याच्या मोळ्या रोज त्याच्यापुढें येऊन पडूं लागल्या. गंभीरला महाराजांचें सारें कुरण मोकळें झालें, आणि मग पिल्लूं म्हणतां म्हणतां गंभीर एक–दोन वर्षांत ' गंभीर ' नांवाला खरोखरीच शोभूं लागला. हौसेला मोल नसतें;–आणि खजिन्यांत पैसा कोठून व कसा येतो याचें ज्ञान प्रतापसिंहमहाराजांना नव्हतें; आणि असलें तरी त्यांना त्याची फारशी फिकीर नव्हती. या हत्तीच्या छाव्याकडे महाराजांची दृष्टि सकाळ–संध्याकाळ लागलेली असे; आणि रशीदच्या हातीं गंभीरसाठीं भरपूर रसद रोजच्या रोज पोंचती होई.

हमीदा बदाम फोडीत असे. तूपसाखरेचे बनविलेले आणि मधूनमधून बदाम व बेदाणे खोंचून बसाविलेले कणकेचे गोळेच्या गोळे रशीद किंवा हमीदा गंभीरच्या सोंडेंत रोज सकाळीं देत असत. आणि यांतलेच बदाम नाहीं तर बेदाणे शेजारीं उभा असलेला छोटा अबू गंभीरकडे हंसत हंसत पाहून मटकावीत असे. सकाळची एवढी गोड न्याहारी झाली म्हणजे मग येऊन पडणाऱ्या उंसांच्या मोळ्या गंभीर कडाकड मोडूं लागे, आणि हमीदा त्याच्या आसपासचा केरकचरा काढीत असतांना अबू गंभीरच्या पोटाखालून पायांमधून खुशाल इकडे तिकडे हिंडत राही. 'खांब खांब खांबोळीचा' खेळ खेळतांना पोरें जशीं घरांतल्या खांबांना विळखे घालतात, तसा अबू केवळ मौजेखातर गंभीरच्या पायांना विळखे घालीत असे, आणि त्याच्या सोंडेच्या वेटोळ्यांत आपली मान गमतीनें देत असे. पाठीवर चढलेल्या रशीदची गंभीरच्या देहाची साफसफाई तिकडे चालूच असे. अशा प्रकारें रशीद, हमीदा, अबू, आणि गंभीर एका कुटुंबांत राहात.

प्रतापसिंहमहाराजांना चंद्ररावाची भीड मोडवेना. आपल्या सर्कशीचें उद्घाटन त्यानें महाराजांच्याच हस्तें केलेलें होतें. मागच्या पिढींतल्या एका ऐपतदार हुजऱ्याचा 'चांद्या' या नांवानें ओळखला जाणारा हा पोरगा मोठा हुन्नरी निघाला; आणि पुरेशीं माणसें नि जनावरें जमा करून त्यानें सर्कस काढली. चंद्ररावाचा आक्रम बघून, बापाचे लेक म्हणून 'महाराज' झालेले प्रतापसिंह मनांत थोडेसे चपापत असत. सर्कस सुरू झाल्यानंतर छातीवर अनेक झगमगीत बिल्ले लावलेला आणि जरीची टोपी घातलेला चंद्ररावाचा तजेल मोहरा रिंगणांत आलेला पाहिला म्हणजे प्रतापसिंहमहाराज कांहींसे दिपल्यासारखे होत. चंद्ररावाचा शब्द महाराजांना मोडवेना. त्याचा आग्रह चालला होता कीं, महाराजांनीं गंभीर हत्ती सर्कशीसाठीं देऊन टाकावा; निदान कांहीं वर्षे तरी त्याला सर्कशींत ठेवावें. होय–नाहीं होतां होतां गंभीर सर्कशींत गेला. मात्र गंभीरचें दान महाराजांनीं एका अटीवर केलें. गंभीरबरोबर रशीदलाहि नेलें पाहिजे, अशी अट त्यांनीं घातली; आणि चंद्ररावानें ती खुषीनें मान्य केली.

सेवाधर्म बाईट असतो. महाराजांची आज्ञा रशीद कशी तोडणार ?

हत्तीखान्यांतून गंभीर बाहेर पडतांना रशीदला अतिशय दुःख झालें. हमीदा ढसढसून रडूं लागली; आणि अबू त्याच्या सोंडेला कवटाळूं लागला. हमीदेनें शेवटचे लाडू त्याला चारले, आणि ' महाराज, तुम्ही मला देऊन टाकतां हें बरें करीत नाहीं ' असें जणूं कांहीं म्हणत म्हणतच गंभीर आपल्या हत्तीखान्यांतून बाहेर पडला. त्यांतल्या त्यांत एक बरें झालें होतें कीं, रशीद त्याच्याबरोबर होता. त्यामुळें आपण घराला अंतरलों असें गंभीरला वाटलें नाहीं, आणि गंभीर आपल्या घरांतून कायमचा गेला असें हमीदा आणि अबू यांना वाटलें नाहीं. पण गंभीरच्या डोळ्यांतून पड-णारें पाणी हमीदेच्या पदरावर आणि अबूच्या डोक्यावर जेव्हां रशीदनें पाहिलें तेव्हां त्यानें त्या गंभीर गजराजाला मुके घे-घेऊन दहादां कुरवाळलें. शेवटीं मागें वळून गंभीरनें सोंड वर केली, आणि हत्तीखान्याला व राजवाड्याला प्रणाम करून आणि वियोगाचा एक दीर्घ उच्छ्वास सोडून रशीदनें नेलें तिकडे तो गेला.

चंद्रराव गंभीरची निगा फारच चांगली ठेवूं लागला. अजून येवढें जनावर त्यानें आपल्या प्रेमांत कधीं घेतलें नव्हतें; परंतु हळूहळू नाना प्रकारच्या क्लृप्त्यांनीं त्यानें गंभीरला आपला लळा लावला. गंभीरच्या सेवेशिवाय दुसरें कोणतेंहि काम त्यानें रशीदला दिलें नाहीं. पण कांहीं बारीकसारीक कसरती रशीदकरवीं तो त्याला शिकवूं लागला. गंभीरनें ओळखलें कीं आतां आपला धनी बदललेला आहे.

चंद्रराव चांगला उमदा माणूस होता. हत्तीच्या शेजारीं उभा राहिला असतां तो चांगला शोभून दिसत असे. सर्कशीच्या वेळीं त्या गजराजाच्या दांताला धरून चंद्रराव त्याला मंडपांत आणीत असे. सुशोभित केलेला एवढा प्रचंड प्राणी पाहून प्रेक्षक लोक जागच्या जागीं उभेसुद्धां रहात. बहुधा सर्व लोकांनीं हत्तीचें फक्त चित्रच पाहिलेलें असतें. त्यामुळें प्रत्यक्ष हत्ती पाहून त्यांना पराकाष्ठेची मौज वाटते. चंद्ररावांच्या अंगांत मख-मलीचा भरदार कोट असे; आणि या कोटाच्या छातीवर झगमगीत बिल्ल्यांच्या रांगा लटकलेल्या असत. चंद्ररावांच्या डोक्यावर जरीची उंच टोपी झळकत असे. रिंगणांत आल्याबरोबर चंद्रराव आणि गंभीर प्रेक्षकांना प्रणाम करीत, आणि मग गंभीर आपल्या सोंडेच्या नाजुक स्पर्शानें

चंद्ररावाच्या अंगांतील तो कोट अस्तन्यांसकट हळूहळू काढून घेऊन पाठीवर बसलेल्या रशीदच्या हवालीं करी. हत्तीची ही कसरत पाहतांच प्रेक्षकांतून टाळ्यांचा गजर होत असे. पाठोपाठ गंभीर चंद्ररावांच्या डोक्यावरील जरीची टोपी हलकेच उचलून रशीदच्या हवालीं करी. प्रेक्षक पुनः एकदां टाळ्या वाजवीत. रिंगणांत आलेल्या घोड्यांचीं आणि कुत्र्यांचीं कामें चंद्रराव हातांत चाबूक घेऊन करवून घेई; आणि गंभीर हा प्रेक्षकाची भूमिका घेऊन व निश्चल उभा राहून हीं कामें सौम्यपणानें पहात राही. मात्र एखाद्या वेळीं जर का घोड्याचें किंवा कुत्र्याचें कांहीं चुकलें तर फूत्कार करून तो आपली नापसंती व्यक्त करी; आणि हाहि कार्यक्रमाचाच एक भाग आहे असें समजून कांहीं लोक टाळ्या वाजवीत. काम आटोपल्याबरोबर सोंड वर वळवून, रशीदच्या हातांतील टोपी घेऊन गंभीर ती चंद्ररावाच्या डोक्यावर अलगद ठेवी, अन् पुनः त्याचा कोट रशीदकडून घेऊन चंद्ररावानें पुढें केलेल्या हातांत एकएक अस्तनी चढवून तो त्याच्या अंगांत पुन्हां घाली. हीं कामें चालू असतां प्रेक्षकांतून सारखा टाळ्यांचा गजर चालू राही. पण खरी मौज पुढेंच असे. शृंगारलेल्या आपल्या धन्याला हा गजराज सोंडेनें उचलून आपल्या गंडस्थळावर बसवी; आणि चंद्ररावहि मोठ्या शिताफीनें त्याच्या सोंडेचा आश्रय घेई. चंद्ररावाला गंडस्थळावर घेऊन गंभीर सगळ्या रिंगणाला सावकाशपणें एक फेरी मारी, आणि प्रेक्षकांचे सलाम घेत घेत आंत निघून जाई.

पण हें सारें नित्य होत असलें तरी एखाद्या दिवशीं गंभीर अतिशय दुःश्चित झालेला दिसे. चार–दोन महिन्यांनीं सवड काढून रशीद आपल्या घरीं जाई. गंभीरला जर बोलतां आलें असतें तर ‘ माझा मित्र कुठें आहे ’ असें त्यानें आक्रोश करून विचारलें असतें. रशीद परत येतांच सर्व कामें पुन्हां सुरळीत चालू होत, आणि सोंडेचा फूत्कार पुनः पुन्हां करून गंभीर त्याला कवटाळी.

हमीदा आणि अबू आपल्या घरींच असत. प्रतापसिंहमहाराजांकडून त्यांना रोजचा शिधा मिळत असे; आणि कपड्यालत्त्याला वर लागणारा सारा पैसा चंद्ररावाकडून महिन्याच्या महिन्याला येई. पण त्यांचा गुजारा असा नीट चाललेला असला तरी हमीदेला चैन पडत नसे. आणि अबू

तर इकडे तिकडे पाहून आणि रिकामा हत्तीखाना सोडून देऊन गांवांत कुठें तरी भटकत राही. आपण कां भटकतों हें अबूला कळलें असतें तर बरें झालें असतें ! पण आईनें घातलेला भाकरीचा तुकडा खाऊन हत्तीखान्याकडून, राजवाड्याकडून पुनः पुन्हा हेलपाटे मारून श्रीमंत लोकांच्या माड्या-खिडक्यांकडे पहात मलिन झालेला अबू घरीं परत येई. हत्तीखान्यापुढें उभा राहून दोन बोटें तोंडांत घालून तो मध्येंच केव्हां तरी शीळ घाली, आणि राजवाड्याच्या खिडकींतून बाहेर डोकावतांना प्रतापसिंहमहाराज कधीं दिसले तर त्यांना नेहमींचा सलाम न करतां तो त्यांच्याकडे उपहासानें बघत राही. हत्तीखान्यांत हत्तीच नव्हता तर गवताचा केर पडणार कुठून? पण हमीदा झाडणी घेऊन तो हत्तीखाना नेहमींसारखा झाडून स्वच्छ करी. गंभीरच्या घुंगुरांच्या आणि घंटांच्या माळा हत्तीखान्यांत टांगलेल्या राहिल्या होत्या. हातांत काठी घेऊन अबू ते घुंगरू आणि त्या घंटा मधून मधून वाजवीत असे, आणि हमीदा त्याला रागें भरत असली तरी तो घुंगरांचा ध्वनि तिलासुद्धां राहून राहून ऐकावासा वाटे. पूर्वी गंभीरसाठीं कणिक, तूप, बदाम, बेदाणे, खारका, खोबरें कोठींतून नित्य येत असे; पण तें गंभीरचें भाग्य होतें; आणि त्याच्या भाग्यांत अबू आणि हमीदा यांचेंहि भाग्य सामावलेलें असे. पण आतां गंभीर दूर गेलेला होता. मग हे पदार्थ या बापड्यांना कोण देणार ? तीं केवळ भाकरीतुकडा खाऊन असत. अबू अगदीं हडकून गेला. त्याच्या रोडावलेल्या शरीराकडे पाहून, मधूनमधून येणाऱ्या रशीदला भारी वाईट वाटे. हमीदा त्याला म्हणे, ‘ आपला अबू किती वाळला आहे तें पाहिलंत ना ? ’ रशीद तिच्याकडे करुणेनें पाही, आणि तिला म्हणे, ‘ हमीदा, तूंसुद्धां किती वाळलेली दिसतेस. ’ आणि दोघें रडूं लागत.

पण रशीदचें दुःख निराळेंच होतें. गंभीरची निगा राखण्याचें काम रशीदकडे असल्यामुळें चंद्रराव रशीदचीहि चांगली निगा राखी. पंगतीला सुग्रास जेवण, आणि सर्कशीच्या इतमामाला शोभेल असा कपडालत्ताहि मिळत असल्यामुळें रशीद चांगला जोगावला होता. पण त्याला वाटे कीं, आपण येथें चांगलेंचुंगलें खातों, आणि आपल्या हमीदेला नि अबूला मात्र महाराजांकडून मिळणाऱ्या भरड शिध्यावर रहावें लागतें. पण याला

कांहीं इलाज नव्हता. मिळणाऱ्या पगारांतून घरीं कांहीं धाडावें तर सर्कशींतला पगार थोडा, आणि कित्येकदां अनिश्चितहि असे. अशा प्रकारें महिन्यांमागें महिने चाललेले होते.

पण एकच गोष्ट सारखी घडत रहाणें हें सृष्टीच्या नियमांत बसत नाहीं असें दिसतें. सर्व कांहीं ठीक चाललें असतां नेहमींनेहमीं मुक्काम बदलल्या-मुळें रशीदला अधूनमधून ताप येऊं लागला. हवा पाणी बदलण्याची त्याला संवय नव्हती. शेवटी एकदां त्याचा ताप एकाएकीं भडकला, आणि रक्ताच्या एकदोन गुळण्या येऊन रशीद मरण पावला. रशीद गेला म्हणून चंद्ररावाला जें कांहीं वाईट वाटलें असेल तें वाटलेंच; पण त्यांच्या-पुढें ताबडतोब एक मोठा बिकट प्रश्न येऊन उभा राहिला.

रशीद मेला हें इतरांप्रमाणें गंभीरलाहि कळलें, आणि मग तें प्रचंड जनावर इतकें कष्टी झालें कीं, त्याच्याकडे पाहूनच सारे सर्कसवाले लोक उदासीन होऊन गेले. गंभीर अक्षरशः ढळढळा रडूं लागला. पुन्हा पुन्हा फूत्कार करून तो आजूबाजूला पाहूं लागला. तो चाऱ्याला तोंड लावीना, पाणी पिईना, आणि कुणाला जवळ येऊं देईना. चंद्ररावाला मोठा पेंच पडला. मुक्काम हालविणेंहि त्याला कठीण झालें. धाक दाखवून, शिक्षा करून शुद्धीवर आणण्यासारखेंहि हें जनावर नव्हतें. गंभीर हा खरोखरीच मोठा गंभीर आणि जंगी प्राणी होता. आणि आतां तर तो रशीदच्या वियोगानें अगदीं भडकल्यासारखा झाला होता. त्याच्या अंगाला हात लावण्याची कुणाची प्राज्ञा नव्हती. शेवटीं चंद्ररावानें प्रतापसिंहमहाराजांना बोलावून घेतलें. महाराजांनाहि वाटलें कीं, आपण चुचकारल्यानें आणि जुनी माया पुन्हां दाखविल्यानें गंभीर शुद्धीवर येईल. परंतु महाराजांना पुढें पहातांच त्या त्रस्त प्राण्यानें बादलींतील पाण्याचे फूत्कार महाराजांच्याहि अंगावर केले. चंद्रराव आणि महाराज जलदीनें मागें सरकले, आणि या प्राण्याचें आतां काय करावें अशा विवंचनेनें एकमेकांकडे पाहूं लागले. असल्या बेफाम प्राण्याला गोळी घालून ठार मारणें हेंच बरोबर आहे, असें सर्कशींतील एका युरोपियन नोकरानें सुचविलें; पण ही सूचना कुणाला मानवेना. एवढा उमदा, तजेलदार नि प्रचंड प्राणी इतके दिवस ममतेनें संभाळलेला, आणि त्याच्या जिवावर

आपण अमाप पैसा कमावलेला, तर तो केवळ बिथरलेला आहे म्हणून त्याला ठार मारणें कुणालाच पसंत पडेना.

शेवटीं कांहीं तरी करून त्याला सर्कशींतून हालवून मूळ घरीं नेणें एवढेंच काय तें शिल्लक राहिलें. पण नेणार कोण, हा प्रश्न पडला. प्रतापसिंह-महाराजांनीं आपल्या राजधानींतून दुसरे माहूत आणविले. पण गंभीरचें तें चवताळलेलें रूप पाहून आपल्या हातून हें काम होण्यासारखें नाहीं असें त्या माहुतांनीं दिलगिरीनें सांगितलें. सर्कशीचा मुक्काम हालविणें तर भाग होतें; कारण धंदा चालला तरच हीं इतकीं पोटें भरणार होतीं.

परंतु याच वेळीं दुसरीकडे एक निराळेंच चक्र फिरत होतें. गंभीर, रशीद, हमीदा आणि अबू हे एका कुटुंबांतील प्राणी होते. रशीद नाहींसा झाल्यामुळें हें कुटुंब एकदम उघडें पडलें. पण उघडें पडलेल्या कुटुंबांतील माणसें एकमेकांना कधीं सोडीत नाहींत. वास्तविक पहातां रशीद मेल्याचें वर्तमान ऐकतांच प्रतापसिंहमहाराजांनीं हमीदा आणि अबू यांना सर्कसच्या गांवी पाठवायला हवें होतें. पण रशीद मेला होता. हीं माणसें गेलीं असतीं तरी तो त्यांना कधीं भेटला नसता. आणि तेव्हांचीं प्रवासाचीं साधनें इतकीं चेंगट असत कीं, हमीदचा मुडदासुद्धां यांच्यासाठीं राखून ठेवणें शक्य नव्हतें. मर्द मेला म्हणून हमीदानें जीवाचें रान केलें, आणि आईकडे पाहून केविलवाण्या मुद्रेनें अबू वळकटीवर पालथा पडून कसा तरी वेळ घालवूं लागला. त्यांचें प्रीतीचें माणूस गेलें होतें, आणि त्यांचा पोशिंदाहि गेला होता. पण त्यांच्या घरांतील एक माणूस शिल्लक राहिलेलें होतें. त्याचें नांव गंभीर असें होतें. हमीदेच्या मनांत अशा अनाथ अवस्थेंत एक चमत्कारिक लहर उठली. एकदां गंभीरला तरी पाहून यावें असें मनांत येऊन ती गरीब बाई मुलाला घेऊन सर्कसच्या गांवाकडे निघाली. तिनें कांहीं थोडें उसनेंपासनें केलें, पायांतला चांदीचा वाळा गहाण ठेवला; आणि मग हीं मायलेकरें गंभीरला भेटण्यासाठीं निघालीं. सर्कसच्या गांवीं पडलेला तिढा अजून कायमच होता. चंद्रराव आणि त्याचे सर्कशींतील मित्र हे दर वेळीं बुजून गंभीरपासून दूर उभे रहात होते. आणि प्रतापसिंहमहाराजांकडे पाहून

तर गंभीर तिरस्काराचे फूत्कार टाकीत होता. याच महाराजांनीं त्याला भलतीकडे पाठविलें होतें.

अशा स्थितींत चारपांच दिवस गेले. गंभीर रोडावला. पिल्लूं असतांनासुद्धां दहा हजार रुपयांना घेतलेल्या आणि आतां लाख रुपये किंमतीच्या झालेल्या या जिवाचें काय करावें,—आणि काय होणार आहे हें नेणत्यांनाहि कळेना आणि जाणत्यांनाहि कळेना.

एक दिवशीं बारा वाजतां ही मंडळी गंभीरला लांबूनच चुचकारीत असतांना, कुणीसें आंत येऊन सांगितलें कीं, एक बाई आणि मुलगा दाराशीं आलीं आहेत, आणि 'आंत येऊं का' म्हणून विचारताहेत. बाई आणि मुलगा म्हटल्याबरोबर चंद्ररावाच्या मनाला एकदम टचका बसला, आणि प्रतापसिंहाकडे बघत त्यानें दारवानाला सांगितलें कीं, 'त्यांना आंत घेऊन ये.' हमीदा आणि अबू आंत आलीं. इकडेतिकडे पाहून तीं सरळ गंभीरला जखडलें होतें तिकडेच गेलीं. गड्यामाणसांनीं आणि चंद्ररावांनींसुद्धां त्यांना मोठमोठ्यानें हटकून सांगितलें कीं, 'मागें व्हा, मागें व्हा. गंभीर पिसाळलेला आहे.' पण हमीदेला आणि अबूला त्याचें कांहीं वाटलें नाहीं.

गंभीर फुसफुसत, अर्धवट डुलत, आणि जणूं कांहीं कण्हत आतांपर्यंत इकडेतिकडे पहात होता; पण आतां त्याची दृष्टि एकाएकीं निश्चल झाली. बावचळलेलें त्याचें मन शान्त झाल्यासारखें दिसूं लागलें. समोरून येणाऱ्या त्या स्त्रीकडे आणि तिच्या छोट्या छाव्याकडे तो टक लावून पाहूं लागला; आणि मग नाना प्रकारचे चमत्कारिक चीत्कार करीत व सोंडेला लडिवाळपणानें हेलकावे देत, प्रेमाची खूण म्हणून गंभीरनें गुडघे खालीं टेकले, आणि पुन्हा एकदां अनुकूल चीत्कार करून तो खडा उभा राहिला.

भोंवतालीं उभे असलेले तमाम लोक थक्क होऊन बघूं लागले. त्यांनीं या देखाव्याकडे पाहिलें आणि एकमेकांकडे पाहिलें. हमीदा आणि अबू गंभीरजवळ गेलीं आणि त्यांच्या तोंडावर दुःखाची छाया पसरली. तीं रडूं लागलीं. 'गंभीर! गंभीर!' म्हणून हमीदेनें गंभीरची सोंड थोपटली, आणि अबूनें त्याचा पाय कवटाळला.

झालें ! पडलेला तिढा उलगडला ! पेंच सुटला ! साऱ्यांचा जीव भांड्यांत पडला. गंभीर शुद्धीवर आला. ते राजेमहाराजे आणि ते मॅनेजर लहान दिसूं लागले; आणि एक विधवा स्त्री व एक पोरकें पोर हीं हत्ती-इतकीं उंच झालीं. गंभीरनें अबूला सोंडेंत धरलें आणि डोक्यावर नेऊन ठेवलें, आणि मग हमीदेच्या भोंवतीं सोंडेचा विळखा घालून तो गंभीर गजराज आनंदानें डुलत राहिला.

हमीदा त्याला म्हणाली, "गंभीर, माझे मालिक गेले, पण तूं आतां घरीं चल. माझा अबू आतां तुझी सेवाचाकरी करील." गंभीरनें सोंड उंच केली आणि फुत्कार करून जणूं कांहीं त्यानें होकार दिला. गडी सांगूं लागले, 'रशीदभाई मेल्यापासून गंभीरनें चारापाणी टाकलं आहे.' हमीदा म्हणाली, 'तुम्ही जल्दी खुराक घेऊन या.'

नोकरांनीं गंभीरचा खुराक आणल्यावर हमीदेनें आणि अबूनें खुराकाचे रोठ गंभीरपुढें धरले, आणि त्या प्रेमळ प्राण्यानें आपल्या त्या प्रियकर माणसांच्या हातांतील खुराक गपागप खाऊन टाकला. गंभीर पाणी प्याला, गंभीरनें गवत खाल्लें. दुसराहि प्रश्न सुटला असें चंद्ररावाला आणि प्रतापसिंहाला वाटूं लागलें.

दोन दिवस मुक्काम झाला, आणि कुणाला आसपासहि येऊं न देणारें तें धीरगंभीर जनावर हमीदेच्या आणि अबूच्या मागें एखाद्या लडिवाळ कोंकरासारखें चालूं लागलें. प्रवासांतील रखड प्रतापसिंहाच्या कृपेनें कुणालाच तितकीशी बाधली नाहीं.

गंभीर आतां हत्तीखान्यांत आलेला आहे. हमीदा आणि अबू त्याची सेवाचाकरी करीत आहेत. महाराजांनीं सर्वांचे तनखे पुन्हा चालू केलेले आहेत. प्रेमाचीं माणसें एकत्र झालेलीं आहेत. जनावर आणि माणूस यांतला भेदभाव मावळलेला आहे !

# ६

# जग हें असें आहे !

तारा रुसून बसलेली आहे; दोन महिने झाले, मनापासून बोलणें नाहीं; कुठें जात येत नाहीं; तिचा हट्ट हा कीं मी त्याच्याशींच लग्न करणार ! आतां या हट्टाला काय करावें ! समजूत घालून पाहिली, आर्जवें केलीं, त्रागा करून पाहिला, पण तारेचा हट्ट कांहीं सुटत नाहीं.

बरें, हट्टांत कांहीं थोडें शहाणपण असतें तरीहि वडील माणसांनीं गम खाल्ली असती. तिच्या मनाप्रमाणें ते वागले असते. ते जुन्या पिढींतले असले तरी नव्या पिढीचे विचार त्यांना माहीत झाले आहेत; आणि ते त्यांना पटतातहि. पण या पोरीचा हट्ट अगदीं मुलखावेगळा आहे ! मुलगा गरीब चालेल, आपण त्याला श्रीमन्त करूं; मुलगा देशभक्त आहे, तर आपण त्याचा प्रपंच संभाळूं;—असें आईबापांचें म्हणणें. रूप तारेला आवडलें, पण आईबापांना आवडलें नाहीं तरी ते एक अवाक्षरहि बोलावयाचे नाहींत; पण ताराबाईचा हट्ट भलताच्या सलताच आहे. आणि मुलांच्या मताप्रमाणें वागावें हें किती जरी खरें असलें तरी मुलांनीं फरफट काढली तरी त्यांच्या मागें वाटेल तिकडे जावें असें कोणी म्हणेल काय ? पण सध्यां घरांत भांडण सुरू आहे तें हें आहे; तारा म्हणते कीं, मी त्याच्याशींच लग्न करणार. आणि आईबाप म्हणतात, आम्ही तुला 'आंधळ्याशीं लग्न करूं देणार नाहीं.' यांत आईबापांचें काय चुकलें ? 'प्रेम आंधळें असतें' हें इतकें खरें असतें हें — मूळ म्हण ज्यानें केली त्याच्यासुद्धां ध्यानांत आलें नसेल. तारीचें प्रेम एका आंधळ्यावर बसलेलें आहे. प्रेमपुरींत आंधळींसुद्धां निवडणुकीला उभीं रहातात, आणि डोळस मतदार त्यांना मतें देतात. हा नवीनच प्रकार आईबापांना वाटूं लागला. मोठा खोडा उत्पन्न झाला आहे.

त्याचें असें झालें कीं, एक अर्ध्या मैलाच्या अंतरावर एक अंधाश्रम होता. तिथें पांच–सातच आंधळे होते, आणि त्यांना संभाळणारे एक दोघे डोळस होते. आंधळ्यांना कांहीं तरी विद्या शिकवायला हव्यात म्हणून त्यांना गायन शिकविण्याची व्यवस्था संस्थेच्या चालकांनीं केली. एका आंधळ्याच्या डोळ्यांत देव दृष्टीच्या कांचा बसवायला विसरला, पण त्याच्या घशांतील आवाजाची नळी मात्र देवानें अशी सुंदर बसवली कीं, कंठांतून आवाज निघाला कीं माणसाचे कान संतुष्ट व्हावेत; त्यांनीं नाचूं लागावें; त्यांनीं टाळ्या वाजवाव्या; आणि त्याच्या तोंडाकडे पहात बसावें. पण हें आवाजापुरतें. एरव्हीं तेथल्या त्या आंधळ्याची सुरत बावळी आणि बेंधळी असे. गातांना त्याची चेहरेपट्टी इतकी वेडीवांकडी होई कीं हा आपल्याला वेडावून दाखवतो कीं काय असेंच पहाणाऱ्याला वाटावें. पण या आंधळ्याच्या गाण्याला विलक्षण गोडी होती. होतां होतां आसपासच्या टापूंतील कांहीं मुलें – मुली त्याच्याकडे गायन शिकायला येऊं लागलीं. तारीहि जाऊं लागली. तारीच्या बापाला हजार रुपये पगार. तिला आणायला न्यायला मोटर यावयाची. आंधळ्याला यांतलें कांहींच दिसत नव्हतें; पण त्यालासुद्धां ऐट वाटे कीं, आपल्याकडे एवढ्या श्रीमंताचीं मुलें शिकायला येतात.

शिकवतांना त्याचीं तोंडें वेडींवांकडीं होऊं लागलीं म्हणजे मुलें हळूहळू हंसूं लागत. ‘ सा ’ म्हणण्यासाठीं त्यानें तोंड उघडलें म्हणजे त्याचे बुळबुळीत आणि पिवळे दांत पाहून त्यांना किळस येई. एखाद्या वेळीं त्याच्या तोंडांत लाळेची तारसुद्धां दिसे. इतर मुलांच्यापेक्षां तारा वयानें थोडी मोठी होती. मुलें हंसलीं तरी ती हंसत नसे. तिचें लक्ष त्या अंधाच्या गाण्याकडे असे. ज्या गोष्टींनीं इतरांना किळस यावी त्या त्या गोष्टींची ताराला दया येई. ती मनांत म्हणे, या माणसाला जर कोणी काळजीचा सेवक असता तर त्यानें याची मुखश्री चांगली स्वच्छ ठेवली असती; आणि गातांना तोंडें वेडींवांकडीं होऊं नयेत हें निदान शब्दांनीं तरी पुन्हा पुन्हा सांगितलें असतें. गवयाला हंसणाऱ्या मुलांचा ताराला मनांतून राग येई. वर्ग संपून तारा घरीं आली म्हणजे तिचें मास्तरांचें पुराण सुरू होई, आणि आंधळ्या–पांगळ्यांची करुणा

लोकांना नेहमींच वाटत असल्यानें ह्या गवई मास्तरांबद्दलहि घरांतील माणसांच्या मनांत करुणामिश्रित कुतूहल उत्पन्न झालेलें असे. पेटी पुढें घेऊन तारा प्रॅक्टिसला बसली म्हणजे तिला नवें नवें किती येऊं लागलें आहे हें घरच्या माणसांच्या ध्यानांत येई; आणि आंधळा मास्तर शिकवतो चांगलें असें तीं म्हणत.

तारी मॅट्रिक्युलेट झाली आणि कॉलेजांत जाऊं लागली. कॉलेजच्या अभ्यासांतहि तिची गति फार चांगली; आणि हुशार मुलगी म्हणून प्राध्यापक तिची फार तारीफ करीत. पण प्राध्यापकांनीं इतकी तारीफ करायला आणखी एक कारण झालें होतें. तारा फार देखणी मुलगी होती. वर्ण आणि रूप या दोहोंचें मोठें अलौकिक देणें तिला लाभलें होतें. शिवाय बापाला हजार रुपये पगार होता हें निराळेंच. तारीचा एकंदर इतमाम, तिची कान्ति, आणि तिच्या बुद्धीची चमक हीं पाहून बरोबरचे विद्यार्थीसुद्धां आपल्या ठिकाणीं चमकून असत. अशी ही बहुगुणी आणि सुंदर मुलगी कुठें पडेल अशी चुटपुट आईबापांना लागलेली असे. तिच्या त्या बहुगुणांत गायनकला प्रमुख होती. कॉलेजचें संमेलन झालें म्हणजे तेथल्या भव्य सभागृहांत तारीची ललकारणी ऐकून जाणते लोक मुग्ध होऊन जात; आणि कॉलेजांत नवीन आलेलीं पोरें आपल्या ठिकाणीं सर्द होऊन बसत. घरीं कांहीं समारंभ असला म्हणजे वडील तारेला कौतुकानें कांहीं म्हणायला सांगत. समारंभ संपून परत चाललेली पाहुणे-मंडळी एकमेकांत म्हणत, " अफाट मुलगी आहे. "

" हिला शिकवतो कोण ? "

" तुम्हांला माहीत नाहीं का ? अहो, तो अंधाश्रमांतला नंदूलाल ! "

" शाबास, त्या आंधळ्यानं ही पोर तयार केली का ? "

ताराबाईची अशी शिफारस नेहमीं चाललेली असे.

मधूनमधून गायनाच्या स्पेशल क्लाससाठीं ताराबाई अंधाश्रमांत जाई. एवढी प्रौढ मुलगी, आतां B. A. च्या वर्गांत आलेली. इतकी समंजस, तर तिच्यावर पाळत ठेवायला हवी असें आईबापांना तरी कधीं वाटलें असतें का ? आईला मात्र मधून मधून शंका येई, आणि ती म्हणे,

" नित्य उठून कसला स्पेशल क्लास ? " एकदां तर ती क्लासला निघत असतांना पोलक्याच्या खिशांत तिनें एक पाकीट हलकेच घातलें हें आईनें पाहिलेलें होतें. ती एकदां रावसाहेबांना म्हणाली, " एकदां त्या आंधळ्याच्या शाळेंत जाऊन काय वर्तमान आहे तें पाहून तरी यावं. हिचे स्पेशल क्लास फारच होताहेत ! " रावसाहेब थोडें तिरसटपणानें म्हणाले, " तुम्ही बायका भारी शंकेखोर. तिथं कोण आहे ? पांचसात आंधळे आहेत अन् दोन तीन चाकरमाणसं आहेत. आंधळा गातो आणि पोरं शिकतात." तारीनें भिंतीच्या आडून हा संवाद ऐकला होता. त्यामुळें आतां ती निर्धास्त झाली होती.

तारी सीनिअर B. A.त असतांना रावसाहेबांना एका जुन्या स्नेह्याचें पत्र आलें. त्यांनीं तारीला मागणी घातली होती. तारीचा बाप श्रीमंत असेल; पण त्याच्या ह्या स्नेह्यानें असले दहा श्रीमंत विकत घेतले असते. आणि त्याचा मुलगा असा फटाकडा होता कीं थोरामोठ्यांनीं लोटांगणें घालीत त्याच्यापुढें जावें. अशा माणसांनीं आपल्या मुलासाठीं तारीला मागणी घालावी, हें पाहून रावसाहेबांना आनंदाच्या उकळ्या फुटल्या. तारीच्या आईला तर स्वर्ग ठेंगणा झाला.

एकदोन दिवसांत पत्रांतील मजकूर झिरपत सगळ्या घरांत पसरला, आणि तारीला जो तो चिडवूं लागला. पण तारीचा चेहरा मात्र अगदीं बदलला. ती कोणाशीं बोलेना, आणि विचारल्या प्रश्नाचें उत्तर देईना. रावसाहेबांना वाटलें, हें लग्न परीक्षेच्या आड येईल म्हणून तारी हिरमुसली असावी. ते म्हणाले, " लग्न परीक्षेच्या आड येईल असं तुला वाटत असलं तर आपण सध्यां ठरवून ठेवूं,–आणि परीक्षा झाल्यावर वैशाखाच्या महिन्यांत – हंसत हंसत – बार उडवून देऊं. " रावसाहेब हंसले खरे पण ताराबाईची कळी खुलली नाहीं. आई आंतून तिच्याकडे पहातच होती. ती मनांत म्हणाली, " कारटीचं लक्षण मला कांहीं बरं दिसत नाहीं. " मग बाहेर येऊन आणि रावसाहेबांना उद्देशून ती टीकेच्या आवाजानें म्हणाली, " काय म्हणताहेत ताराबाई ? " जणूं कांहीं आपल्या सूचनेला संमतीच दिलेली आहे अशा थाटानें रावसाहेब उत्तरले, " ती काय म्हणते ! तिचं येऊन जाऊन म्हणणं हें असायचं

कीं परीक्षा बुडूं नये. मीं तिला सांगितलं कीं आपण सध्यां ठरवून ठेवूं; कारण येवढं स्थळ – अन् आपण होऊन आलेलं – हातचं घालवूं नये; – अन् वैशाखाच्या महिन्यांत उरकून टाकूं."

आई म्हणाली, "परीक्षेचंच असलं तर तें कांहीं अवघड नाहीं, पण—"

तारीनें आईकडे थोड्या तीक्ष्ण नजरेनें पाहिलें, अन् टेबलावरचें पुस्तक घेऊन ती थोडयाशा फणकाऱ्यानें आंत निघून गेली.

रमाबाईनें एक हातवारा केला, आणि नवऱ्याला सुचविलें कीं, "दुसरें कांहीं तरी आहे. हें परीक्षेचं नाहीं."

"ठीक आहे; मीं ओळखलं." रावसाहेब म्हणाले; आणि त्यांनीं तारीला बाहेर बोलावलें.

"हें बघ, तुला नवरामुलगा दाखवल्याशिवाय आम्ही कांहीं तुझं लग्न करणार नाहीं. तूं आतां चांगली शिकलेली आहेस. आंधळेपणानं तूं कांहीं कुठं तरी होय म्हणणार नाहींस. बरं, तोहि चांगला शिकलेला आहे. तुला प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय आंधळयासारखा तो तुझ्याशीं लग्न कसा करील ?"

इतकें झालें तरी ताराबाई पुन्हा फुरंगटूनच बसलेली दिसली. इतक्यांत बाहेरून कोणी तरी – म्हणजे टपालवालाच आला, आणि रावसाहेब टपालांत गुंतलेले पाहून मायलेकी आंत निघून गेल्या.

रावसाहेबांचें आणि रमाबाईचें एकान्तांत बोलणें झालें, आणि बायकोच्या बोलण्यांत कांहीं तथ्य आहे असें रावसाहेबांना वाटूं लागलें. परंतु आंधळयांच्या शाळेंत जाऊन पहाण्याची कल्पना त्यांना अगदीं हास्यास्पद वाटली. कांहीं दिवसांनीं आंधळयांच्या शाळेंत नंदूलालच्या गायनाचा जलसा झाला. गरीबांच्या संस्थेला आश्रय म्हणून या मंडळींनीं मोठालीं तिकिटें काढलीं. नंदूलालच्या आवाजांत विलक्षण गोडी होती; पण त्या गोडीचें मुख्य लक्षण हें कीं त्या आवाजांत करुणा भरलेली असे. एकेकाच्या आवाजाचा एकेक धर्म असतो. एखादा गवई भक्तीचे अभंग गात असला तरी तो त्यांत शृंगाराचा ढंग आणतो; आणि दुसरा कोणी वीररसाची चीज गात

असला तरी त्यांत कारुण्य उत्पन्न करतो. नंदूलाल गाऊं लागला म्हणजे श्रोते अगदीं गहिंवरून जात. पण आपल्या अंगीं संयम आहे असें दाखविण्यासाठीं बहुतेकजण कंठ दाबून धरीत. तारीसारखे कांहीं श्रोते मात्र अगदीं विरघळून जात आणि प्रत्यक्ष रडूं लागत. त्या दिवशीं असेंच झालें. आणि रमाबाईच्या शंकेनें टिचकी दिलेली रावसाहेबांच्या मनांतील घंटा तेथल्या तेथेंच वाजूं लागली. नंदूलालचें ध्यान अगदीं बेडौल, बावळें, आणि ओंगळ होतें. पण त्याच्या कंठांतून निघणाऱ्या आलापांनीं मात्र श्रोत्यांना अगदीं बेहोश करून सोडलें! गाण्याहून परत येतांना तारी मधून मधून मुसमुसतच होती. दुसरे दिवशीं रमाबाईनीं नवऱ्याला चक्क सांगितलें कीं, गाण्याचा क्लास आतां एकदम बंद व्हावयाला हवा.

रावसाहेब आपल्याच मनाचे पापुद्रे सोलत बसले. त्यांना वाटलें कीं, लग्न झालें म्हणजे गायनाचें शिक्षण बंद पडेल म्हणून तारी बिथरली असावी. म्हणून ते तिला आश्वासनाच्या आवाजानें म्हणाले, " हें बघ, लग्न झालं म्हणून तुझं गाण्याचं शिक्षण एकदम बंद पडणार आहे असं तूं समजूं नकोस. " रमाबाई आपल्याशींच म्हणाल्या, ' ह्यांच्या अजूनहि ध्यानांत येत नाहीं, हें वेड परीक्षेचंहि नाहीं अन् गाण्याचंहि नाहीं! '

महिना – पंधरा दिवस गेले; अन् एके दिवशीं दुपारच्या वेळेला नंदूलालला घेऊन त्याचा एक मित्र रावसाहेबांच्या घरीं आला. हें आंधळ्याचें अनपेक्षित आगमन रावसाहेबांना चमत्कारिकच वाटलें. इकडचें तिकडचें थोडें बोलणें झाल्यावर नंदूलालचा मित्र म्हणाला, " नंदूलालला धमकावणी दाखविणारं एक पत्र आलेलं आहे. ' तूं ताराबाईचा नाद सोड, नाहीं तर तुझी धडगत नाहीं ' असं त्यांत म्हटलं आहे. " नंदूलाल मध्येंच म्हणाला, " महाराज, आम्ही गरीबांनीं काय केलं आहे? आम्हांला दिसतहि नाहीं, आम्ही कोणाचा नाद धरणार? " रावसाहेब बुचकळ्यांतच पडले. हें काय गौडबंगाल आहे हें त्यांच्या ध्यानांतच येईना.

बाहेर कोणी तरी येऊन रावसाहेबांच्याशीं बोलत बसले आहेत याची चाहूल लागतांच रमाबाईचें शंकाकुल मन एकदम जागें झालें आणि त्या माजघराच्या दाराशीं येऊन ऐकूं लागल्या. आंधळ्याला त्यांनीं एकदमच ओळखलें, आणि त्याचें तें गयावया बोलणें कानीं येतांच त्या एकदम

सरसावून पुढें आल्या. रावसाहेब त्यांच्याकडे दुग्ध्याच्या दृष्टीनें पाहूं लागले. त्या म्हणाल्या, " काय प्रकार आहे ? "

आंधळ्याचा मित्र म्हणाला, " आम्हांला गरीबांना धमकीचीं पत्रं येत आहेत. नंदूलालला धमकी दिलेली आहे कीं, तूं ताराबाईचा नाद सोड; नाहीं तर तुला धोका आहे. बाईसाहेब, आम्ही गरीब अंध, अन् त्यांची सेवा करणारे लोक, आम्ही कोणाला नादीं लावणार, – आणि कुणाच्या नादीं लागणार ! "

विषय जास्त चिघळूं नये, आणि घरभर बोभाटा होऊं नये म्हणून रावसाहेब त्यांना म्हणाले, " तुम्ही निर्धास्त असा. तुम्हांला कोणी कांहीं करीत नाहीं. तुम्ही गरीब अश्राप माणसं आहां. कोणी कांहीं तरी उगाच लिहितं. तुम्ही आतां घरीं जा. "

अंध आणि त्याचा मित्र यांच्या मनांत आणखी कांहीं बोलावयाचें होतें. त्यांनीं बोलण्याची उत्सुकता दाखवितांच रावसाहेब म्हणाले, " आतां तुम्ही कांहीं बोलूं नका. धमकी देणारे लोक मूर्ख आहेत. तुम्ही आतां परत जा. "

इतकें बोलून रावसाहेब तट्कन् उठले; आपणाहि आतां परतलें पाहिजे हें ओळखून नंदूलाल आणि त्याचा मित्र रावसाहेबांच्या घरांतून बाहेर पडलेले पहातांच रमाबाई एकदम कडाडल्या,

" तरी मी सांगतच होतें, कीं या कार्टीचं लक्षण कांहीं ठीक नाहीं. पण आम्ही बायका फार शंकेखोर असं म्हणून मला गप्प केलं. "

" हें बघ, थोडी हळू बोल. हें काय आहे तें बारकाईनं पाहिलंच पाहिजे. मी कांहीं वेळानं अंधशाळेंत जातों आणि जास्त चौकशी करतों, म्हणजे याचा निकाल लागेल. "

" मलाहि पण बरोबर यायचं आहे. " रमाबाई त्वेषानें म्हणाल्या, " मी खास सांगतें कीं, या कार्टीनं त्यांना कांहीं पत्रं लिहिलीं असलीं पाहिजेत. एकदां क्लासला जातांना बंद केलेलं पाकीट तिनं पोलक्यांत घातलेलं मीं पाहिलं होतं. "

" मग त्याच वेळेला तूं कां मला सांगितलं नाहींस ? " नवरोजी रागानें म्हणाले.

" सांगितलं ना; – त्याच वेळेला सांगितलं. पण आम्ही वेड्या आहोंत ना ! आत्तां त्यांच्या मागोमाग जाऊं आणि चौकशी करून येऊं. " रमाबाईची ती निकड आणि त्वेष पाहून आधींच पराकाष्ठेचे अस्वस्थ झालेले रावसाहेब अंगांत घालून एकदम तबेल्याकडे गेले. त्यांनीं गाडी बाहेर काढली. सुदैवानें तारी कोठें तरी बाहेर गेलेली होती. रावसाहेब आणि रमाबाई पांच मिनिटांत अंधशाळेंत पोहोंचले. रावसाहेब एकटेच आंत गेले, आणि प्रांजलपणाचा आव आणून नंदूलाल व त्याचा मित्र यांना म्हणाले, " आज आमच्याबरोबर थोडेसे बाहेर चला. " त्यांनींहि रावसाहेबांचा आशय ओळखला, आणि चौघेजण बरेच दूर गेल्यावर गाडी थांबवून रावसाहेबांनीं तो विषय काढला. अंध म्हणाला, " रावसाहेब, माझ्या मनांत ही कल्पना तरी कधीं येणं शक्य होतं का ? दुर्दैवानं मी आंधळा आहें. "

रावसाहेब म्हणाले, " मग तुमच्या मनांत ही कल्पना तरी आली कशी ? "

" आपल्या मुलीनंच आम्हांला पत्र धाडलं ! " अंधानें उत्तर केलें.

मित्राजवळ एक पिशवी होती तींतून त्यानें एक लखोटा काढला. लखोट्यांत चार–पांच फोडलेलीं पाकिटें होतीं तीं त्यानें रावसाहेबांच्या हातीं दिलीं. रमाबाईनीं त्यांतलीं दोन ओढून घेतलीं. तारीचें अक्षर दोघांनीं ओळखलें; आणि मजकूर पहातांच रावसाहेबांना भोंवळ येईल कीं काय असें वाटूं लागलें ! रमाबाईचा पारा डोक्याला तडा जाईसा वर चढला. आतां यांत चौकशीचें कांहीं उरलेंच नव्हतें.

नंदूलालचा मित्र म्हणाला, " अंधाकडे काय दोष आहे बरं ? आम्ही एका शब्दानंसुद्धां तारीबाईला उत्तर धाडलेलं नाहीं. " पण त्यांनीं जेव्हां एकदां आडपडद्यानें विचारलें तेव्हां अंध म्हणाला, " कुणाची हरकत नसली तर मी लग्न करीन. " रावसाहेबांनीं पत्रें लखोट्यांत घातलीं. त्या दोघांना त्यांनीं आश्रमांत नेऊन सोडलें, आणि खिन्न मनानें रमाबाई व ते घरीं परतले.

बोभाट्याची भीति, जनलज्जेची भीति, नको म्हटलें तर कार्टी जिवाला कांहीं करून घेईल कीं काय ही भीति, शिक्षण मातींत गेलें याची खंत, घराण्याची इभ्रत धुळीस मिळते याचा अवमान, एका घाणेरड्या माणसाशीं येवढी सुसंस्कृत मुलगी लग्न करीन म्हणते यामुळें संस्कृतपणावरचा उडालेला विश्वास – अशा संकुल भावनांनीं तीं दोघें बाजूबाजूला एकमेकाशीं बोलूं लागलीं. शेवटीं करावयाचें तेंच त्यांनीं केलें. त्यांनीं तारीला बोलावून घेतलें, आणि ' तूं त्याला कांहीं लिहून बसली नाहींस ना ? ' असें त्यांनीं विचारलें. तारी म्हणाली, " मी मुळीच कांहीं लिहिलेलं नाहीं. " हे शब्द तिच्या तोंडांतून बाहेर पडतांच रमाबाईनीं तीं पत्रें तिच्या नाकापुढें धरलीं. तीं पहातांच एखाद्या भित्र्या मुलीला झेंडूच फुटला असता; पण तारी भली मख्ख बनली होती. चेहरा बदलूं न देतां ती म्हणाली, " तुम्ही रागावाल म्हणून मीं तसं म्हटलं. हीं पत्रं माझींच आहेत. "

आईबाप अगदीं मूढ होऊन गेले. तारीच्या मनाचे व्यापारच त्यांना कळेनात. ती म्हणे, " नंदूलाल हे अतिशय सुंदर गातात. त्यांचं गाणं ऐकूं लागलं म्हणजे मला त्यांच्यासंबंधानं ओढ वाटूं लागते. त्यांचा चेहरा वेडावांकडा होतो आणि तोंड ओंगळ दिसतं; पण मला असं वाटतं कीं, त्यांची सेवा करून हा ओंगळपणा घालविला पाहिजे. येवढ्या चांगल्या माणसाला लोक ओंगळ म्हणतात हें पाहून मला फार वाईट वाटतं. कोणीं तरी त्यांची काळजी घेतली पाहिजे, तर ती मींच कां न घ्यावी ? " तारीचें हें भाषण ऐकून रावसाहेब म्हणत, " हें बघ, त्याचा ओंगळपणाच काढायचा असला तर मी त्याची निराळी व्यवस्था करीन; आणि त्याचं गाणं गोड आहे तर सगळ्या लोकांसारखं तूंहि तें ऐकावंस. याला लग्न कशाला करायला पाहिजे ? " यावर तारीचें एकच उत्तर आहे, " मला आपलं असं वाटतं. "

" असं वाटणारी तूं गाढव आहेस. आमच्या कुळाला तूं बट्टा लावणारी आहेस. तुझं सारं शिक्षण चुलींत गेलेलं आहे.–" असे एक ना दोन – अनेक निषेधाचे शब्द नवराबायको आलटून पालटून बोलत आहेत. पण तारी आपला हट्ट सोडत नाहीं, आणि आश्रमांतलें तें आंधळें ध्यान

लग्नाच्या आशेनें मित्रांशीं कूजित करीत बसलें आहे. आतां तारीचा स्पेशल क्लास बंद झालेला आहे. अंधशाळेसंबंधानें घरांत कोणीहि कांहीं बोलत नाहीं. तारीचें मन पालटावें म्हणून दूरच्या गांवीं असलेल्या तिच्या मामाकडे तिची रवानगी करण्याचें घाटत आहे. पण या इलाजाचा उपयोग कितपत होईल याविषयीं शंका असलेले रावसाहेब सध्यां मोठ्या पेंचांत पडले आहेत. आणि रमाबाई तर दुःखानें आणि अवमानानें खचत चालल्या आहेत.

## ७

# नाकावर टिच्चून पुन्हां लग्न !

गोपिकाबाई ही एक मोठी रुसकी स्त्री होती. दुसऱ्या कोणीं त्यांचें कसलेंहि नुकसान केलें नव्हतें, त्यांचा अपमान केलेला नसे, किंवा त्यांना कोणीं वाईट शब्द बोललेलें नसे; पण गोपिकाबाई मात्र नेहमीं रुसलेल्या असायच्या. शेजारणी नदीवर पाण्याला गेल्या म्हणजे त्यांच्यांत गोपिकाबाईचा विषय निघे. त्या म्हणत, "तुझा नवरा मेला याला आम्हीं काय करावं ? आम्हीं कांहीं त्याला मारला नाहीं, तुझं नशीब खोटं म्हणून तो मेला; पण म्हणून आमच्याशीं कां फुरंगटून बसतेस ?"

शेजारणींचें हें बोलणें अगदीं बरोबर होतें. पण गोपिकाबाईचा हा आपला स्वभावच झाला होता. रुसून बसण्यानें त्यांना दुःखाचा परिहार झाल्यासारखा वाटे. जगाला त्या आपला वैरी मानीत. इतर कोणाचें अमुक चुकलें नसतें तर आपलीं माणसें गेलीं नसतीं, असा एक त्यांचा भोळा समज होता. त्यांनीं शेजाऱ्यापाजाऱ्यांशीं जणूं कांहीं आकसच धरला होता. खरें पाहूं जातां त्या जर शेजारणींशीं मनमोकळेपणानें बोलल्या असत्या, त्यांच्यांत आल्या–गेल्या असत्या तर त्यांना थोडा तरी विरंगुळा वाटला असता; आणि त्यांच्या मनावरचा भार थोडा तरी हलका झाला असता.

पण ही आपली लौकिक दृष्टि होय. गोपिकाबाईना मात्र रुसून बसण्यानेंच समाधान वाटे. आणि जी बाई शेजाऱ्यापाजाऱ्यांशीं अशी वागणार ती सुनेशीं कशी वागत असेल हें कोणालाहि सहज समजूं शकेल.

श्रीधरपंतांना जाऊन दहा–बारा वर्षें तरी झालीं असतील. वैधव्याचें दुःख गोपिकाबाई रुसूनफुगून हलकें करून घेत असत. पण त्यांच्या स्वभावांत हा जरी एक दोष असला, तरी प्रपंचाला मात्र बाई अगदीं

वाघ होती. नवरा मेला म्हणून ती गडबडून गेली नाहीं. श्रीधरपंतांनीं मागें थोडासा कुणगा ठेवला होता; त्यावरच आपण कसें ना कसें भागवलें पाहिजे, आणि मुलें मोठीं केलीं पाहिजेत, हें ओळखून गोपिकाबाईनीं आपला उघडा पडलेला संसार मोठ्या खबरदारीनें आणि झांकूनपाकून चालविला.

मुलें मोठीं झालीं. माधवचें लग्न होऊन तो वकिली करूं लागला होता; एक मुलगी सासरीं गेली होती, आणि एकीसाठीं स्थळें बघण्याचें काम चालू होतें. म्हणजे गोपिकाबाईनीं आपलीं प्रापंचिक कार्यें जवळजवळ संपवत आणलीं होतीं. त्यांनी कोणाकडे याचना केली नाहीं; आणि कोणाचें 'ब्र'हि म्हणून घेतलें नाहीं. बाकी एवढें खरें कीं, इतक्या सुदीर्घ काळांत त्यांना कोणीं हंसतांनाहि पाहिलें नाहीं. त्या आपल्या नेहमीं रुसलेल्या असायच्या.

माधवच्या लग्नाची गोपिकाबाईनीं थोडी घाईच केली. माधव मॅट्रिक होऊन नुकताच कॉलेजांत गेला होता. तेव्हां मुलांमुलींचीं लग्नें लौकर होत हें खरें; पण तरीहि गोपिकाबाईनीं बाळूच्या लग्नाची थोडी घाईच केली असें म्हटलें पाहिजे.

तालुक्याचा गांव. माधवच्या वडिलांनीं वकील म्हणून मोठी कीर्ति मिळविली होती. ठिकठिकाणच्या कोर्टांच्या तपासणीला जनार्दन बाळाजी हे येत असत. तेव्हां त्यांची आणि श्रीधरपंतांची दाट ओळख झालेली होती. माधवला जनार्दनपंतांनीं लहानपणापासून पाहिलेलें होतें. मुलगा तजेलदार, चुणचुणीत, आणि बुद्धीनेंहि चांगला चलाख. आपली बनू त्याला देऊन टाकावी असा विचार करून आपल्या स्नेह्यांच्या द्वारां त्यांनीं गोपिकाबाईशीं बोलणें चालणें सुरू केलें. येवढया मोठ्या माणसाची मुलगी सांगून आली हें पाहून गोपिकाबाईचा रुसका जीवसुद्धां त्या दिवशीं संध्याकाळपर्यंत खुशींत होता. मुलगा पाहण्याचा संस्कार झाला. घसघशीत हुंडा, करणी यांचा ठराव होऊन बाळूचें लग्न सातार्‍यास मोठ्या थाटानें झालें.

—पण लग्न झाल्यानंतर कांहींजणांच्या ध्यानांत आलें कीं, नवर्‍या-

मुलीच्या पायांत कांहीं तरी दोष असावा. घरांत वावरतांनाहि पार्वतीच्या पायांतील दोष दिसूं लागला. पण तो बारकाईनें पाहिला तरच ध्यानांत येई. माधव वयानें लहान खरा, पण मोठा समजदार मुलगा होता. एरवीं पार्वती फार सुंदर होती; आणि तेव्हांच्या मानानें कांहींशी शिकलेलीहि होती. परंतु गोपिकाबाईंना वाटूं लागलें कीं, आपली फसवणूक झाली आहे; आणि आपल्या माधवच्या गळ्यांत एक लंगडी पोर जनार्दनपंतांनीं बांधली आहे. अगोदरच गोपिकाबाई नेहमीं घुश्श्यांत असायच्या; त्यांतच आतां आपण फसलों आहों या जाणिवेचा अपमान मिसळला; मग काय विचारतां ! सुनेचा त्या अगदीं दुस्वास करूं लागल्या. शेजारणी म्हणूं लागल्या, " ही बाई पहिल्यापेक्षांहि रागीट बनली आहे. "

सुनेला बरोबर घेरून त्या कौतुकानें कोणाकडे गेल्या आहेत, किंवा कोणी घरीं आलें असतां, 'ह्या आमच्या सूनबाई' असें म्हणून मायेनें त्यांनीं पार्वतीला जवळ बोलावून घेतलें आहे, – असें कधीं झालेंच नाहीं. एरव्हीं घरांत पार्वती इकडेतिकडे वावरत असली तर सासूबाईंचें मुस्कट भिंतीकडे वळलेलें असायचें. आणि 'हें कर', 'तें कर', 'हें करूं नको', 'तें करूं नको' अशी हुकमांची सरबत्ती भिंतीकडे तोंड करूनच चालायची ! सासूबाईंची मुखश्री, त्या अतिशय रागावल्या म्हणजे, पार्वतीच्या दृष्टीस पडे. त्या वेळीं त्या सन्मुख होऊन फडाफड बोलूं लागत, " तुझ्या बापाला येवढी लाज वाटूं नये का? आपली पोरगी लंगडी – तर एखाद्या भिकाऱ्याच्या गळ्यांत त्यांनीं कां नाहीं बांधली ? हे पहिल्यापासूनचे जुने स्नेही म्हणून मी एकदम 'हो' म्हटलं. माझा सोन्यासारखा मुलगा. त्याच्यावरून तुमच्या दीड हजार रुपड्या केव्हांच ओंवाळून टाकल्या असत्या. " असे एक ना दोन – नाना तऱ्हेचे शब्द पार्वतीकडे हातवारे करून त्या बोलत. मुळूमुळू रडण्यापलीकडे तिला कांहींच करतां येत नसे. गोपिकाबाई म्हणत, " बघा, एक शब्द तरी बोलतेय् का? कारटे ! रडून घालवतीस काय?" गोपिकाबाईंचा हा फणकारा आसपासच्या घरांत सर्वांना ऐकूं जाई. तीं म्हणत, " आधींच काय – अवतार ! म्हणतात ना,–त्यांतली गत व्हायची !"

माधव सुट्टीला घरीं येई. पुण्यावरून तो येई, तर वाटेंत त्यानें साताऱ्याला उतरावें, चार–आठ दिवस रहावें आणि माहेरीं आलेल्या पार्वतीला घेऊनच

आपल्या गांवीं जावें, अशी जनार्दनपंतांची फारफार इच्छा असे. परंतु आईला विचारल्याशिवाय कोणतीहि गोष्ट करण्याची माधवची प्राज्ञाच नव्हती. गोपिकाबाई एखाद्या दिवशीं रागावून बोलूं लागल्या म्हणजे आपल्याला हींव भरेल कीं काय, असें माधवला वाटूं लागे. मग त्या पार्वतीची काय त्रेधा उडत असेल याची कल्पनाच केलेली बरी !

एकदां मात्र धीर धरून, आईला न विचारतां, माधवनें सासऱ्याला लिहिलें कीं, 'अमुक दिवशीं मी साताऱ्याला येत आहें. आठ दिवस राहून, सौभाग्यवतीला घेऊन मी घरीं जाईन. पार्वती आतां न्हातीधुती झाली होती; आणि न्हाणवलीचे सर्व संस्कार, रागाच्या भरांतच का होईना, पण गोपिकाबाईनीं करून टाकले होते. न करावे तर पुढें जनार्दनपंतांकडून हबकावयाच्या पैशांत घट व्हायची ! संताप आणि व्यवहार यांचा मेळ घालण्याच्या कामीं गोपिकाबाईना फार कष्ट पडत; पण संतापाचा पारा खालीं आणून, व्यवहारांतला लाभ हस्तगत करण्याइतपत तारतम्य त्यांच्या अंगीं होतें. तथापि, बायकोला घेऊन जेव्हां माधव घरीं आला तेव्हां गोपिकाबाईच्या डोक्याला एकदम तिडीकच उठली. कारण त्यांना न विचारतां तो पार्वतीला घेऊन आला होता !

त्या दोघांना पडवीवर पुरतें चढूं देण्याच्या आधींच गोपिकाबाई रागारागानें म्हणाल्या, "तुला हा लांडा कारभार सांगितला होता कुणीं ? कारट्या, मी काय मेलें होतें का ? मला न विचारतां तूं गेलास कां ? आणि लुबऱ्यासारखा गेलास तो गेलास; पण बायकोला घेऊन यायला तुला कोणीं सांगितलें ?" माधव आईकडे टक लावून उभा राहिला होता. सरबत्तीचा जोस कांहींसा उतरला आहे असें दिसूं लागल्यावर तो किंचित् हंसला. पार्वती तिथेंच थबकून उभी होती. सासूबाईचा हा कडकडाट ऐकून ती अगदीं घाबरून गेली, आणि पुढें घरांत जावें का नाहीं हेंसुद्धां तिला कळेना. 'घरांत जा' अशी खूण तिला माधवनें मानेनें केली. गोपिकाबाईनीं तेंहि पाहिलें, आणि त्यांच्या संतापाला दुसरी भरती आली. त्या म्हणाल्या, "काय दांत काढतो आहे पण, – आणि काय आपल्या बायकोचा पक्ष घेतो आहे !" इतकें बोलून त्या स्वयंपाकघरांत गेल्या. पण जातां जातां येवढेंच म्हणाल्या, "हं, आतां विहिरीवर जा. उन्हाची वेळ

आहे; अंघोळी करा. पार्वती, तूंहि डोक्यावरून पाणी घे. बरं का रे माधव, तुझी संध्याविंध्या होत आहे तोंपर्यंत भाताला कढ येईल."

बाळूची धाकटी बहीण या सगळ्या प्रकाराकडे अगदीं खिन्न मनानें पहात असे. घरांत सारखा चाललेला आईचा चडफडाट पाहून ती अगदीं सर्दच होऊन जाई. वहिनीचें आणि तिचें चांगलें जमलें होतें; पण तेंसुद्धां गोपिकाबाईंना खपत नसे. त्या दोघी कोठें बोलत बसलेल्या पाहिल्या म्हणजे गोपिकाबाई गर्जत, "काय ग, तुझं तुला काम नाहीं का कांहीं? ही तर काय शेफारलीच आहे. तिला वाटतं कीं, 'नवरा आपल्या अंगचा आहे, आतां ही किती का कोकलेना! आपण वाटेल तसं वागावं.' पण ध्यानांत ठेव, तुला ह्या घरांत राहूं द्यायची नाहीं मी. असली लंगडी पोरगी माझ्या पोराच्या गळ्यांत बांधायला तुझ्या बापाला लाज नाहीं वाटली? त्याच्या नाकावर टिच्चून मी बाळूचं दुसरं लग्न करीन." ही दुसऱ्या लग्नाची भाषा सासूबाईंच्या तोंडून निघाली म्हणजे पार्वती मनानें अगदीं घाबरी होई. पण तिची ती धाकटी नणंद चोरट्या नजरेनें तिच्याकडे पाही आणि सुचवी कीं, "वहिनी, तूं घाबरूं नकोस. आईचं हें बोलणं मला मुळींच पसंत नाहीं."

आज दुधाच्या पातेल्यालाच लाथ लागली, उद्यां फुलांची परडीच ठेंचकळली, अशा अनेक तक्रारी गोपिकाबाई नित्यशः करूं लागल्या. पार्वतीच्या पायांत किंचित्सा दोष होता यांत शंका नाहीं, पण ती लंगडी नव्हती; आणि आंधळी तर नव्हतीच नव्हती. सत्ताधारी आणि कजाग माणसाच्या संगतींत लहान माणसांना उगाचच गांगरल्यासारखें होतें; आणि त्याच्या हातून कांहीं सांडतें — लवंडतें; पण याचा अर्थ तीं आंधळीं किंवा लंगडीं असतात असा नव्हे. गोपिकाबाईंच्या तामसी कडकडाटानें पार्वतीला पुष्कळदां गोंधळल्यासारखें होई; आणि असल्या चुका केव्हां केव्हां तिच्या हातून होतहि. पण गोपिकाबाई तेवढ्याचाच बाऊ करीत. त्यांनीं सगळीकडे असाच समज पसरवून दिला कीं, पार्वती लंगडी तर आहेच; पण तिच्या बाहुल्यासुद्धां उरफाट्या आहेत!

तेव्हांच्या चालीप्रमाणें गळपट्टा विणणें, अंगांतलें लोंकरीचें जाकीट विणणें हीं कामें विशेष फॅशनचीं म्हणून समजत असत. माधव आतां

शिक्षण संपवून बापाचाच वकिलीचा धंदा करूं लागला होता. निरनिराळ्या रंगांच्या लोकरी, सुया असलें सामान तो बायकोला आणून देई; आणि पार्वतीहि नाना प्रकारच्या लोंकरीच्या फार सुंदर वस्तु करी. बायकांचा सुग्रणपणा तिच्या ठिकाणीं पुरापुरा दिसून येई. एकीकडे सासूबाईच्या अवकृपेचें कडक ऊन जरी तिच्या अंगावर पडलेलें असलें तरी नवऱ्याच्या प्रीतीची आतिशय घनदाट आणि सुगंधी सावली आपल्यावर दुसरीकडून पडत आहे, याची जाणीव तिला असल्यामुळें ती मनानें सुखीच होती.

दुर्दैव असें कीं, नवराबायकोची गांठ पडून बरेच महिने लोटले तरी पार्वतीला दिवस गेल्याचें कांहीं चिन्ह दिसेना. सासूबाईनीं याचाहि मोठा बाऊ केला. माजघरांतल्या कोंपऱ्यांत बसून शेजाऱ्यापाजाऱ्यांना ऐकूं जाईल अशा बेतानें त्या मधूनमधून म्हणूं लागल्या, "हें ध्यान वांझोटहि निघतंय कीं काय, कुणास ठाऊक!" हें त्यांचें वाक्ताडन पार्वतीच्या अगदीं मर्मी लागे. स्त्रियांचा खरा अपमान त्यांना कोणीं वांझ म्हटल्यानें होतो. वास्तविक असा शेरा मारण्याला गोपिकाबाईंना बिलकुल जागा नव्हती. त्यांची धाकटी मुलगी कांहींशी रागावून त्यांना म्हणे, "आई, तूं असं काय बोलतेस ग! एखाद्याला मूल लवकर होतं, एखाद्याला उशीरा होतं. पण लवकर झालं नाहीं म्हणून एखाद्याला वांझोट म्हणायचं, हें काय ग?"

"बरं, बरं!" गोपिकाबाई गर्जायच्या, "तुला चोंबडेपणा करायला कुणीं सांगितलंय? शेजारच्या रखमाबाईची सून पहा. ती हिच्याएवढीच आहे; पण तिला एक मूल होऊन आतां दुसऱ्यांदा दिवस गेले आहेत. तूं काय मला सांगतेस! अगोदर ही बावळी, लंगडी, आंधळी, अन् त्यांत वांझोटी—!'

आईचें हें घालूनपाडून बोलणें माधवला बिलकुल आवडत नसे. तो जर आईसारखाच कजाग असता तर घरांत रोज भांडणाची धुमाळीच माजली असती. पण प्रकृतीनें तो मोठा सौम्य. आईचा हा कडकडाट ऐकून खुर्चीवर बसल्या बसल्या तो पुष्कळदां मौजेनें हंसे; आणि कांहीं फराळाचें वगैरे घेऊन आलेल्या बायकोला म्हणे, "आतां आपल्या सासूबाईना सांगा, कीं आमच्याकडे चार मंडळी यायची आहेत. तेव्हां आपला हा गोळीबार जरा बंद ठेवा."

“ वा—वा ! मी सांगूं होय हा निरोप ! ” पार्वती म्हणे, “ मी जर का असं कांहीं बोललें तर बंदुकीची दुसरी फैर सुरू होईल ना ! ”

गोपिकाबाईंना मात्र दिवसेंदिवस असें वाटूं लागलें कीं पोर आपल्या कह्याच्या बाहेर जाऊं लागलें आहे. तें पुरतें जाण्याच्या आंतच दुसऱ्या लग्नाचा बार उडवला पाहिजे. असें त्यांच्या मनानें घेतलें, आणि मग पार्वतीवर खरेखोटे वाटेल ते आळ त्या घेऊं लागल्या.

पार्वतीच्या छळाची वार्ता जनार्दनपंतांपर्यंत पोंचली होती. आपली मुलगी पायांत थोडीशी अधु आहे; आणि आपण ही गोष्ट लग्नाच्या वेळीं गोपिकाबाईंना सांगितली नाहीं याचें स्मरण त्यांना होतेंच. हा आत्माव-रोपाचा घुटका ते मधूनमधून गिळत असत. परंतु जांवयाचें आणि मुलीचें रहस्य चांगलें आहे, तर घरांतली ही चंडिका काय करणार, असा हिशेब त्यांनीं आपल्या मनाशीं केला होता. पण आतांआतांशा घरांतलें वारें पुष्कळच तापूं लागलें आहे ही बातमी लागतांच त्यांना चैन पडेनासें झालें. आतां त्यांनीं ‘ पेणसल ’ घेतली होती. पण स्नेह्याकडे आल्याचा बहाणा करून एकदां मुलीकडची हालहवाल प्रत्यक्ष पाहून यावी म्हणून ते जामातांच्या गांवीं गेले.

व्याही गांवांत आले आहेत ही वार्ता गोपिकाबाईंना कशी ना कशी लागली. शिष्टाचार म्हणून त्यांना बोलवावें लागेल, हें ओळखून त्यांनीं औदुंबराच्या यात्रेचा बूट काढला; आणि सुनेला घरीं एकटीच ठेवून त्या यात्रेला निघून गेल्या. याच वेळेस खटल्यानिमित्त माधवला अचानक परगांवीं जावें लागलें. हें एका परीनें जनार्दनपंतांच्या सोयीचेंच झालें. मुलीच्या घरीं जाऊन त्यांनीं तिची सर्व तऱ्हेची चौकशी केली. पण चम-त्कार असा कीं, ‘ बनी ’नें कसलेंहि गाऱ्हाणें त्यांच्यापाशीं केलें नाहीं. जणूं कांहीं सर्व ठीक आहे, अशा थाटानेंच ती बोलत होती. तिचें हें धोरण पाहून जनार्दनपंतांना आपल्या छद्माचें जास्तच वाईट वाटूं लागलें; आणि मुलगी आपल्यापेक्षांहि जास्त समंजस आहे अशी खूणगांठ त्यांनीं मनाशीं बांधली. ‘ जेवायला रहा ’ असें ती एकदां म्हणाली; पण तेंसुद्धां चांचपडतच !

जनार्दनपंत आपल्या मित्राकडे गेले; आणि पोरीशीं झालेलें बोलणें त्यांनीं त्याला सांगितलें. तेव्हां तो मित्र आणि त्याची बायको पंतांना म्हणाली, 'तुम्हाला त्रास होऊं नये म्हणून मुलगी असें बोलली, इतकेंच. बाकी रोज तिचा काय भाजाकार चालला आहे हें साऱ्या जगाला माहीत आहे. अन् आतां तर गोपिकाबाई दुसऱ्या लग्नाच्या गोष्टी बोलत आहे.' हे शेवटचे शब्द ऐकतांच जनार्दनपंत अगदीं सर्द होऊन गेले. साताऱ्याला परत जातांना मित्राला आणि वहिनींना ते गहिवरून म्हणाले, "थोडं लक्ष असूं द्या; पोर अगदीं गरीब आहे."

व्याह्यांची 'ब्याद' गेल्यावर गोपिकाबाई औदुंबराहून परत आल्या. येतांक्षणींच त्या सुनेवर कडाडल्या, "पत्र धाडून बापाला बोलावून आणलंस का ? काय तुझा बाप करणार आहे ? सगळ्यांच्या देखत माझी छीः थू करावी म्हणून तुम्हीं हा डाव रचलेला होता. पण माझी अब्रू त्या दत्तानेंच वांचवली. तुझ्यासारख्या नष्ट पोरीला घालवून देऊन बाळूचं दुसरं लग्न करण्याचा संकल्प सोडूनच मी परत आलें आहे, समजलीस !" यावर काय बोलावें हेंच पार्वतीला कळेना.

तिच्या दुर्दैवानें पांच चार महिन्यांच्या आंतच जनार्दनपंतांना पक्षाघात झाला, आणि त्यांतच त्यांचा अंत झाला. इकडे घरांत दुसऱ्या लग्नाचा ठोका सारखा चालू, आणि तिकडे वडीलहि वारले;–यामुळें पार्वती अगदीं भेदरून गेली. एव्हाना माधव परत आला होता. तो परत आल्यावर पार्वतीनें रडत–भेकत सारी हकीकत त्याला एकान्तांत सांगितली. कांहीं वेळपर्यंत शून्य नजरेनें भिंतीकडे पहात तो बसला होता. शेवटीं मनांत कसला तरी निश्चय करून तो उठला, आणि प्रीतियुक्त नजरेनें एकदां बायकोकडे पाहून बाहेर निघून गेला. माधवचा 'माधवराव' झाला होता खरा; पण आईच्या तोंडीं अजून 'बाळ्या'च होता. हा 'बायल्या' बनला आहे असें त्या चारचौघांच्या देखत बेलाशक म्हणत. माधवरावांना एखाद्या वेळीं वाटे कीं, आईला काड्कन् प्रत्युत्तर करावें; पण त्याला धीर होईना;–हा बोजा त्याला उचलेना. 'तुझ्या दुसऱ्या लग्नाची तयारी मी आतां करणार.' असें त्या त्याला उघड उघड सांगूं लागल्या.

माधव भिडेमुळें गप्प बसला तरी तो थोडासा आंतल्या गांठीचाच होता. आईला न दुखावण्याचें धोरण त्यानें चालू ठेवलें.

तेव्हां जनार्दनपंत वारल्यावर पार्वतीला घरीं पाठवणें शोभूनच दिसलें असतें; म्हणून ही संधि साधून गोपिकाबाईनीं तिला माहेरीं पिटाळून दिली, आणि मग दुसऱ्या लग्नाचा धोशाच सुरू ठेवला.

माधवरावाचा गोपाळमामा मोठा गंमतीदार माणूस होता. त्याची ताई म्हणजे गोपिकाबाई, आणि तो – हीं दोन मुलें एकाच कुशींतून निपजलेलीं; पण त्यांचे स्वभाव पाहिले म्हणजे हीं बहीणभावंडें असें कोणाला वाटलेंहि नसतें ! गोपिकाबाई अशा कजाग; तर गोपाळ नेहमीं खुषींत असावयाचा. यांचा स्वभाव नेहमीं रुसका; तर त्याला विनोदाशिवाय कधीं चैन पडायचें नाहीं. प्रपंचांत एखादी नवीन गोष्ट घडली तर आपला संताप वाढवण्याला गोपिकाबाई तिचा उपयोग सर्पणासारखा करून घेत; उलट गोपाळ हा असलीच एखादी गोष्ट थट्टेवारी नेऊन भोंवतालीं हास्यविनोदाचें वारें उत्पन्न करी. एवढें खरें, कीं मामा–भाच्याचें मात्र चांगलें रहस्य होतें.

गोपाळमामांच्या कानांवर पार्वतीच्या भाजाकाराचें वर्तमान नेहमीं जात असे; पण एखादें भांडण दत्तक घेऊन भांडत बसावें हा त्याचा स्वभावच नव्हता. होतां होतां, एके दिवशीं माधव खटल्याखोकल्याचें निमित्त करून आपल्या आजोळीं मुद्दामच गेला; आणि संध्याकाळच्या वेळीं मामाबरोबर फिरायला गेला असतांना त्यानें आपली सारी हकीकत मामाच्या कानांवर घातली.

तो म्हणाला, " मामा, मीं आतां करावं तरी काय ? आईनं हें घर मला अगदीं नकोसं केलं आहे. ती माझी आई; आणि वैधव्याच्या दुःखांत-सुद्धां आम्हां मुलांचा प्रतिपाळ तिनं मोठ्या काळजीकाळ्यानं केला; माझी विद्याहि तिनं केली; यामुळं तिला टाकून बोलायचं माझ्या जिवावर येतं. तुझ्या भाचेसुनेला तर तिनं अगदीं भंडावून सोडलं आहे. मी बहुधा बैठकींत बसलेला असतों; आणि मला कामधंद्यासाठीं मधूनमधून बाहेरगांवींहि जावं लागतं. त्यामुळं माझ्या मनाचा उद्वेग थोडा तरी कमी होतो. पण

हिला अष्टौप्रहर घरांतच बसावं लागतं; अन् आईचं तोंड तर सारखं चाललेलं असतं. तिला जीव अगदीं नकोसा झाला आहे बघ, पण यासंबंधानं ती एक अवाक्षर दुसऱ्या कोणापाशीं बोलत नाहीं. ”

मामानें विचारलें, “ का रे माधव, पार्वती कितीशी लंगडी आहे? जनार्दनपंतांनीं या दोषाचा उच्चार लग्नाच्या वेळीं केला होता का ? ”

“ हो, तें तुला सांगतों. ‘ लंगडी ’ हा शब्द शुद्ध अतिशयोक्तीचा आहे. तिच्या पायांत थोडासा दोष आहे हें खरें; पण ‘ लंगडी–लंगडी ’ म्हणून सगळीकडे तिची दवंडी पिटणं हें अगदीं अन्यायाचं आहे. ”

“ तिला कमी दिसतं का रे? आम्ही असं ऐकतों कीं ती सांडते लवंडते. ”

“ हें तर शुद्ध बालंट आहे. तिची दृष्टि चांगली आहे; इतकंच नव्हे तर—” माधव थोड्या कंपित आवाजानें म्हणाला, “ तिचे डोळे कसल्याहि सुस्वरूप स्त्रीला शोभण्यासारखे आहेत. पण ती थोडी भित्री आहे. आई एकदां कडाडूं लागली म्हणजे ती गांगरून जाते, आणि असले कांहीं प्रकार तिच्या हातून घडतात. ”

“ आतां आमच्या या ताईला काय करावं हेंच मला कळत नाहीं. ”

“ पण मामा, आतां तर आई याच्याहि पुढं गेली आहे. ती मला रोज सांगते कीं ‘ मी तुझं दुसरं लग्न करणार आहें. मला असली लंगडी, आंधळी, अन् वांझोटी सून नको! ’ ”

“ काय, वांझोटी ? ” गोपाळराव आश्चर्यानें उद्गारला.

“ हो हो, वांझोटी. आईनं हें एक नवीनच काढलं आहे. सर्व गांवांत माझ्या दुसऱ्या लग्नाचा विषय ज्याच्या त्याच्या तोंडीं आहे. ”

गोपाळमामा बराच वेळ गप्प बसला. त्यानें इकडे पाहिलें, तिकडे पाहिलें; आणि तो भाच्याला म्हणाला, “ माधव, आई म्हणते तर तुला पुन्हां लग्न केलं पाहिजे! ” पण हे शब्द बोलतांना त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा मिस्किलपणा उमटला आहे, हें माधवला स्वच्छ दिसलें.

“ मामा! अरे तूं म्हणतोस तरी काय! ”

"अरे, काय बिघडलं ! पुन्हां लग्न केलं म्हणून काय बिघडलं ! आपण सुधारक आहों !" इतकें बोलून तो पुन्हां हसूं लागला.

परत येतांना शेवटीं शेवटीं मामा–भाचे गप्प बसलेले होते. मामाच्या मनांत बेत चालू होता, भाच्याच्या मनांत काहूर उठलें होतें. घरीं आल्यावर जेवणींखाणीं आटपलीं, आणि मामा माधवला एवढेंच म्हणाला कीं, "आतां हें प्रकरण तूं माझ्याकडे सोंपव. तुझ्या मनाला कसला ताप होतो आहे ! मी तें निकालांत काढून टाकतों." आतां माधवचें मन निर्धास्त झालें; कारण मामाचा शब्द खरा असतो हें त्याला माहीत होतें. खटल्याचें निमित्त संपवून माधव आपल्या घरीं गेला.

गोपिकाबाईनीं व्याह्यांच्या मरणाचें निमित्त काढून पार्वतीला माहेरीं पिटाळून दिलीच होती. त्यामुळें घरचें सारें राज्य सर्वथा त्यांच्या तंत्रानें चालू झालें होतें. आतां आपल्यासंबंधानें बाजूला कोणी कुचूकुचू करील ही भीति त्यांना राहिली नव्हती. माधव थोडासा अस्वस्थच होता. तेव्हां त्या त्याला एकदां म्हणाल्या, "हें बघ, तिला आणायची आतां घाई करूं नकोस. तिचे वडील वारले आहेत; आणि मुलगी बापाची फार लाडकी. तिला इथं चैन पडायचं नाहीं. राहूं दे तिला तिथं आईपाशींच चार–सहा महिने."

माधव वकीलच होता; आणि शिवाय ज्याच्या मनांत एखादा विषय सारखा घोळत असतो त्याला त्या विषयांत दुसऱ्यानें चालविलेले डावपेंच चांगले कळतात. आपल्या बायकोच्या मनाचें पुरतें सान्त्वन व्हावें, आईच्या मायेचें साहचर्य तिला लाभावें, एवढी उदार भावना आपल्या आईच्या पोटीं कां उद्भवली असावी याचा अंदाज माधवनें बरोबर केला. संशय, वहीम, आणि अंदाजाचा अचूकपणा हीं पुष्कळदां एकत्रच नांदतात. आईच्या मनांत तिला परत सासरीं येऊं द्यावयाचें नाहीं हें त्यानें ओळखलें; आणि आईची इच्छा त्यानें मामाला लिहून कळविली.

मामाचें पत्र उलट डाकेनेंच आलें. त्यानें लिहिलें होतें कीं, "हें फार चांगलें आहे; सुनेनें परत घरीं येऊं नये ही ताईची इच्छा मला बरी वाटते. तूं त्याप्रमाणें सासुरवाडीला लिहून धाड कीं, सौभाग्यवतीला तिकडेच ठेवून घ्यावें."

मामाच्या मनांत काय खेळ चालू आहे, याची अटकळ माधवला करतां येईना. पण ' मी तुला त्रास न देतां हें प्रकरण निकालांत काढणार आहें, ' एवढें त्याच्याकडून मिळालेलें आश्वासन माधवला पुरेसें होतें. त्यानें सासूबाईंना लिहिले कीं, ' सौभाग्यवतीला चार–सहा महिने तिकडेच ठेवून घ्यावें. ' आणि असें लिहिल्याचें त्यानें आईलाहि सांगून टाकलें. आतां गोपिकाबाईंचा जीव भांड्यांत पडला.

अन् मग त्यांचें कवचाल सुरू झालें. ज्यांच्याशीं त्या कधीं बोलल्याहि नव्हत्या, त्यांनासुद्धां मुद्दाम त्या हांका मारून सांगूं लागल्या, " पहा बाई, कुणाचा बाप मरत का नाहीं ? पण म्हणून कुणी माहेरीं का असं दडी देऊन बसतं ! तिला नकोच आहे सासर, दुसरं काय ! ! " आजूबाजूच्या बायाबापड्या तोंडदेखल्या बोलत, आणि तिनें असें करायला नको होतें असें म्हणत. मग एखाद्या दिवशीं गोपिकाबाई म्हणायच्या, " आतां माझ्या लेकाच्या दुसऱ्या लग्नाची गोष्ट मीं काढली तर त्यांत माझं हो काय चुकलं ?—तुम्हीच सांगा ! अहो, मी हें मागंच ओळखलं होतं. पण मी बोललें म्हणजे सासू वाईट–!" गोपिकाबाईंचा हा कांगावा दोनतीन महिने चालू राहिला, आणि मग त्या खरोखरीच मुलीच्या शोधाला लागल्या.

माधवनें ही वार्ता मामाला कळविली, आणि मामा टांकोटांक ताईला भेटायला आला. जेवणींखाणीं आटपलीं, आणि रात्रीच्या वेळीं—अंगणांत एक पार होता तिथें बहीणभाऊ बोलत बसलीं. झोंपेचें मिष करून माधव माडीवर निघून गेला. गोपिकाबाईनाहि नेमकें हेंच हवें होतें. मग त्यांनीं गोपाळपुढें सुनेचा सगळा पाढा वाचला. पार्वती लंगडी कशी, जनार्दनपंतांनीं आपल्याला कसें फसवलें, ती आंधळी कशी, ती वांझोटी कशी, ती माहेरीं कशी दडी देऊन बसली आहे,—अशा साऱ्या गोष्टी त्यांनीं रंगवून रंगवून गोपाळला सांगितल्या. गोपाळ मधून मधून म्हणे, " होय ना ? मला नव्हतं वाटलं कीं या एवढ्या चिमुरड्या पोरीच्या अंगांत असले ढंग असतील. "

" छे, छे, छे, छे ! ती पोरगी अगदीं हरदम आहे. अरे,

माझ्यासारख्या चार सास्वा गुंडाळून ठेवील ती. आतां आपल्या पोराला आपणच सांभाळलं पाहिजे. या वैशाखांत त्याचं आतां दुसरं लग्न करून टाकलं पाहिजे, म्हणतें. ”

“ ताई, तुझं म्हणणं बरोबर आहे—” इतकें बोलून गोपाळ थोडासा हसूं लागला.

“ कां, तूं हंसतोससा ? तुला हें पसंत नाहीं वाटतं ? ”

“ छे, छे ! ताई, मी तुझ्याबाहेर नाहीं. खरं म्हणजे तूं हें ठरवायला इतका वेळ घेतलास याचंच मला नवल वाटलं; आणि म्हणून मी हंसलों ! ”

“ हें बघ, अरे एकदम एखाद्या पोरीच्या जन्माचं मातेरं करायचं हें तरी बरं आहे का ? म्हणून मी आपली गप्प बसलें होतें. पण आतां-गोपाळा, हें फार झालं. असं कर; मी आतां कुठं जाणार मुली बघायला ? तूंच पहा चांगलीशी एखादी, झालं. ”

“ बरं, तसं कां होईना. आतां हें तूं माझ्याकडे सोंपव. माधव एकटा रहावा हें मलासुद्धां पसंत नाहीं. ”

बहीणभावांचा हा संवाद अंगणांतल्या पारावर चालला होता खरा; पण माडीवर निजलेल्या माधवनं तो कान देऊन चांगला ऐकला, अन् तो मनांत म्हणाला, ‘ मामानंहि आईकडून हा विषय अखेरीस आपल्याच हातीं घेतला, बरं झालं ! ’ जिन्यावर मामाचीं पावलें वाजूं लागलीं, आणि माधव एकाएकीं घोरूंसुद्धां लागला !

आपल्या गांवीं गेल्यावर गोपाळमामानें आपली करामत सुरू केली. ‘ माझ्या भाचेसुनेला थोडे दिवस आमच्याकडे पाठवून द्या ’ असें त्यानें पार्वतीच्या आईला लिहिलें. आणि माधवला लिहिलें कीं, ‘ थोडासा वेळ काढून आमच्या गांवीं येऊन जा. कारण येथल्या खोताशीं आंब्याच्या झाडासंबंधानें आमचा कांहीं वाद पडला आहे. ’ आपल्या कायद्याच्या ज्ञानाचा सल्ला मामाला हवा असेलहि, पण खरें कारण कांहीं तरी निराळेंच असलें पाहिजे हें माधवनें ओळखलें. नवराबायको दोघेंहि आपापल्या गांवांहून गोपाळमामांच्या घरीं दाखल झालीं.

वडिलांच्या मरणाचें पार्वतीचें दुःख कमी कमी होत चाललें होतें; पण सासरचा पेंच वाढत जातो कीं काय, ही तिची धास्ती वाढत चालली होती. माधवला मात्र मामा काय करतो या कुतूहलाच्या पलीकडे कांहींच निश्चित कल्पना होईना. पांचचार दिवस गेल्यावर आणि कायदेशीर सल्ल्याचें नाटक संपल्यावर गोपाळमामा त्या दोघांना घेऊन बोलत बसला असतां माधवला म्हणाला, " माधव, तुझं दुसरं लग्न करण्याचा आईचा बेत मलाहि पसंत आहे. "

हे त्याचे शब्द ऐकतांच पाण्यांत टाकलेल्या ढेकळाप्रमाणें पार्वती अगदीं विरघळून गेली; आणि ती मामेसासऱ्याकडे शून्य नजरेनें पाहूं लागली ! तो मामेसासरा तिच्याकडे पाहून लगोलग म्हणाला, " अग, तुझंहि लग्न करायचं आहे; आपण सुधारक आहों ! म्हणून तर तुम्हां दोघांना मीं इथं बोलावून आणलं आहे. "

माधवला अन् पार्वतीला मामाच्या या बोलण्याचा अर्थच कळेना. तीं त्याच्याकडे वेड्यासारखीं पाहूं लागलीं. मामा म्हणाला, " मी तुमच्या मनाविरुद्ध कांहीं करणार नाहीं. पण मी आतांच म्हणालों तें खरं केल्याशिवाय राहणार नाहीं. तुम्ही आज संध्याकाळीं माझ्याबरोबर आमराईकडे फिरायला चला. "

तिघेंजणें आमराईकडून फिरून आलीं तेव्हां सर्वांच्याच चेहऱ्यांवर चांगलें प्रसन्न हास्य झळकत होतें. त्यांचें बोलणें काय झालें असेल तें असो; पण मामांचा बेत ऐकून माधव–पार्वती अगदीं चकित होऊन गेलीं होतीं, हें खरें. आतां कोणी कांहीं जास्त बोललें नाहीं, पण दुसऱ्या दिवशीं सकाळीं माधव–पार्वतीला दिसून आलें कीं, मामांनीं आपला बेत मामींना कळवला आहे; आणि एरवीचें बोलणें चालू असतांनाहि त्या आपल्याकडे बघून मंजुळपणें हंसत आहेत.

कायदेशीर सल्ला देण्याचें काम संपलें होतें; कदाचित् खोताचें समाधान झालें असावें. आईनें दिलेली पार्वतीच्या मुक्कामाची मुदत संपत आली होती. म्हणून माधव–पार्वती पुन्हां आपापल्या गांवाला निघून गेलीं.

वैशाखाचा महिना उगवला. गांवागांवांतून वाजंत्रीं वाजूं लागलीं.

गोपिकाबाईनीं माधवचा कानोसा घेतला; आणि त्यानेंहि सांगितलें कीं ‘ लग्न करायला माझी कांहीं हरकत नाहीं. ’ गोपिकाबाई अगदीं हरखून गेल्या ! माधव म्हणाला, “ मामानं कांहीं मुली पाहिल्या असाव्यात मला वाटतं. मी परवां त्याच्याकडे गेलों होतों, तेव्हां त्यानं मला एक मुलगी दाखविलीहि होती. ’

“ मला वाटलंच होतं कीं, गोपाळा बोलल्याप्रमाणं केल्यावांचून रहायचा नाहीं. ”

“ अग, तुझाच भाऊ तो ! ”

“ बरं, मग आतां त्याला लौकर पत्र टाक. ”

“ आई, पण आतां असं बघ, तुझ्या मनाप्रमाणं घडत आहे तर थोडं मामाच्या कलानं चाललं पाहिजे. तो काय म्हणेल त्याप्रमाणं आपण केलं पाहिजे. ”

“ किती शहाणा आहेस, माधव, तूं. आपण त्याच्या कलाप्रमाणंच वागूं.”

आठ–दहा दिवस गेले, आणि गोपाळमामाचें पत्र आलें. माधवनें पत्र आईला वाचून दाखविलें. पत्रांत लिहिलें होतें—

चि. माधव यास,

अनेक आशीर्वाद, वि. वि.—

तुझें पुन्हां लग्न होणार ही गोष्ट तुला, ताईला, किंवा मला,–कुणालाच आवडण्यासारखी नाहीं; पण नाइलाजानें आपण ही गोष्ट करीत आहों. एक बायको असतांना सवतपणावर आपली मुलगी देण्याला कोणी सहसा तयार होत नाहीं. आणि तुमच्या तिकडे तर या गोष्टीचा गवगवा फार झालेला आहे. शिवाय तिथले लोक मोठे कुभांडखोर. पार्वतीला ताईनें फार छळलें हे शब्द ज्याच्या त्याच्या तोंडीं आहेत. म्हणून या लग्नाच्या गोष्टीचा बभ्रा होऊं देतां कामा नये. आयत्या वेळीं कोणीहि मोडता घालील. तेव्हां मी इकडेच तुझें लग्न उरकायचें ठरवलें आहे.

तुझा

गोपाळमामा

पत्र ऐकून गोपिकाबाई म्हणाल्या, "अगदीं खरं आहे. त्याला तूं लिही कीं, मीसुद्धां तिकडे येत नाहीं. तूं आपला एके दिवशीं खटल्या-साठीं म्हणून जा; आणि नवीन बायको घेऊन परत ये. बापाचं दुःख विसरून तें ध्यान परत येण्याच्या आधींच आपला बेत उरकलेला बरा. मी इथनं हाललें म्हणजे उगाच बोभाटा होईल."

"आई, तूं म्हणतेस तें खरं. मीच एकटा जाऊन लग्न आटोपून येतों."

माधव गोपाळमामाच्या गांवाला गेला. ठरल्याप्रमाणें साऱ्या गोष्टी घडून आल्या. कोणीं कसलाहि बोभाटा केला नाहीं. पुढें गोपाळमामाचें पत्र गोपिकाबाईंना आलें. माधवच्या धाकट्या बहिणीनें पत्र आईला वाचून दाखविलें.

त्यांत त्यानें म्हटलें होतें कीं, 'माधवचें लग्न झालें. मुलगी चांगली आहे. तुला फार आवडेल. आतां लग्न होऊन चुकलें आहे. म्हणून कोणाच्या देवाचें भय आपल्याला नाहीं. आम्ही दोनतीन दिवसांत तिकडे निघून येत आहों. गुरुवारीं संध्याकाळीं माधव, त्याची बायको, मी, अन् मामी तिकडे येत आहों. आतां कांहीं तरी सोहळा व्हायला हवा. सारें गुपचुप करण्याची आतां जरूरी नाहीं.

संध्याकाळीं सात वाजतां आम्ही गांवाबाहेरील वज्रेश्वराच्या देवळांत येऊन बसतों. तुम्ही वाजंत्र्यांची व गाडीची व्यवस्था करा. दारूकामसुद्धां सोडावें अशी माझी इच्छा आहे. नक्षत्रमाळा, अबदागिरी इत्यादि सारा मिरवणुकीचा थाट अवश्य करावा. आणि गांवांतल्या सुवासिनींनाहि बोलवावें. खणानारळांनीं ओट्या भरण्याची व्यवस्था ठेवावी. वरात दाराशीं आल्यावर पायांवर पाण्याचे कलश ओतण्याचीहि व्यवस्था ठेवावी. नवरा–नवरी घरांत येतील, आणि माजघरांत येऊन तुला नमस्कार कर-तील.' पत्र ऐकून गोपिकाबाईंचा जीव ताटलीएवढाच काय, पराती-एवढा झाला! ज्याचा पाया रचला होता त्याची अशी उभारणी झालेली पाहून त्यांना खरोखर धन्य वाटलें.

मग गोपाळमामानें लिहिल्याप्रमाणें त्यांनीं सर्व तयारी केली. लग्न

दुसरीकडे झालें असलें तरी आपल्या गांवांत नवरा–नवरी यायचीं म्हणजे वरात काढूनच आलीं पाहिजेत, ही देशावरची चाल बरोबर आहे असें त्यांना अर्थातच वाटलें. विरोधकांचीं आणि आपल्या निंदकांचीं तोंडें आपण आतां बंद केलीं आहेत, या जाणीवेमुळें त्या एकदम कामाला लागल्या.

गांवांत मोठेंच कुतूहल उत्पन्न झालें. खणानारळांच्या ओट्यांमुळें सुवासिनीहि पुष्कळ जमल्या. आणि व्हायचें तें होऊन चुकलें, असें पाहून ‘ शेजारणीला तरी कां दुखवा ’ अशा हिशेबानें भोंवतालच्या पुष्कळ आया-बाया जमा झाल्या. गुरुवारीं संध्याकाळीं वज्रेश्वरीच्या देवळाकडे सारी मंडळी जमा झाली.

मुहूर्त दिवेलागणीनंतरचा होता. नवरीला भरगच्च मुंडावळ्या बांधलेल्या होत्या. नव्या दागिन्यांनीं आणि जरतारी वस्त्राभरणांनीं गोपिकाबाईची ही सून नुसती झाकून गेली होती. सून मोठी विनयवती असल्यामुळें ती मर्यादेनें खालीं पहात होती. घोड्यांच्या गाडींत नवरा–बायको व कांहीं मुलें बसलीं, आणि वाजंत्र्यांच्या कडाक्यांत मिरवणूक निघाली.

उपाध्येबोवा, गांवांतील भिक्षुकमंडळी, यांना आरंभालाच दक्षिणेचा देकार झाला; आणि दर कोपऱ्यावर फुटणाऱ्या नारळाच्या वाट्या जमा करणाऱ्या पोरांनीं खूपच दंगल उडवून दिली. नळे–चंद्रजोतींच्या आतष-बाजींत वळणें घेत घेत मिरवणूक गोपिकाबाईच्या दारापाशीं येऊन ठेपली.

गोपिकाबाईच्या जिवाची आतां कोण धांदल उडाली होती ! वैधव्याचें दुःख आणि या मंगल प्रसंगाचा आनंद – यांचा चमत्कारिक कल्लोळ त्यांच्या मनांत उडाला. गाडींतून नवरा–नवरी खालीं उतरलीं. त्यांना लिंबलोण झालें; ओवाळून टाकण्यांत आलें; त्यांच्या पायांवर पाणी घाल-ण्यांत आलें; आणि उभयतांनीं गृह-प्रवेश केला. गोपिकाबाईनीं मुद्दामच माजघराच्या उंबरठ्यावर गहूं भरून अडीश्री ठेवली होती. ती पायानें आंत लवंडून नवी नवरीमुलगी आंत शिरली.

घरांतच ठेवून घेतलेली, या नवरीची धाकटी नणंद मात्र नवरीकडे रोंखून पहात होती; आणि कांहींशी विस्मित झाल्यासारखी दिसत होती. गोपिकाबाईना आनंदाश्रु आवरेनात. अश्रूंच्या कढांनीं त्यांचे डोळे भरभरून चालले होते. नवरीनें पद्धतीप्रमाणें वांकून नमस्कार केला; आणि गोपिकाबाईनीं 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' म्हणून आशीर्वादहि दिला. डोळे पुन्हां पुसून त्यांनीं नव्या सुनेकडे पाहिलें. धाकटी नणंदहि भांबावून पहात होती.

मुलीनें मुंडावळ्या पुरत्या बाजूला सारल्या; आणि – काय चमत्कार झाला ! 'अग बाई ! अग, ही आपली वहिनी !' म्हणून ती नणंद किंचाळून ओरडली; आणि 'हाऽऽ मेल्यांनो !' असे जोराचे करुणोद्गार काढून गोपिकाबाई एकदमच भुईवर कोसळल्या !

रडत–स्फुंदत त्या आक्रोशून म्हणाल्या, 'मला कार्ट्यांनीं फसवलं ग फसवलं ! तीच कैदाशीण माझ्या घरांत पुन्हां आली !' गोपाळमामा कांहींशा कंपित आवाजानें ताईला म्हणाला, 'ताई, तूं असा कजागपणा करूं नको. माधवचं आणि पार्वतीचं मन जर इतकं मिळालं आहे, तर तिला प्रपंचांतून ओढून काढण्यांत काय गोडी आहे बरं ?'

हां हां म्हणतां, नवी नवरी दुसरीतिसरी कोणी नसून पार्वतीच आहे ही बातमी सगळ्या आळींत पसरली; आणि मग गांवभर झाली. ओटीला गेलेल्या सवाष्णी आणि शेजारच्या आयाबाया एकमेकांना म्हणूं लागल्या, "अहो ! आम्हांला वज्रेश्वरीच्या देवळाशींच शंका आली होती." एकजण म्हणाली, "मी तुमच्या कानांत सांगितलं नाहीं का, तीच आहे ही म्हणून." दुसरी म्हणाली, "पण आतां गोपिकाबाईचं काय होणार ?"

सध्यां गोपिकाबाई फार आजारी आहेत; आणि पार्वतीनें केलेली शुश्रूषा त्या गोडीनें मान्य करून घेत आहेत.

## ८

# 'झुकानेवाला' नागुअण्णा

नागुअण्णा अगदीं बालबोध गृहस्थ होते. कुणाच्या अध्यांत नाहीं, मध्यांत नाहीं, कुणाला उपद्रव नाहीं, कुणाशीं भांडण नाहीं, असे आपले साधेभोळे गृहस्थ ते होते. कुणाच्या वाळल्या पाचोळयावरसुद्धां त्यांनीं कधीं पाय दिला नाहीं; कुणाच्या सुतळीच्या तोड्यालासुद्धां ते कधीं शिवले नाहींत; फार काय सांगावें, त्यांनीं पोटालासुद्धां कधीं मिळविलें नाहीं. असे भारी अश्राप गृहस्थ नागुअण्णा होते. नागुअण्णा पुढें कसे निवटतील हें ठरायच्या आधीच वडलांनीं त्यांना चतुर्भुज केलें होतें; याला नागुअण्णा तरी काय करणार? सुदैवानें 'थोरले काका" जिवंत होते. ते चांगले भक्कम पेणसलदार होते. त्यांचेंहि कोणी उरलें नव्हतें. म्हणून त्यांचें पेणसल, आणि नागुअण्णा व त्यांच्या सौभाग्यवती यांचे श्रम, असे मिळून नागुअण्णांचा संसार दमादमानें चाललेला होता.

पण एखाद्या वेळीं कुसाताई त्यांना म्हणत, "काकामामंजी आहेत तोंपर्यंत आपलं कसं ना कसं चालेल; पण त्यांचंहि आतां वय झालं आहे. आपल्याला कांहीं करायला नको का?" "खरी गोष्ट." म्हणून नागुअण्णा तेवढ्यापुरतें संभाषण संपवीत, आणि काकांची हांक आल्याचा बहाणा करून निघून जात. असें किती तरी दिवस चाललेलें होतें. शेजारणी कुसाताईंना म्हणत, "तुमचीं माणसं फार सालस बरं! डोळयांत घातलीं तरी खुपायचीं नाहींत!" "तुम्ही म्हणतां तें खरं." कुसाताई उत्तर देत, "पण नुसत्या सालसपणानं, तुम्हीच सांगा, प्रपंच कधीं चाललाय का? काकामामंजी आज आहेत अन् उद्यां नाहींत; ते पिकलं पान झालेलं. आपल्या पदरी दोन पोरं बाळं; पुढं आमचं व्हायचं कसं? पण हे आपले गप्प बसतात. अन् बाहेर पडलेच तर, ते प्राणाचार्य का कोणसेसे आहेत ना, त्यांच्या ओसरीवर जाऊन बसतात."

प्राणाचार्य वैशंपायन हे एक मोठे नामांकित वैद्यराज होते. ज्या त्या रोग्याच्या तोंडीं त्यांचें नांव ऐकूं येई. बांध्यानें ठेंगणे, ठुसके, गोरेपान, बोलायला मोठे मिठास; आणि पायापासून डोईपर्यंत, केव्हांहि बघा, आतांच स्नान केल्यासारखे स्वच्छ असायचे. सुरतहि नेहमीं खुषींत असायची. ते रोग्यावर कधीं खेंकसले नाहींत, किंवा बिलासाठीं त्यांनीं कधीं तगादा केला नाहीं. ते आपल्या जवळच्या मित्रांना एखाद्या वेळीं सांगत, "पारिजातकाचं झाड हालवावं–म्हणजे फुलें पडतात ना, तसा हा आयुर्वेद हालवला कीं रोज रुपयांचा पाऊस पडतो." प्राणाचार्य मोठे स्नानसंध्याशील, आणि त्यांच्या मुखांत नामदेव–तुकारामापासून तों मिराबाई–तुळशीदासापर्यंत सगळयांचीं शेलकीं वचनें अक्षयीं खेळत असत. कोणी कोणत्याहि जातीचा रोगी येवो, – स्त्री असो, पुरुष असो, प्राणाचार्यांच्या गोड वाणीनेंच त्याचा निम्मा रोग बरा व्हायचा. प्राणाचार्यांची सर्वांवर कृपादृष्टि. या दृष्टींतच आपले नागुअण्णाहि त्यांच्या स्नेहाचें ऊन खात बसत.

प्राणाचार्य नाडी बघत, चापचून पहात, कुपींतल्या गोळ्या देत; आणि गाईचें धारोष्ण दूध सकाळीं पावशेर पावशेर पीत जा असें रोग्यांना सांगत. "महाराज, अशक्तता भारी वाटते," असें कोणी म्हणाले म्हणजे कुरवाळणारा आवाज काढून ते म्हणत, "दुखणं आलं आहे, अशक्तता वाटायचीच. हळू हळू बरे व्हाल. असं करा, रोज सकाळीं लिंबाएवढा कोहाळेपाक खात जा." एका सकाळीं येणाऱ्या पांचपन्नास रोग्यांपैकीं निम्यांना तरी प्राणाचार्य कोहाळेपाकाची शिफारस करीत; आणि आपले नागुअण्णा कोहाळेपाकाचें नांव निघतांच मोठ्या आश्चर्यानें प्राणाचार्यांकडे व रोग्याकडे आलटून पालटून पहात. त्यांना वाटे, कोहाळेपाक म्हणजे अमृतवल्लीच असली पाहिजे. प्राणाचार्य औषधें फक्त देत; पण कोहाळेपाक रोग्यांना अर्थातच बाजारांत घ्यावा लागे. दहा वाजण्याच्या सुमाराला प्राणाचार्य शहरांतल्या आपल्या दुसऱ्या दवाखान्याकडे जात, आणि नागुअण्णा देवपूजेची वेळ झाली म्हणून घरीं जात; पण घरीं जातांना त्यांच्या डोक्यांत कोहाळेपाकाचा विषय सारखा भिरभिरत असे.

पूजेला बसले म्हणजे 'मंत्रहीनं क्रियाहीनं' अशीच तऱ्हा असायची.

त्यांना कांहीं येत नसे. खोड उगाळायचें, देव धुवायचे, वस्त्रानें पुसायचे, हा सारा प्रकार केवळ यान्त्रिक पद्धतीनें चालू राही. आणि कुसाताई चुलखंडांत गुंतलेल्या असल्या म्हणजे त्यांच्याशीं यांच्या गुलगुल गोष्टी चालत. "आज प्राणाचार्यांच्याकडे हातमोडका रोगी आला होता, काल क्षयरोगी आला होता, परवां पांथरी झालेला आला होता—" अशा हकीकती सांगतां सांगतां ते कुसाताईंना एक गोष्ट आवर्जून सांगत कीं, "प्राणाचार्य ज्याला त्याला कोहाळेपाक खायला सांगतात." नागुअण्णांच्या तोंडांत आणि कुसाताईच्या कानांत अशा रीतीनें कोहाळेपाक अगदीं भरून राहिला होता.

नागुअण्णांच्या मानानें कुसाताईच्या मनाची हालचाल जरा जास्त होत असे. 'चालला दिवस खरा' एवढाच नागुअण्णांचा हिशेब असे. पण कुसाताईंना पुढें कसे होईल ही चिंता अहर्निश खात असे. हे स्वतः कांहीं करीत नाहींत तर आपण कांहीं तरी करायला काय हरकत आहे असा विचार त्यांच्या मनांत कितीदां तरी येऊन जाई. पण जुन्या तऱ्हेच्या बायकामाणसांना स्वयंपाक करण्याशिवाय आणि दळणकांडणाशिवाय दुसरें काय करतां येणार ! त्यामुळें मनाची तयारी असूनसुद्धां कुसाताई कुचंबल्यासारख्या झाल्या होत्या. पण आतां कांहीं तरी केलेंच पाहिजे हा कुसाताईचा विचार प्रबळ बनायला आणि नागुअण्णांच्या बथ्थड मनाला जागृति आणायला एक कारण झालें. थोरले काका पिकलें पान झाले होते. त्यांची प्रकृति ढांसळलेली होती. होतां होतां एके दिवशीं त्यांनीं 'राम' म्हटलें. आणि नागुअण्णांचा प्रपंच एकदम उघडा पडला. प्रसंगानें माणसें शहाणीं होतात. नागुअण्णा आणि कुसाताई यांना शहाणें होणें आतां भागच होतें.

* * *

पहिला कोहाळा जेव्हां वड्यांचें रूप पावला तेव्हां दहा-पांच वड्या डब्यांत घेऊन नागुअण्णा प्राणाचार्यांच्या घरीं गेले. आपण कांहीं तरी विशेष केलें आहे, अशा जाणीवेनें त्यांनीं झांकण उघडून तो डबा त्यांच्यापुढें ठेवला. "आपण रोज म्हणतां 'कोहाळेपाक, कोहाळेपाक;' तेव्हां

म्हटलं, आपल्याला साधतो का पहावं. " " वाहवा ! वाहवा ! " असें प्रोत्साहन देत प्राणाचार्यांनीं वडीचा तुकडा तोंडांत टाकला; आणि नागुअण्णांना शाबासकी देत ते म्हणाले, " फार छान ! फार छान ! असं आतां कांहीं तरी करायलाच हवं. अहो काका आतां आटोपले ! " " तेंच कीं ! तेंच कीं—" असें म्हणून नागुअण्णा गप्प बसले. पण प्राणाचार्यांनीं त्यांचें मनोगत ओळखलें. ते म्हणाले, " रोग्यांना आतां आम्ही तुमच्याच वड्यांची शिफारस करूं. सांगितलं म्हणून रोगी कुठला तरी पाक घेऊन खातात. आतां तुम्हीं बनवलेला हा स्वच्छ अस्सल पाक खा म्हणून सांगायला मला बरंच वाटेल. " डोळे कांहींसे किलकिले आणि ओले करून नागुअण्णांनीं आपली कृतज्ञता व्यक्त केली; आणि उरलेल्या पाकाच्या वड्या त्यांनीं घरांत नेऊन दिल्या. प्राणाचार्यांची शिफारस आणि कुसाताईंचें कसब यावर या नवरा-बायकोच्या हातांत पैसा बरा खुळखुळूं लागला, आणि दुपारच्या वेळीं पांच पांच तास श्रम करण्याची हौस कुसाताईच्या ठिकाणीं उत्पन्न झाली.

जेवायला घालून तीन पोरें शाळेंत पिटाळून दिलीं, पारठ्याला खेळायला दोन भिंगऱ्या दिल्या, आणि तान्हें पाळण्यांत दामटलें म्हणजे मग कुसाताईच्या कामाचा झपाटा कांहीं विचारूं नका. मुलें शाळेतून परत येईपर्यंत त्या अगदीं घामाघूम व्हायच्या. पण या घामांतून पैसा निघतो हें दिसत असल्यामुळें हे श्रम त्या मोठ्या खुशीनें करीत. कल्हई केलेलीं पाकाचीं पातेलीं कुसाताई भराभर उचलीत, आणि शेजारीं त्यांच्या हाताखालीं नागुअण्णा अडलीचें काम करीत. ' हें करा ', ' तें करा ' असें नवऱ्याला कसें सांगावें याचेंसुद्धां भान कुसाताईंना रहात नसे. कारण कांहीं तरी काम चालू होतें; आणि त्यांतून पैसा निघूं लागला होता. अर्थात् निष्क्रियतेंतल्या चालीरीति बाजूला पडून उपयोग कुणाचा जास्त याचा निकाल लागत होता. आणि याच्या जाणीवेनें कुसाताई कांहींशा अमलदारी आवाजानें – निदान कामांत असतांना तरी – नागुअण्णांशीं बोलत असत. बापडे नागुअण्णा धोतर वर खोचून बायकोचे सुटत असलेले हुकूम अंमलांत आणण्यासाठीं सारखी नाचानाच करीत असत. आणि अशा रीतीनें कोहाळेपाकाचा रोजचा लगदा तयार होऊन परातींत पडत असे.

थोरल्या काकांची अडगळ आतां नाहींशी झाली होती. मागली माडी रिकामी झाली होती. कोणीं जाऊन पाहिलें असतें तर शिंक्यावर ठेवलेले लहानमोठे कोहाळे त्यांना तेथें दिसले असते. हे भस्म लावलेले गोसावी शिंक्यावर खुशाल बसून रहात; पण त्यांतला प्रत्येकजण चारदोन दिवसांत कुसाताईच्या स्थंडिलावर बळी जात असे. मधून मधून दुपारच्या वेळीं नागुअण्णा मंडईत जात, आणि कोहाळ्यांची झोळी खांद्याला अडकवून परत येत. हे कोहाळे कापणें, त्यांचीं सालें काढणें, आणि ते चिरणें – एवढीं कामें नागुअण्णांचीं, आणि तेथून पुढचा अकलेचा भाग कुसाताईचा; असा हा नवराबायकोचा श्रमविभाग असे.

परातींत लगदा ओतला म्हणजे तो निवला आहे असें पाहून वड्या थापण्याचें मनोरंजक काम नागुअण्णा केव्हां तरी करायला पहात. माणसांच्या मनांत बारिक बारिक मत्सर फार वावरत असतात; अगदीं जवळच्या नात्यांत-सुद्धां ते दिसून येतात. त्यांतल्या त्यांत चांगलें काम आपल्याकडे यावें असें सर्वच माणसांना वाटतें. आपण लहान मुलें म्हणजे फार निरागस असें समजतों; पण तें खरें नाहीं. इतक्या लहानपणींसुद्धां त्यांतल्या त्यांत चांगलें काम आपण करावें, आणि बाकीचीं नीरस कामें धाकट्या भावंडांना द्यावीं, एवढें कृत्रिम मुलांच्यांतसुद्धां नेहमीं दिसून येतें. एकाच परडींत तोडून आणलेलीं नाना प्रकारचीं फुलें निरनिराळीं काढायचीं असलीं तर थोरला भाऊ धाकट्यांना चमकावून सांगतो, "बाबू, तूं जाईचीं फुलें बाजूला काढ; यमे, तूं हीं कर्दळीचीं काढ;" आणि आपण मात्र गुलाबाचीं फुलें निवडण्याचें काम हातीं ठेवतो. यांतून लहान मुलांचीं अनेक भांडणें होतात. भुईवरचें धान्य गोळा करून तें जर मापानें भांड्यांत भरायचें असेल तर गोळा करण्याचें नीरस काम धाकट्या भावाकडे सोंपवून मापानें भांड्यांत भरण्याचें त्यांतल्या त्यांत 'शौर्या'चें काम मोठा भाऊ आपल्याकडे ठेवतो. ही सूक्ष्म मत्सराची वृत्ति वयानें मोठें झालेल्या माणसांच्यांतसुद्धां वावरतांना दिसून येते. थापलेल्या लगद्याच्या वड्या पाडण्याइतपत अक्कल नागुअण्णांना खाचित होती; पण करीत आणलेल्या कामाचा शेलका हप्ता नवऱ्याच्या हातीं जाऊं द्यायला

कुसाताई मनानें तयार नसत. त्या खसकन् त्यांना म्हणत, "थांबा होऽ तुम्हांला नाहीं तें जमायचं." विदुळलें तोंड करून नागुअण्णा बाजूला सरकत. कर्तेपणाचा महिमा असाच असतो.

प्राणाचार्यांच्या बैठकीवर नागुअण्णा आतां थोड्या प्रतिष्ठेनें बसूं लागले. आपण कोणी तरी कर्तबगार गृहस्थ आहों, आणि प्राणाचार्यांच्या वैद्यक्रियेचा एक अवयव आहों, अशा फुशारकीनें ते रोग्यांच्याकडे पाहूं लागले. कोहाळेपाकाची शिफारस दुखणाइतांना करतांना प्राणाचार्य नागुअण्णांच्याकडे हात करीत. अर्थातच त्यांची ही मनांतली फुशारकी अधिकच गाढ बने; आणि रोग्यांनीं चौकशी केली म्हणजे पाकाच्या वड्यांचा पत्ता वगैरें कोणता हें सांगतांनाहि, कांहीं तरी संपादित असलेल्या माणसाची संतोषाची वृत्ति त्यांच्या चेहऱ्यावर उमटलेली दिसे. नागुअण्णांनीं आतां आपल्या दारावरच पाटी लावली, आणि त्यांतल्या त्यांत मोठ्या मुलांनासुद्धां पुडे बांधणें, डबे भरणें अशा कामांत ते राबवूं लागले. एकंदरीनें थोरले काका गेले तरी आतां आपला जम चांगला बसेल, अशा समजुतीनें अण्णा व ताई दोघेंहि खुषींत होतीं. हातांत रोज रोकड येत होती, आणि कोहाळ्यासाठीं बाजारांत जातांना हातांत रोकड असल्यामुळें काची लोकांतहि नागुअण्णांना थोडीशी प्रतिष्ठा मिळाली होती.

पण कुसाताई व नागुअण्णा हे खुषींत असले तरी, आपल्याला पुरतें मिळत नाहीं असें त्यांना हळूहळू वाटूं लागलें. इतकी आदळआपट करावी, पोरेंबाळेंसुद्धां कामाला लावावीं, आणि प्रपंचाचें कसेंबसें भागवतां यावें, ही व्यापाराची पद्धति दोषास्पद आहे असें त्यांना वाटूं लागलें. पेठेंतले व्यापारी लोक इतर अनेक जिनसांबरोबर कोहाळेपाकहि विकीत; त्यामुळें यांतलें नुकसान त्यांत, त्यांतलें नुकसान यांत, असें केल्यानें त्यांचे धंदे किफायतशीर होतात. पण नागुअण्णा एकच पदार्थ विकीत असल्यानें व्हावी तेवढी किफायत होत नाहीं असें त्यांना दिसूं लागलें. एकदां पहांटेच्या वेळीं, मनांत तोच विषय घोळत असल्यामुळें कुसाताई त्यांना म्हणाल्या, "कोहाळ्याला इतके, साखरेला इतके, बाकीच्या मालमसाल्याला इतके, सर्पणाला इतके, मग आपल्याला काय रहातें तें पहा." नागुअण्णांच्या तोंडाची चव उठल्यापासून बिघडली; आणि आपल्या व

बायकोच्या मेहनतींतून पुरेसें कांहीं निघत नाहीं, याची विवंचना त्यांच्या बथ्थड मनालासुद्धां लागून राहिली.

मंडईच्या पाठीमागें बांधलेल्या कट्टयाच्या अगदीं टोकाला बसलेल्या कांहीं भाजीवाल्यांच्या आळींतून नागुअण्णा आतां फिरतांना दिसूं लागले; आणि काची लोकांकडील त्यांचा राबता थोडा थोडा कमी होऊं लागला. अज्ञानी आणि मूर्ख माणसांविषयीं आपल्या कल्पना अगदीं चुकीच्या असतात. आपल्याला वाटतें कीं, इतर गोष्टी जशा त्यांना कळत नाहींत तसा स्वार्थहि त्यांना कळत नसेल. पण निरनिराळ्या मूर्खांची वर्तणूक तपासून पाहिली तर दिसून येईल कीं, त्यांच्या मनाचा व्याप जरी अगदीं थोडा असला, तरी स्वार्थाची जपणूक त्यांना खचित समजते. बाकी सर्व ठिकाणीं भोंगळपणा, पण स्वार्थाची बाब आली कीं छक्केपंजे करून वागावें हें अगदीं गैदी माणसांनासुद्धां कळतें. स्वसंरक्षणाचा हा शेवटचा इलाज सृष्टिकर्त्यानें त्यांच्या ठिकाणीं ठेवलेला असावा. संध्याकाळच्या वेळीं मंडईच्या या परिघावरून कसलें तरी मोटकुळें पाठीशीं घेऊन दिवेलागणीनंतर नागुअण्णा आतां घरीं येऊं लागले. मोटकुळें खुंटीला अडकवावें, आणि जेवणें खाणें आटपून पोरांची निजानीज झाली म्हणजे तें मोटकुळें खालीं काढावें, आणि आंतील चिजा बाहेर काढून कापायला सुरुवात करावी, असा प्रघात त्यांनीं पाडला. आतांपर्यंत दुपारच्या वेळीं होत असलेलीं कामें आतां रात्रीं होऊं लागलीं; आणि पाक ओतून ठेवलेल्या परातीच्या वड्या पाडण्याचें काम तेवढें मुलांच्यादेखत सकाळीं होऊं लागलें. कोहाळेपाक नागुअण्णांच्या घरून घ्यायचा हें गिऱ्हाइकांना माहीत झालेलें होतें; आणि प्राणाचार्यांची शिफारसहि तशीच असे.

आतां मात्र नागुअण्णा चांगले सावरले. कोहाळेपाक करणें आतां स्वस्तांत पडूं लागलें. अण्णांना फक्त एक किमया सुचायला हवी होती; ती त्यांच्या मैंद मनाला वेळेलाच सुचली; आणि जेव्हां त्यांनीं ती कुसाताईना सांगितली तेव्हां त्यांच्या स्त्रीमनाला जरी थोडासा अचका बसला, तरी थोडीशी गफलत केल्याबरोबर करामतीचें बिंग बाहेर न फुटतां पैसा मात्र जास्त सुटतो हें पाहून त्यांनीं आपल्या लुडबुडणाऱ्या मनाच्या थोबाडींत दिली; आणि मग तें त्यांना हवा तसा सल्ला देऊं लागलें. दगलबाजींत दोघांचें एकमत

होऊं लागलें; आणि मग नागुअण्णांच्या घरांत जिकडे तिकडे स्वास्थ्य आणि समृद्धि हीं दिसूं लागलीं. लबाडीसुद्धां विषासारखी पचनीं पडावी लागते. बारक्या बारक्या नागिणीचें विष जिभेला टोंचून घेण्याची संवय कोणी कोणी करतात. त्या दंशानें त्यांना सुंदर नशा प्राप्त होते असा प्रवाद आहे. तो खरा असो – खोटा असो, पण लबाडीच्या दंशाची नशा प्रापंचिक समृद्धीच्या दृष्टीनें प्राप्त झाली म्हणजे मग सदसद्विवेकबुद्धीचा चोळामोळा सहज होऊं शकतो. नागुअण्णा आणि कुसाताई यांनीं ही गोळी एकदां गिळून टाकून ढेकर दिली, आणि मग त्यांच्या मनाला गूढांतला कसलाहि ताप होईनासा झाला.

नागुअण्णा आपल्याकडे येईनासे झालेले पाहून काची लोक त्यांना एखाद्या वेळीं भेटत, आणि " काय अन्ना ! माया लई पाताळ केली ? " असें म्हणून उत्तराची वाट पहात. पण नागुअण्णा फार गडबडींत असल्या-मुळें हैं हैं करून रामराम केल्याचा देखावा करीत आणि पुढें सटकून जात. असें दोन तीनदां झाल्यावर काची लोक पुन्हां बोलेनासे झाले. या दुसऱ्या नैतिक शत्रूंना नामोहरम केल्यानंतर नागुअण्णांना म्युनिसिपालिटीच्या झाडूवालीचीसुद्धां समजूत करून ठेवावी लागली. दुध्यांचीं इतकीं थोरलीं सालें कोठें टाकावयाचीं, आणि तीं निघतात हें कोणाला कसें दिसूं द्यायचें नाहीं – हा कपटविद्येंतला आणखी यक्षप्रश्न त्यांच्यापुढें उभा होता. पण लबाडीच्या अंगीं प्रतिभासुद्धां असते; आणि भल्या प्रतिभेलासुद्धां लबाडीची बटीक म्हणून राबावें लागतें. नागुअण्णांनीं झाडुवालीला विश्वासांत घेतलें, आणि रोज चार पैशांचा तनखा चालू करून दुध्यांचीं सालें आणि त्यांच्या गाभ्यांतला बियांचा मगज बिनबोभाट भरून नेण्याची तरतूद त्यांनीं करून टाकली. अशा प्रकारें सगळी कुलुप-बंदी करून कूष्मांडपाकाचा बडा कारखानाच नागुअण्णांनीं चालू ठेवला.

आतां प्राणाचार्यांच्या बैठकीवर बसून एखाद्या वेळीं ते त्या वैद्यराजांना-सुद्धां सकाळच्या प्रहरीं 'मौज म्हणून' पाकाच्या वड्या देऊं लागले; आणि तो भोळा वैद्यराज 'वाहवा ! वाहवा !' म्हणून हा दुध्याचा रस्सा कूष्मांडपाक म्हणून गिळूं लागला. आणि त्यांचें गिऱ्हाईकहि म्हणूं लागलें कीं, पाकानें खरोखरच शक्ति वाढूं लागली आहे. मानवी रसनेच्या

बोजड रुचीचा हा प्रत्यय आल्यानंतर नागुअण्णांचा व्यापार बिनधोक चालूं लागला; आणि त्यांनीं वड्यांचा दरहि थोडाबहुत कमी केला.

*　　　　*　　　　*

नागुअण्णा आणि कुसाताई आतां सुखानें संसार करीत आहेत; त्यांच्या मुलांच्या अंगावर चांगले कपडे दिसूं लागले आहेत. आणि नागुअण्णांनीं जरी आपलें नेहमींचें भोळें ध्यान कायम ठेवलें असलें तरी कुसाताई प्रसंगविशेषीं झकपक पातळ नेसून संध्याकाळच्या वेळीं बागांतून मिरवायला जाऊं लागल्या आहेत. लोक म्हणूं लागले आहेत कीं, "आपल्या लोकांना धंदा साधत नाहीं असें आपण म्हणतों, पण नागुअण्णांचं उदाहरण पहा. सचोटीनें धंदा करूनसुद्धां हा मनुष्य एके दिवशीं घरावर सोन्याचीं कौलें घालील!"

# १

# वेडया प्रेयसी !

जीन पॉल या जर्मन लेखकाच्या चरित्राचें अद्‌भुतरम्य पर्व अठराव्या शतकाच्या शेवटीं सुरू झालें. त्या वेळीं त्याची बत्तीशी पार पडलेली होती. पण याच वेळीं त्याच्या जीविताच्या भोंवतीं एक मोठी प्रेमगुंफा तयार झाली. तोंपर्यंत त्याचें सारें जिणें हालाविपत्तींतच गेलें होतें. त्याच्या लेखणीची कुरकुर सारखी चालू होतीच. परंतु लेखनावर त्याला एक छदामाची-सुद्धां प्राप्ति होत नसे. केवळ हौस म्हणून तो लिहीत राहिला होता. उद्यां खावें काय, हा प्रश्न त्याच्यापुढें नेहमीं दत्त म्हणून उभा असे. त्याच्या लिहिण्याकडेहि तेव्हांपर्यंत कोणाचें लक्ष फारसें गेलें नाहीं. पण याच सुमारास तीन ग्रंथ त्यानें लिहिले; आणि समाजांतील श्रेष्ठ लोकांचें लक्ष या ग्रंथांनीं एकदम वेधून घेतलें. त्याच्या लेखनावर खूष झालेल्या लोकांत स्त्रियांचा भरणा फार होता.

एकदां असें झालें कीं, आपल्या विधवा गरीब आईशीं तो उद्वेगानें बोलत बसला असतांना टपालाच्या शिपायानें पडवींत एक पाकीट आणून टाकलें. आतांपर्यंत त्याला अशीं अनेक पत्रें आलीं होतीं. पण त्याला कोणीं शाबासकीहि दिलेली नव्हती, किंवा पत्रांत कोणीं पांच रुपयांची नोटहि घातलेली नव्हती. नेहमींच निराश असलेल्या मनानें त्यानें तें पत्र फोडलें, आणि पाहतो तों त्याच्याखालीं चार्लोटी कॉब्र अशी सही दिसली. ती पाहतांच त्याचे डोळेच फाटून गेले. कारण कॉब्र बाई म्हणजे कांहीं सामान्य आसामी नव्हती. ती एका मोठ्या सरदाराची बायको असून जर्मनीच्या खानदानीच्या लोकांत तिची मोठी प्रतिष्ठा असे. पत्रांतील मजकूर वाचून तर हा बुभुक्षित आणि आत्तांपर्यंत खुरटून राहिलेला कफल्लक लेखक आनंदानें खरोखर उड्याच मारूं लागला !

बाईनें पत्रांत लिहिलें होतें, तुमचीं नवीं पुस्तकें आम्ही नुकतींच

वाचलीं. वाचकांना तीं फारच आवडलीं आहेत. माझी तर तीं वाचून मोठीच करमणूक झाली. कांहीं प्रहर अत्यंत आनंदांत गेले. म्हणून मी तुमची फार आभारी आहें. आपल्या कांहीं मित्रांनीं आमच्यापाशीं आपली फार स्तुति केली; आणि म्हणून आपल्याला पत्र लिहिण्याची बुद्धि मला झाली. माझ्या एकटीच्याच आदरबुद्धीचें हें सुमन मी आपल्याकडे धाडत नाहीं, तर दुसऱ्याहि कांहीं थोर रसिकांच्या स्तुतिसुमनांचा हार या पत्ररूपानें मी आपल्याकडे धाडत आहें.

या सरदारीणबाईंचें राहण्याचें ठिकाण विमार नांवाच्या गांवीं होतें. बाईंची राहाणी मोठी दिमाखदार असून, गटे, शिलर, विलॅन्ड, आणि हर्डर अशांसारख्या पंडितांच्या ग्रंथांचें वाचन त्यांच्या दिवाणखान्यांत होत असे. ॲमलिया नांवाच्या एका मोठ्या थोरल्या उमरावाच्या दरबारांत बाईंचा मानकरीपणाचा हक्क होता. बाई जीन पॉलपेक्षां वयानें थोड्या मोठ्या असून आतांपर्यंत त्या दोन मुलांच्या आईहि झाल्या होत्या. दुर्दैवानें हीं दोन्ही मुलें मरून गेल्यामुळें त्या मनानें थोड्या कष्टीच होत्या. आणखी एक बारकेंसें वैगुण्य त्यांच्या वैवाहिक जीवनाला सारखें कुरतडत असे. बाईंचें आणि नवऱ्याचें फारसें रहस्य नसे; अर्थातच मनाला विरंगुळा म्हणून, आणि आत्म्याला संतोष म्हणून त्यांची दृष्टि आजूबाजूला वळत असे. आणि त्यांतहि ललित वाङ्मयाचे लेखक म्हणजे कोणी देवदूत असले पाहिजेत असें त्यांचें मत झालें होतें. जीन पॉल याचें हें नवें वाङ्मय वाचल्याबरोबर बाईंच्या मनाला भारीच भुरळ पडली; आणि ग्रंथ-कर्त्याला आपल्या आनंदातिशयाचें वर्तमान कळविल्याशिवाय त्यांना चैन पडेनासें झालें होतें. अर्थात् पत्रांतील भाषा फुलोऱ्यानें कशी मादक झाली असेल हें सहज कळण्यासारखें आहे. त्याचें तें पत्र वाचून हयगय, दारिद्र्य आणि असंतोष यांनीं पीडलेल्या जीन पॉलच्या मनाला वसंताच्या शीतल झुळुकेचें सुख उत्पन्न झालें. ।

पॉलनें कॉब बाईंना पत्र लिहिलें कीं, "आपण माझा मोठाच गौरव केलेला आहे. मी लवकरच केव्हां तरी आपल्याला येऊन भेटतों." पॉलच्या मनाची पहिली ऊर्मि ही होती कीं, एकदम जावें आणि या रसिकेश्वरीला भेटावें. पण त्याचा तो आवेश हळूहळू ओसरूं लागला. त्या श्रीमंत बाईंकडे

जाण्याचें त्याला भय वाटूं लागलें. आपण अन्नाला महाग झालेले, आपली कोणी वास्तपुस्तहि करीत नाहीं, अशा स्थितींत, एखाद्या बाईनें पत्र लिहिलें म्हणून आपण तिला भेटावयास गेलों तर लोक आपल्याला मूर्खांत काढतील, असें त्याला वाटूं लागलें.

पण महिना–पंधरा दिवस गेले; आणि बाईच्याकडून दुसरें पत्र आलें. त्यांनीं आग्रहानें लिहिलें होतें कीं, "तुम्ही येतों म्हणून म्हणालांत, पण अजूनहि आलां नाहींत. वसंतऋतूचे दिवस बहुतेक संपत आले आहेत; आणि तुम्ही मात्र आलेले नाहीं. तुमच्या लेखनानें आमच्या मनांत गौरव-बुद्धि, आदर आणि आशा उत्पन्न होत आहे. जे तुम्हांला नांवाजतात तेच आमचे खरे मित्र बनतात; आणि आमच्या गांठी पडल्या म्हणजे ते विचारतात, जीन पॉल अजूनहि आले नाहींत काय ?"

हें पत्र वाचतांच त्याची सारी भीति मावळली, आणि विमार गांवाला जाण्याचें त्यानें एकदम ठरवलें. सामानाचें तोस्तान त्यानें गळ्याला अडक-वलें, हातांत एक उंच सोटा घेतला, आणि हा भाबडा ललितवाङ्मयसेवक विमार गांवाच्या यात्रेला निघाला. वाटेनें जातांना तो मनांत म्हणे कीं, "ही कॉब बाई असेल तरी कशी ? या श्रीमंतिणीच्या पुढें गेल्यावर आपल्याला गांगरल्यासारखें तर होणार नाहीं ना ?......छे, छे; असें कसें होईल ! आपल्या स्वागतासाठीं ती दिवाणखान्याच्या दारांतच उभी राहिलेली असेल. आपलें अभिवादन करून, हाताला धरून ती आपल्याला कोचावर बसवील; आणि मग ती व तिच्या मैत्रिणी यांनीं सुरू केलेल्या स्तुतीचा भीजपाऊस आपल्यावर सारखा पडत राहील." आणि झालेंहि तसेंच !

विमारला पोहोंचतांच इकडे तिकडे कोठें न थांबतां तो तडक बाईच्या बंगल्यावर गेला. आणि त्यांना पाहतांच तो मनांत अगदीं सर्द होऊन गेला. बाईंची चेहरेपट्टी मोठी रुबाबदार दिसली. त्यांचे डोळे काळेभोर आणि कटाक्ष मोठे रोखाचे वाटले. बाई बोलूं लागल्या तों सौंदर्य आणि तेज यांचा वाङ्मयीन प्रसार होत आहे असें त्याला वाटलें. बाईच्या भावना फार उदात्त असून त्यांच्या मनाचे आवेग मोठे जोरकस

आहेत, इतकेंच नव्हे तर मित्रांच्या परिवारांत बसली असतांना ही बाई एखाद्या सम्राज्ञीप्रमाणें आपला अंमल सर्वांवर चालवील असें मनांत येऊन जीन पॉल तिच्याकडे पाहूं लागला.

बाईच्या मनावरहि पॉलच्या व्यक्तिमत्त्वाची अशीच चमत्कारिक छाप बसली. तिनें आपल्या मनांत पॉलचें कांहींएक चित्र रंगविलें होतें; पण त्याला प्रत्यक्ष पाहतांच, आपण रंगविलेलें चित्र अगदींच फिकें आहे असें तिला वाटूं लागलें. एखाद्या ललित लेखकाच्या ठिकाणीं जें सौंदर्य आणि जी रमणीयता असावयास हवी अशी आपली अपेक्षा असते, त्याहिपेक्षां या पुरुषाच्या ठिकाणीं सौंदर्य आणि रमणीयता जास्त आहे, असा तेथल्या सर्वांचाच अभिप्राय झाला. तेथें जमलेल्या सर्वच लोकांनीं त्याचीं पुस्तकें वाचलीं होतीं; आणि म्हणून ज्याला त्याला असें वाटूं लागलें कीं, याची आणि आपली ओळख व्हावी, यानें आपल्याशीं दोन शब्द बोलावे.

त्याचा गळा उघडा पडलेला होता; आणि डोक्यावरचे कुरळे केस त्याच्या मानेवर रुळत आले होते. तो बळकट आणि बांधेसूद दिसला तरी एकंदरीनें तो सडपातळच होता. आणि त्याच्या त्वचेचा रंग कांहींसा फिकट पिवळा होता. पण त्याचें खरें वैभव त्याच्या डोळ्यांतून चमकत होतें. एखाद्या निराळ्याच आणि उच्चतर सृष्टींत वावरणारा त्याचा आत्मा त्याच्या डोळ्यांच्या बिलोरी भिंगांतून टकमक पहात आहे, आणि प्रत्येक ऊर्मीचें नवें तेज क्षणाक्षणाला त्याच्या नेत्रांतून फांकत आहे असेंच सर्वांना वाटूं लागलें. जसें लेखन, तसें त्याचें संभाषणहि नव्या विचारांनीं भरलेलें होतें. थोड्या थोड्या अंतरानें, अपरिचित पण सुखप्रद वाटणाऱ्या लहान लहान विचारांची आणि भावनांची फेक त्याच्या भाषणांतून सारखी होत होती. त्याची वाणी कानाला मोठी मधुर लागत होती; आणि त्याच्या आवाजाचे रोहावरोह भाषणांत मार्दव उत्पन्न करीत होते. त्याच्याच जोडीला त्याच्या मनाचा प्रांजलपणा, त्याच्या वृत्तीची संचोटी, भूतदयेवर त्याची असलेली दृढ श्रद्धा – हीं सारीं पाहून समोर बसलेल्या लोकांना वाटूं लागलें कीं, प्रातःकाळच्या सूर्याचे कोवळे किरणच आपल्या अंगावर पडत आहेत.

विमार गांवीं जीन पॉलचा मुक्काम बरेंच दिवस झाला. बाईच्या दिवाणखान्यांत रोज बैठकी होत. संध्याकाळच्या जेवणासाठीं तीं दोघेंहि तेव्हांचा सुविख्यात लेखक जो हर्डर त्याच्या घरीं जात असत. या हर्डरची बायकोहि मोठी प्रेमळ असून, तिचें मन उदार विचारांनीं समृद्ध बनलें होतें. अशा स्त्रियांच्याकडे पाहिलें म्हणजे पॉलला वाटे कीं, यांच्या कटाक्षाच्या उन्हानें आपल्या बुद्धीच्या द्राक्षांचे घड खास पिकूं लागतील; आणि आपल्या कल्पनावेलीच्या फुलांना नाना प्रकारचे सुंदर रंग प्राप्त होतील. आपण जन्माला आलों, आणि अशा स्त्रियांच्या गांठी पडल्या तर जन्माचें सार्थक झालें, असें त्याला वाटूं लागलें.

ग्रंथकर्ता हर्डर तर जीन पॉलच्या संगतींत अगदीं बेहोष होऊन गेला. तो म्हणाला, " या पॉलच्या रूपानें परमेश्वरानें माझ्यावर मोठा अनुग्रहच केला आहे. हें भाग्य मला कधीं लाभेल असें वाटलें नव्हतें; आणि या भाग्याला मी पात्रहि नाहीं. जेव्हां जेव्हां त्याची गांठ पडते, तेव्हां तेव्हां असें वाटतें कीं, तान्ह्या जिझसचा शोध करीत आलेले प्राची दिशेकडील ते तीन ज्ञानी मागी डोईवरील तान्याच्या अनुरोधानें चालत चालत आपल्या घरीं आले आहेत. खरोखर हा जीन पॉल म्हणजे मूर्तिमंत हृत्कोशच आमच्यापुढें उभा असतो; प्रत्यक्ष आत्माच सगुण बनून पुढें आला आहे; मानव्याची सोनेरी वीणा वाजत असून तिची ललकारी आपल्या कानावर पडत आहे असें वाटतें." अशा स्त्री–पुरुषांच्या संगतींत पॉलचे दिवस चालले होते.

हळूहळू त्याच्या ध्यानांत येऊन चुकलें कीं, आपल्याला वाटलें होतें त्याहिपेक्षां कॉब्र बाईची प्रतिष्ठा मोठी आहे; जर्मनींतील सर्व मोठमोठ्या लोकांशीं तिचा पत्रव्यवहार चालू असतो; आणि विमार शहरांत तर तिच्याकडे आला नाहीं असा कोणीहि बडा मनुष्य नाहीं. बाईच्या दिवाणखान्यांत प्रतिष्ठित लेखकांच्या व त्याच्या गांठी पडत; संभाषणानें त्यांतल्या कांहींची खरी किंमत त्याला कळून आली; आणि कांहीं आपण समजत होतों तसे थोर नसून त्यांची लकाकी बेगडी आहे, हें त्याच्या ध्यानांत येऊन चुकलें.

येथपर्यंत सारें ठीक झालें. पण या प्रसन्न वातावरणांत एक बोटचेपी जागा होती, तिचा त्याला विस्मय वाटूं लागला.

कॉब्र बाईची व त्याची मैत्री जवळची होऊं लागली. बाई त्याच्यापेक्षां थोडीशी मोठी होती, आणि त्यामुळें आपल्याहून लहान असलेल्या व कल्पनेच्या उद्यानांत गुंजारव करीत फिरणाऱ्या माणसाच्या मनावर छाप कशी बसवावी याचें कसब बाईला चागलें साधलेलें होतें. बाईचें लग्न झालें होतें, पण त्या विलग्न स्थितींतच रहात होत्या. नवराबायको एकत्र राहिलेलें सहसा कोणाच्या दृष्टीसहि पडलें नाहीं.

खरें म्हटलें म्हणजे कॉब्र बाईचे नवरोजी अगदीं सुमारच होते ! आणि पॅरिस शहरांतल्याप्रमाणें जर्मनींतहि स्त्रीपुरुषांच्या योग्यतेची चर्चा जिकडे तिकडे सुरू असल्यामुळें, आपल्या पदराची गांठ कोणाच्या तरी पदराशीं पडली आहे अशी जाणीव बाईला उत्पन्न झालेली होती. अर्थात् पॉलसारख्या रूपसुंदर आणि प्रतिभाशाली माणसाच्या संगतींत बाईच्या मनांत कसली चलबिचल चालू झाली असेल हें सहज कळण्यासारखें आहे. जीन पॉल मात्र अगदीं सावध होता. तो केवळ कलावंत होता. आपल्या लेखनाला या बाईचा उपयोग कशा तऱ्हेनें करून घेतां येईल, याकडेच त्याचें सारें लक्ष असे. अशी देखणी, रुबाबदार, आणि आक्रमक स्वभावाची बाई आपल्या ललित लेखनांत कोठें तरी पात्र म्हणून अवतरलीच पाहिजे असें त्यानें आपल्या मनाशीं ठरवलें. अशा प्रकारें कॉब्र आणि पॉल यांच्या मनाचे व्यापार अगदीं निरनिराळ्या स्वरूपांनीं चालू होते.

थोड्याशा दिवसांनीं पॉल आपल्या घरीं परत आला. आई चरखा फिरवीत बसली होती. त्याचा आवाज लांबून ऐकून कॉब्रच्या संगतींत उन्मादानें भारावलेलें त्याचें मन मूळच्या मुक्कामावर आलें. परत येऊन पोहोंचतो तों पाठोपाठ कॉब्र बाईचें पत्र येऊन थडकलें. बाईंना उर्मिला हें नांव शोभलें असतें. कारण त्यांच्या मनाला सौहार्द, प्रेम याच्या ऊर्मि सारख्या उठत असत. पत्रांत या ऊर्मि चक्क दिसून आल्या. पॉलनेंहि उलट टपालीं कळविलें कीं, मी तुम्हांला विसरेन तरी कसा ! तुमच्यावांचून मला चैन पडेनासें झालें आहे. जों जों कॉब्र बाईचें स्मरण व्हावें, आणि त्याच्या होऊन गेलेल्या सहवासावर मनानें गुंजारव करावा तों तों त्याला वाटूं लागे

कीं, कॉब्रबाईसंबंधानें आपल्या मनांत प्रेमाचा अंकुर उगवत असावा. किती तरी प्रतिभाशाली माणसांना श्रीमंत आणि सुस्वरूप स्त्रियांनीं मोहानें वेडें करून सोडलें आहे हें पॉलला माहीत होतें. म्हणून त्यानें स्वतःला जोरानें चिमटा घेतला. विमार गांवीं पुन्हां एकदां जावें असें त्याला कितीदां तरी वाटलें. पण हा मोह त्यानें आवरला.

तथापि बाईचें पत्राचें सोरट चालूच होतें ! त्यांनीं लिहिलें, "तुम्ही आमच्या गांवींच रहायला कां येत नाहीं ? हर्डर, निलॅन्ड, नेवेल यांच्या-सारख्या मोठमोठाल्या लोकांची संगति तुम्हांला येथें लाभेल;—अर्थात् मीं आपली त्यांत आहेच. येऊन जाऊन तुम्हांला स्वतंत्र जागा हवी; ती आम्ही तुम्हांला कोठेंहि देऊं. आणि पैशांचीच अडचण असली तर, तुमचे येथले मित्र वाटेल तितका पैसा तुमच्या दाराशीं आणून ओततील. जीन पॉलनें उत्तरांत तिचे आभार मानले, पण तिला स्वच्छ कळाविलें कीं मला हे तुमचे उपकार नकोत.

यावर त्यांचें नातें थोडें दूरावल्यासारखें झालें. तीन वर्षें गेलीं; आणि त्यांची गांठभेटहि झाली नाहीं. नंतर पॉलनें 'काल्पनिक चरित्र' या नांवांचें आपलें एक पुस्तक तिला भेट म्हणून पाठवून दिलें. तें वाचून तर बाई केवळ बेभानच होऊन गेली. तिनें लिहिलें कीं, "तुमचें पुस्तक वाचून मला अपूर्व आनंद झाला; आणि माझ्या मनाला मोठ्या गमतीदार वेदना झाल्या. तुम्ही माझ्याकडे या; खाचित माझ्याकडेच या, आणि माझ्यापाशींच कायमचे रहा. आपण एकत्र बसूं, बोलूं,–आणि म्हातारीं होईपर्यंत एकमेकांच्या संगतींत काळ घालवूं. आपण कोंवळ्या गवतावर बसूं. झाडाच्या ढोलींना रेलून पडूं."

याच थाटानें पुष्कळ गोडगोड शब्द बाईनीं लिहिले होते. पॉलच्या ध्यानांत येऊन चुकलें कीं, बाईचा तोल अगदीं सुटलेला आहे. तो एकदम जास्त सावध झाला; आणि त्यानें पत्रांना उत्तर पाठविण्याचेंच बंद केलें. पण बाईच्या पत्रांचा धडाका कांहीं केल्या थांबेना. त्यांचीं आमंत्रणांवर आमंत्रणें येऊं लागलीं. शेवटीं पॉल कंटाळून विमारला पुन्हां एकदां गेला. पण तेथें जाऊन पाहतो तों एक चमत्कारिकच प्रकार त्याच्या दृष्टीस पडला. कॉब

बाईनीं आपल्या नवऱ्याला आणि घरांतील इतर मंडळीला तेथें बोलावून घेतलें होतें. त्यांच्या मनांत काडीमोड करावयाची होती; आणि नात्याच्या या माणसांनीं या गोष्टीला संमति देणें अवश्य होतें. बाईच्या मनांत जीन पॉलशीं लग्न करावयाचें होतें.

हा सारा प्रकार बघून पॉल अगदीं स्तंभित होऊन गेला. या बाईला काय म्हणावें हेंच त्याला कळेना ! शेवटीं त्यानें तिला चक्क सांगितलें कीं, " तुम्ही मला मित्र समजतां हें ठीक आहे. पण मी तुमच्यावर प्रेम करतों, आणि तुमच्याशीं लग्न करायला मी उत्सुक आहे, असें जर तुम्ही समजत असाल तर तें साफ चूक आहे. या तुमच्या घोटाळ्यांत माझा कसलाहि संबंध नाहीं, हें तुम्हाला आणि तुमच्या नातेवाइकांना मी बजावून सांगतों."

कॉब्र बाईनें पुष्कळ कवसाल करून पाहिलें, परंतु पॉलनें बिलकुल दाद दिली नाहीं. अशा रीतीनें त्यांच्याकडून कडकडीत नकार मिळाला तरी-सुद्धां कॉब्र बाईनें आपलें लाव्हसटपण चालूच ठेवलें होतें. तथापि जीन पॉल मनानें अगदीं शाबूत असल्यामुळें मित्रपणाच्या नात्यावरच बाईला यापुढें संतुष्ट रहावें लागलें !

जीन पॉलला दुसरी अशीच एक रसिकेश्वरी भेटली. मेरी फॉरस्टर या नांवाची एका उदारमनस्क जर्मनाची मुलगी पॉलच्या लिखाणावर इतकी भाळली कीं, तिला त्याच्यावांचून चैनच पडेना. तिनें त्याला केव्हां पाहि-लेंहि नव्हतें; पण लिखाणांतून होणारी परोक्ष ओळख तिला पुरेशी ठरली. तिचें मन पॉलकडे जास्त जास्त ओढूं लागलें. ती वयानें अगदीं कोवळी होती, तेव्हांच पॉलचें लिखाण तिला आवडूं लागलें होतें. ती मोठी होऊं लागली, तसतशा त्याच्या लिखाणांतील मुरक्या, श्लेष आणि मोहिनी हीं तिला जास्त जास्त आवडूं लागलीं; आणि हा कसा असेल यासंबंधींच्या कांहीं अद्‌भुतरम्य कल्पना तिनें आपल्या मनाशीं केल्या. त्या नंदनवनांत जीन पॉल आणि आपण याशिवाय दुसरें कोणीहि नाहीं, अशीं स्वप्नें तिला पडूं लागलीं.

होतां होतां, त्याला प्रत्यक्ष लिहावें असें तिनें ठरवलें. पण पत्राचा झोंक तिनें निराळाच ठेवला. तिनें लिहिलें, " आपल्याला पत्र लिहिण्याचें

साहस करावें काय ? मानव्याच्या परमप्रिय मित्राला माझ्यासारख्या मुलीनें लिहिणें बरोबर आहे काय ? मी त्याला बाबा म्हणून हांक मारावी काय ? आपण केवढीं तरी उदात्त तत्त्वें मला शिकवलीं आहेत. आपल्या शब्दांच्या राईतून दूरवर जाणारा अत्यंत सुखकर मार्ग मला नेहमीं दिसत असतो."

जीन पॉल यानें उत्तर लिहिण्याची जरा चालढकलच केली. अत्यादराच्या पोटीं आणि अतीव रसिकत्वाच्या कुशींत कांहीं रोगट भावना उत्पन्न होतात हें त्याला आतांपर्यंत चांगलें माहीत झालेलें होतें. म्हणून त्यानें तिच्या पत्राकडे लक्षच दिलें नाहीं. मेरी फॉरस्टर हिला फारच वाईट वाटूं लागलें. आपलें जिणें अगदीं व्यर्थ आहे, जीन पॉल कोण याचा कांहीं विचार न करतां आपण त्याला पत्र लिहून बसलों; तो आपल्याला काय म्हणेल ?" असें ती आपल्या मनाशीं म्हणूं लागली. आवड आणि आदर यांच्या उपेक्षेनें ती शेवटीं झुरूं लागली; आणि मरणानेंच मनाला शान्ति प्राप्त होईल, या विचारानेंच ती ग्रस्त झाली.

मग एके दिवशीं पहांटे तिनें एक सुरी आपल्या बगलेंत खोंचून ठेवली; आणि ती नदीच्या किनाऱ्याला गेली. जातांना आपली विधवा आई आणि बहीण या घरांत निजलेल्या आहेत, या विचारानें ती अगदीं दुश्चित झाली होती. इतक्यांत, घरांत ती नाहींशी पाहून, तिची बहीण तिच्या मागोमाग नकळत गेली. मेरीच्या मनोवेदना तिला माहीत झाल्या होत्या. लगबगीनें मागून येऊन तिनें तिला धरलें; आणि ती तिला घरीं घेऊन आली.

थोड्याशा दिवसांनीं जीन पॉलचें पत्र तिला आलें. पत्राची भाषा अतिशय सौम्य आणि मनाचे क्लेश निवारण करणारी आहे असेंच मेरीला वाटलें. पॉलनें लिहिलें होतें, "मुली, तुला माझी मैत्री हवी आहे ना ? तर ती मैत्री मी तुला देतों. तूं मला बाबा म्हणून चहातेस; तर अवश्य म्हण. माझ्याकडे येण्यासाठीं तूं आपल्या आईला सोडूं नकोस. मीच तुझ्याकडे केव्हां तरी येईन. तुझीं पत्रें वाचून, मला आणि सौ. ला ( या वेळपर्यंत पॉलचें लग्न होऊन गेलें होतें. ) तुझ्यासंबंधानें फार प्रीति वाटूं लागली आहे. माझ्या प्रियकर मुली, सचोटीनें वाग."

पॉलचें पत्र पाहून मेरी ढसांढसां रडूं लागली; आणि आपल्यावर

ममता करणारें कोणी तरी माणूस भेटलें आहे, असें तिला वाटूं लागलें. जीव देण्यासाठीं नदीवर जाण्याच्या आधीं त्याला लिहून ठेवलेलें पत्र तिनें त्याच्याकडे पाठवून दिलें. तें वाचून तर पॉलला धसकाच बसला. आणि आपल्यासाठीं या पोरीच्या हातून काय विपरीत घडणार होतें याचा त्याला मोठा विस्मय वाटला. मग वात्सल्यबुद्धीनें त्यानें तिला अनेकदां लिहिलें, आणि तिच्या मनाला शान्ति उत्पन्न केली. पण असाहि एक मार्मिक विचार लिहिला कीं, " तुझें माझ्यासंबंधीं फार चांगलें मत दिसतें. तूं ध्यानांत ठेव. पुराणिकाचें प्रवचन जितकें पवित्र असतें तितकें त्याचें आचरणहि पवित्र असतें, किंवा एखाद्या ग्रंथांत जेवढें नीतिमत्त्व भरलेलें असतें तेवढें लेखकाच्या वर्तनांतहि असतें असें तूं बिलकुल समजूं नकोस. "

पत्र वाचून मेरीला अतिशय समाधान वाटलें; आणि तिच्या जीवात्म्याला शान्ति प्राप्त झाली. पण ही शान्ति फार दिवस टिकली नाहीं. काय असेल तें असो, पॉलच्या संबंधींचा विचार तिच्या मनाच्या जिव्हारीं लागून बसलेला होता; आणि कांहीं केल्या तिच्या हृदयाची ती जखम भरून येईना. शेवटीं तिच्या मनाला एक चमत्कारिक पराङ्मुखता उत्पन्न झाली; आणि तिनें निश्चय केला कीं, जीन पॉल याचें मुखावलोकनसुद्धां करावयाचें नाहीं. त्याला भेटावयाचेंच नाहीं अशी शपथच तिनें घेतली.

तिच्या मनाच्या निरनिराळ्या कातळांत कोणत्या परस्पर विरोधी भावना वागत होत्या हें सांगतां येणें फार कठीण आहे. पण या भावनांच्या संमिश्र आवेगांत तिनें त्याला लिहिलें कीं, " आतां इहलोकीं मला तुमचें दर्शन घडावयाचें नाहीं. कारण माझी तुमच्यावर अतिरिक्त प्रीति आहे. माझ्या मनाला थंडावा येईल असें कांहीं तरी लिहून पाठवा. परलोकांत जेव्हां तुमची आणि माझी गांठ पडेल तेव्हां तर तुम्ही मला जवळ कराल काय ? सध्यां तुम्ही एवढेंच करा कीं, आपल्या मस्तकावरील केसाची एक बट मला पाठवून द्या. "

जीन पॉलनें बट तर पाठवलीच; पण ममताळूपणानें तिला एक पत्रहि लिहिलें. अशासाठीं कीं, तिच्या मनाला आलेलें औदासिन्य नाहींसें व्हावें. परंतु, या पत्राचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तिचें औदासीन्य वाढवण्याला

आणि एकाकीपणाचा भाव उत्पन्न करण्याला एक घरगुती कारण घडून आलें. तिला घरचीं अशीं दोनच माणसें होतीं; एक आई, आणि दुसरें म्हणजे ज्या बहिणीनें तिला नदीवरून परत आणलें होतें ती तिची धाकटी बहीण. दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, तिचें मन असें हेलकावे खात असतांना आई मरून गेली, आणि धाकट्या बहिणीला कोणी जवळची नातेवाईक घेऊन जाण्यासाठीं आली होती. आतां घरांत मेरी फक्त एकटी – अगदीं एकटीच रहाणार होती. नाहीं म्हणावयास, तिच्या चित्ताला जडलेली हुरहुरीची आणि औदासीन्याची व्यथा तिला सोबत करीत असे.

अशा दारुण अवस्थेंतच जीन पॉलला तिनें पुन्हा एकदां लिहिलें. "परमप्रिय पिताजी, तुमच्या दुर्दैवी मेरीचें हें पत्र वाचून आपण रागावूं नका. दोन महिने झाले आहेत,–माझी आई मेली. आणि तिच्या मागोमाग मी गेलें तर ती खचित रागावणार नाहीं. धाकट्या बहिणीला जप असें तिनें मला सांगितलें होतें. तिच्या जपणुकीची व्यवस्था झाली आहे. आतां तिची काळजी मला नाहीं.

मी आतां एकटी राहिलें आहे. कारण, ज्यानें हातानें खुणवून मला जवळ करावयास हवें होतें त्यानें कां कोणास ठाऊक, अगदीं दगा दिला आहे. परमेश्वराच्या या विशाल विश्वांत कोठें तरी असें एखादें स्थल असेल कीं जेथें माझ्या मनाला शान्ति प्राप्त होईल; आणि जें व्हावयास हवें तें खरोखर घडून येईल.

माझ्या मनाचा ताप मला आतां सहन होत नाहीं. मी आतां मरणाला भीत नाहीं. तुमच्यासाठीं किंवा तुम्हांला प्रिय असलेल्या माणसांच्यासाठीं कांहीं तरी करावें, हीच मला पोखरणारी माझी वासना होती. पण ती तुम्हाला कशी कळणार? तुम्ही माझा मनांतून तिरस्कारच करीत रहाल. तुम्हाला सुखी करणें माझ्या हातीं राहिलें नाहीं, हें जेव्हां मला कळलें तेव्हांच मी मरून गेलें आहे. परंतु, तुम्ही माझा तिरस्कार करूं नका. जगानें मला विसरूनच जावें, माझा मागमूस राहूं नये अशी माझी इच्छा आहे. माझी हकीकत मीं कोणाला सांगितलेली नाहीं. माझीं पुस्तकें आणि दैनंदिनी मी जाळून टाकल्या आहेत. तुम्हीं पाठवलेली केसाची बट मी माझ्या गळ्यांत बांधली आहे; आणि मेल्यानंतरहि ती माझ्या गळ्यांतच रहाणार आहे.

प्रेमळ पिताजी, मी आतां तुमचा निरोप घेतें. अरेरे ! माझा शेवट असा व्हावा ना ! मीं तुम्हांला पहिल्यानें पत्र लिहिलेंच नसतें तर किती बरें झालें असतें ! कुडींतून बाहेर पडलेला माझा दुर्दैवी आत्मा तुमच्याभोंवतींच फडफड करीत राहील. ”

हें पत्र मेरीनें लिहिलें तेव्हां रात्रींचे आठ वाजले होते. ती खुर्चीवरून उठली. तिनें आपल्या बहिणीला आणि त्या नातेवाईक बाईला दोन्ही हातांनीं कवटाळलें, आणि ती घरांतून बाहेर पडली. प्रथम त्या दोघींना मेरीच्या या तडकाफडकीं वागण्याचा अर्थ कळलाच नाहीं. कांहीं वेळानें त्यांनीं टेबलावरचे कागदपत्र पाहिले तेव्हां त्यांच्या ध्यानात आलें कीं, आपल्या जिवाचें कांहीं बरेंवाईट करावें यासाठींच ही बाहेर पडली असावी. त्या लगोलग बाहेर पडल्या आणि नदीकडे गेल्या. तों तिकडून नदींत पडलेल्या एका बाईचें प्रेत कोळी लोक खांद्यावरून आणीत आहेत आणि भोंवतीं माणसें जमा झालीं आहेत असें त्यांना दिसलें.

ती बाई दुसरी तिसरी कोणी नसून मेरीच होती; आणि थोडेंसें सुदैव असें कीं, ती अजून प्रेत बनलेली नव्हती. सर्वांनीं तिला जवळच्या एका खोपटांत नेलें, आणि कांहीं द्रव्यें हुंगावयास दिलीं. तिचे एकदम डोळे उघडले. ताई शुद्धीवर आली म्हणून बहिणीला अतिशय आनंद झाला. पण ताईनें मरावयाचेंच ठरवलें होतें. तिच्या मनांत नसतांना कोळ्यांनीं तिला बाहेर काढलें होतें. मेरीनें नाकापुढें धरलेल्या पोथड्या तिरस्कारानें बाजूला सारल्या आणि डोळे गच्च मिटून घेऊन ती गप्प पडून राहिली. कदाचित् तिनें श्वासाचासुद्धां विरोध केला असेल. सकाळीं पहातात तों, मेरीचा दुर्दैवी आत्मा केव्हांच बाहेर पडला होता, आणि मेरीचें काष्ठ शिल्लक राहिलें होतें.

तिच्या मरणाची वार्ता कळली, आणि जीन पॉल दुःखानें व विस्मयानें खालींच बसला ! तो मनाशीं म्हणाला, “ मानवप्राण्याला सुखी करावें हा आम्हां लेखकांचा उदात्त जीवितहेतु असतो; पण जेव्हां आपल्या हेतूला निराशेचें आणि मृत्यूचें रूप अशा रीतीनें प्राप्त होतें तेव्हां मात्र तुम्ही कितीहि सोज्ज्वळ बुद्धीचे असा, तुम्ही स्तंभित झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

कवीनें राजा व्हावें असें म्हणतात; पण माझ्या नशिबानें मला एका मुलीस फांसावर चढवावयास लावलें आहे. ”

आतां याला जीन पॉल यानें तरी काय करावें बरें! तो पन्नाशीला आलेला होता, आणि ही मुलगी केवळ सतरा वर्षांची होती. त्याचा मूळचा कवीचा प्रफुल्ल चेहरा आकसून जाऊन तो कुरूप बनला होता; आणि त्याला आपल्यासाठीं कोण कोण वेडें बनत आहे आणि झुरत आहे याची दखल घेण्याची जरूरीहि नव्हती. तो आपल्या प्रपंचांत मग्न होता. बायकोवर त्याची पराकाष्ठेची निष्ठा होती. आपल्या मुलांवर त्याचें भारीच प्रेम होतें. त्यानें घरांत कांहीं पोपट, मैना असे पक्षी बाळगले होते; आणि खारोट्यांचें एक खुराडेंहि ठेवलें होतें. त्याची प्रतिभा सर्वच मावळून गेली होती; आणि अशा वेळीं या वेड्या पोरींचीं असलीं पत्रें येत होतीं! तो तरी काय जबाब देणार? मेरी तर मरूनच गेली; पण कॉब बाईचें पुढें काय झालें याचीहि त्यानें चौकशी केली नाहीं. मागें वळून न पाहतां, आपल्या जीविताच्या ‘त्या’ टोंकाकडे तो मंद पावलें टाकीत चाललेला होता.

*

# १०

# अवं ऽ, खून न्या केलाया !

आज संध्याकाळीं घरीं आल्यापासून तुकाराम अस्वस्थच दिसत होता. त्याची हालचाल पाहिली म्हणजे याच्या मनांत कांहीं तरी काहूर चालू आहे अशी अटकळ कोणींहि केली असती. त्याचे डोळे लालेलाल झाले होते, आणि तो आपल्या मिशांवरून पुन्हां पुन्हां हात फिरवीत होता. मधूनच भिंतीच्या झरोक्यांतून बाहेर पाहून तो रागानें पुटपुटत होता! कोपऱ्यांत ठेवलेल्या स्वच्छ धुतलेल्या कोयत्याकडे त्याची दृष्टि सारखी वळत होती, आणि संशयी नजरेनें तो घरांतल्या माणसांकडे मधून मधून पहात होता.

‘ दादा, भाकर खाया चलतां ना ! ’ असें बाळा कितीदां तरी म्हणाला; आणि दर वेळीं ‘ व्हय ’ म्हणूनसुद्धां तुकाराम आपल्या त्या ठेंगण्या माळींत अजून येरझारा घालतच होता. कारभारणीनें बेसन तयार केलें होतें, आणि भाकऱ्यांचें तव्यावरचें धुडुप धुडुप चालू होतें. पलीकडे टांगलेल्या पाळण्यांत पालथा वळलेला शिवा छातीपासूनचा मोहरा वर करून आईकडे हंसत पहात होता. आणि भाकरीच्या दर आवाजाबरोबर त्याचें हंसणें सारखें चेकाळत चाललें होतें.

सावित्री बाळाची थोरली भावजय. तुकाराम अन् सावित्री बाळावर जिवापाड प्रेम करत. रानांतून परत आल्यावर तुकारामानें बाळाशीं दोन गोष्टी केल्या नाहींत असें कधीं झालेंच नाहीं. पण काय असेल तें असो, आज तुकारामाचा दिल् थोडा बिघडलेला दिसत होता. सावित्रीचें सुहास्य मुख, बाळाच्या हांका, किंवा शिवाच्या पाळण्यांतल्या खेळकर आरोळ्या — आज त्याचें तिकडे लक्षच जाईना.

नेहमींप्रमाणें आजहि तो बाहेर कोयता घेऊन गेला होता. तळ्याच्या कांठच्या स्वतःच्या कुंपणांतल्या झाडोऱ्याची तोड करण्याचें त्याचें हें काम आज कैक दिवस चालू होतें. पण एवढें मात्र खरें कीं, त्याच्या हातांतील

कोयता आजच्याइतका स्वच्छ धुतलेला बाळानें आणि सावित्रीनें आधीं कधीं पाहिला नव्हता.

बाळा हा एकवीस–बावीस वर्षांचा तगडा जवान होता. मारुतीच्या देवळाशेजारीं असलेल्या तालमींत तो नेमानें जायचा! दंड, बैठका काढून घाम पुसल्यावर बाहेर असलेल्या दगडी कट्टयावर कांहीं वेळ बसायचा, आणि मग तळ्यांत चार–दोन सुरकांड्या मारून, मारुतीला पाणी घालून तो घरीं परत यायचा. तुकारामानें गोठ्यांतली एक चांगली पोसलेली गाय बाळासाठीं आणि शिवासाठीं राखून ठेवली होती. सावित्रीनें आणलेली तिची धारोष्ण चरवी एकदां तोंडाला लावली म्हणजे निथळा घशांत जाईपर्यंत आपली ताठ गर्दन बाळा कधीं खालीं करीत नसे. गाईचें दूध, रानचा वारा, आखाड्यांतली मस्ती, अन् शेतावरचा कामधंदा – यांवर बाळा चांगला बलदंड झाला होता. तुकारामानें मोठ्या हौसेनें त्याच्या हातांत एक भलें दांडगें चांदीचें कडें घातलें होतें. आणि त्यानें अजून जरी कोठें फडावर कुस्ती केलेली नसली तरी त्याचें पिळदार आणि कसलेलें शरीर पाहिलें म्हणजे हा एखादे वेळीं चांगल्या नाणावलेल्या पहिलवानालासुद्धां जेर करील, असें गांवकरी कौतुकानें म्हणत.

अंगांतल्या रगीमुळें इतरांशीं बाळा जरी ताठरपणानें बोले, तरी तुकारामाची चाहूल लागतांच तो गोगलगाईसारखा मऊ येत असे. दादा आणि वहिनी म्हणजे त्याचें कैवल्य होतें. लहानपणींच आईबाप हिंवतापाच्या सांथींत दगावले होते; आणि बाळाला त्यांची केवळ अंधुक अंधुक आठवण असे. त्याच्या दादानें त्याला लहानाचा मोठा केला होता, आणि भावजयीनें त्याच्या आईची जागा घेतली होती. आज दादा कांहीं तरी फिकिरींत आहे हें पाहून तोहि थोडा गलबलला होता.

भोंवतालच्या शिवारांत तुकारामाचें घराणें मोठें अब्रूदार म्हणून समजलें जाई. ही त्याच्या घराण्याची कीर्ति कैक पिढ्या चालत आलेली होती. या किर्तीला काळिमा लागेल असें कोणतेंहि कृत्य तुकारामानें आजपर्यंत केलेलें नव्हतें. आपली शेती सांभाळावी, गांवकीच्या कामांतला कांहीं गुंता असला तर तेवढा चालीस लावावा, आणि आपला प्रपंच बरा कीं आपण बरे असें म्हणावें,–ही तुकारामाची वागण्याची रीत होती. शेतांत सदा

बैलांची मोट होती, आणि ती अष्टौप्रहर चालू ठेवली तरी विहिरींचें पाणी पुन्हां कांठापर्यंत डबडबलेलें राही. कामाला चार गडी, पांचपंचवीस गुरें, आणि घरचा संसार एवढ्यांचें पाहतां पाहतां तुकारामाचा दिवस केव्हांच निघून जाई. त्यानें माळ घातलेली होती, अन् त्याची आषाढी–कार्तिकी अद्याप चुकली नव्हती. वयानें तुकाराम कांहीं फार मोटा नव्हता. पण एखादें माणूस लहानपणापासूनच शहाणें, विचारी, आणि समंजस असतें. तुकाराम त्यांतलाच होता.

शेतीभातीच्या कामाबरोबरच अलीकडे आणखी एक काम तुकारामानें हातीं घेतलें होतें. गांवच्या तळ्याला लागूनच त्याच्या मालकीचा पुष्कळ झाडझडोपा पसरलेला होता. आणि हा तुकारामाच्या शेताच्या बांधाला लागून होता. हें रान तोडून एकदां साफ करावें आणि जमल्यास नांगरूनहि काढावें,— कारण ही मालकीची जागा पडीक राहूं देणें बरोबर नाहीं, असें त्याला वाटे. सध्यां जरी सारें ठीक असलें, आणि खळ्यावर डोक्याइतक्या उंच धान्याच्या राशी पडत असल्या तरी बाळा आतां मोठा होत चालला होता. तेव्हां आज ना उद्यां वांटणीचा प्रसंग आलाच तर दोघांनाहि नांगरटीखालीं असलेली बख्खळ जमीन वांट्याला यावी, असा त्याचा हिशेब होता.

गेन्या हा एक बदमाषच माणूस होता. कांहीं माणसें प्रसंगानुसार एखादें अपकृत्य करतात, तर कांहीं जण विशेष कारण झालें तरच करतात. तें त्याच्या हातून होऊन जातें, आणि मग झालें हें बरें झालें नाहीं असें त्यांचें त्यांनाच वाटूं लागतें. हीं माणसें मूळचीं प्रवृत्तीनें सरळच असतात; पण भावनेच्या उद्वेगानें त्यांचा एखादे वेळीं तोल सुटतो, इतकेंच काय तें. पण दुसरीं कांहीं माणसें प्रकृतीनेंच वाईट असतात. त्यांच्या मनाचा पिंडच वाममार्गाकडे वळणारा असतो. कोणाचें कांहीं चोरावें, खोटें बोलावें, फसवावें, कोणाचा अपमान करावा, स्त्रियांची आगळीक करावी, किंवा दुसऱ्याच्या धनाचा अपहार करावा, असें त्यांना आपोआपच वाटतें; आणि असें करावयास कुठें संधि मिळेल इकडेच त्यांचें लक्ष असतें. जग आपडें सरळ मार्गानें जात असतें; पण असले लोक मात्र सावध असतात, आणि हयगय, उपेक्षा, दुर्लक्ष, दुर्बलता हीं त्यांना कोठें दिसून आलीं की

तीं त्यावर एकदम झडप घालतात. पण तुकारामासारख्या सालस माणसाला-सुद्धां तो उपद्रव देईल असें कोणाला वाटलें नव्हतें.

बरें ! उपद्रवाचें स्वरूप तरी साधेंसुधें होतें का पहा ! पाहिल्या पहिल्यानें त्यानें झाडोऱ्यावरून भांडण काढलें. आतां डोंगराच्या पायथ्यापर्यंतचा रानचा टापू तुकारामाच्या घराण्याकडे कैक पिढ्या मालकी हक्कानें आला आहे हें साऱ्या गांवाला ठाऊक होतें; पण गेन्याच्या लुटारू मनाला वाटूं लागलें कीं, इतकें रान पडलें आहे, तरवड जिकडे तिकडे माजला आहे. अन् ढोर लोक कातडीं कमावण्यासाठीं नेतात तर तो आपण बेलाशक कापून न्यावा. गेन्यानें तुकारामाला सरळ सरळ विचारलें असतें कीं, तरवडाचे चार भारे ढोरांना विकून मी पोटाला मिळवूं का ? तर तुकारामासारखा उदार माणूस बहुधा नको म्हणाला नसता. पण गेन्याला हा सरळ मार्ग कुठून मानवणार ? तें रान कापण्यासाठीं तो आडमार्गानें शिरला. गेन्या तरवड कापून नेतो ही वर्दी कशी ना कशी तुकारामाला लागली. त्यानें गेन्याला भलेपणानें सांगितलें कीं, ' माझें रान तूं कापूं नकोस; तुला पोटाला हवें असेल तर मला सांग. ' तोंडदेखला गेन्या ' हो ' म्हणे; पण तुकाराम पाठमोरा झाला कीं, त्याला ऐकूं जाईल अशा बेतानें गेन्या म्हणे, ' जसा कांहीं याच्या बापाचाच तरवड आहे कीं नाहीं ! ' तुकाराम धिमा होता. असल्या माणसाच्या तोंडीं लागणें त्याला पसंत नव्हतें. हळूहळू न विचारतां तरवड कापण्याचा सपाटाच गेन्यानें लावला.

पण एवढ्यावरच भागलें नाहीं. गेन्या प्रवृत्तीनेंच वाईट होता. तुकारामाचें रान कापून नेऊनच तो थांबला नाहीं; संधि सांपडेल तिथें तो त्याची कुचाळी करूं लागला; त्याच्या माळेची थट्टा करूं लागला. तुकाराम दिसला कीं दोन हातांचा नमस्कार उंच करून, ' या पंढरीचं इठोबा ' अशी त्याची हेटाळणी करूं लागला. तुकारामानें माळ घातली असल्यानें तो शुद्ध शाकाहारी बनलेला होता. आतां याच्याशीं खरें पाहतां गेन्याच्या काय संबंध होता ? पण तुकारामाची कांहीं तरी कुरापत काढल्याशिवाय त्याच्या जिवाला चैनच पडत नसे. एकदां तो तुकारामाला म्हणाला, ' अवं पंढरीचं संत ! आज जरा बरबाट केलंया ,

नरुटीनं आणूं का जरासं ? ' तुकाराम जर होता तितका शान्त स्वभावाचा नसता तर त्यानें गेन्याला केव्हांच दुमता करून भुईवर आपटला असता आणि लाथांखालीं तुडवला असता; पण हा मूर्ख माणूस आहे, त्याच्या नादीं आपण लागतां कामा नये, असा हिशेब मनाशीं करून गेन्याचें बोलणें त्यानें हंशावरी नेलें.

पण ही तुकारामाची उपेक्षा त्याच्या नेभळेपणाचें द्योतक आहे, असें गेन्याला वाटूं लागलें, आणि तो त्याची टवाळी जास्त जास्तच करूं लागला. तुकाराम वारीला जाणार आहे असें कुठें तरी कळतांच गेन्या त्याला म्हणाला, " अवं तुकारामबुवा, इठ्लाला आमचं बी दंडवत सांगा. सडंच जाताया कां ' जिजाबाई 'ला बी नेताया ? अव त्येस्नी न्या बराबर,—वाटेनं जरा वाइच त्येंच्या सांगातीं तुम्हास्नी हुशारी बी वाटल-अन् भजान बी रंगल ! " दिवसेंदिवस गेन्याची थट्टा बहकत चालली आहे हें तुकारामानें अर्थातच ओळखलें, आणि आतां हळूहळू त्याची शान्ति ढळूं लागली.

एकदां तर तो त्याच्याहि पुढें गेला. कोयता घेऊन झाडोरा तोडण्यासाठीं तळ्याकांठच्या रानांत तुकाराम चालला असतां गेन्या त्याला म्हणाला, " तुकारामबोवा, अव परपंच लई खोटा. आतां तो सोडूनशान पंढरीला कवा जायाचं ? " आज मात्र तुकाराम गेन्याकडे एकदम रोखून पाहूं लागला ! पण तो मूर्ख माणूस कांहींच उमगला नाहीं. तो आणखी म्हणाला, " साधुसंतांना कुठलीं पोरंबाळं; अवं हीं इठ्लाचीं पोरं ! " या टवाळींतला दंश तुकारामाच्या मनाला फार झोंबला. इतके दिवस सांचलेला त्याचा राग एकदम भडकला, आणि तो दांड गडी गेन्याच्या अंगावर चवताळून तुटून पडला. गेन्यानें थोडी मस्ती केली; पण तुकारामानें त्याला दोन हिसक्यांतच खालीं लोटला आणि " थांब, तुला इठ्लाचीं पोरं दावतों " असें म्हणून हातांतल्या कोयत्यानें त्यानें त्या दुष्टाची मान एकदम सफा केली !

आपण रागाच्या भरांत काय केलें हें ध्यानांत यायला तुकारामाला थोडा वेळ लागला. पण जल्दी करून त्यानें तें धड आणि मुंडकें उचलून तळ्यांत फेंकून दिलें; कोयता स्वच्छ धुतला, आणि आपलें बेहोष अन् बेभान मन शान्त झाल्यावर तो आपल्या घराकडे वळला. पण

तळयाच्या पलीकडून रानांत चाललेल्या कांहीं जणांनीं हें आपलें अघोरी कृत्य पाहिलें आहे हें त्याच्या ओझरतें ध्यानांत येऊन चुकलें.

दोन दिवस गेले, अन् गेन्या नाहींसा झाल्याचा गवगवा झाला. टिचभर गांव, अन् भोंवतालच्या शिवारांत दहापांच गोठे. सगळीकडे एकच कुचकुच चालू झाली. पोलिसाचें गेट गांवापासून दहा मैलांवर होतें. अर्थात् गेन्या मेल्याची बोंब तेथवर पोंचावयास थोडा वेळ लागला, पण तळयांतलें प्रेत ओरडत उठलें, आणि धुतलेला कोयता व तुकारामाची बावरलेली मुद्रा हीं डोळयांपुढें येऊन घरांतील माणसें भयानें कांपूं लागलीं.

सावित्रीला तर तुकारामाच्या तोंडाकडेहि पाहवेना. त्याच्या हालचालींत अस्वस्थपणा जास्त वाढत चालला आहे हें पाहून तिच्या मनानें अगदीं ठाव सोडला. घरच्या कामांत तिचें लक्षहि लागेना. धाकटया दिराला ती म्हणूं लागली, ' देवर्जी, आतां कसं व्हायचं ? ' देवर्जीसुद्धां घाबरून गेला होता. दादाशीं काय बोलावं हेंच त्याला कळेना. पुढें काय वाढून ठेवलें आहे हें सर्वांनाच कळून चुकलें. एवढा भरलेला प्रपंच,–यांतून तुकारामाला उठून जावें लागणार हें अगदीं स्पष्ट दिसत होतें.

भोंवतालच्या दहापांच कोसांत तुकारामासारखा अस्राप माणूस नव्हता; आणि त्याचा दबदबाहि मोठा होता. त्याचीं अंबारें धान्यांनीं भरलेलीं असत; आणि सुगीच्या वेळीं खळयावर येणाऱ्या कोणाहि कारूनारूला अन् वासुदेव–गोसाव्याला त्यानें कधीं विन्मुख दवडलें नाहीं. त्याला कुणाचें पै देणें नव्हतें, आणि त्याच्या घरांत भांडणाचें नांव नव्हतें. नवराबायको परस्परांवर फार प्रीति करीत. पुढल्या पिढीचे अंकुर अंगणांत भराभर वाढत चालले होते.–आणि आतां या सगळ्या वैभवांतून तुकारामाला दैव ओढून नेणार होतं ! तुकाराम शहाणा, शान्त आणि धिम्मा खरा, पण सांचत आलेल्या संतापाच्या भरांत त्यानें करूं नये ते केलें होतें हें मात्र खरें.

दादाच्या हातून ही फार चमत्कारिक गोष्ट घडली; आणि दादाला आतां फांसावर जावें लागणार हें बाळाला चक्क दिसूं लागलें. अगदीं खेडेगांवांतल्या लोकांनासुद्धां न्यायाच्या पद्धति थोड्याफार माहीत झालेल्या असतात. सावित्री अन् बाळा एकत्र बसून रडूं लागलीं. सावित्रीचा नवरा अन्

बाळाचा दादा आतां या जगांतून नाहींसा होणार होता;–आणि खुनाचा दोष घराण्याला चिकटणार होता. लोक जातां येतां आपल्या दाराकडे बोट दाखवतील, आणि 'तुकाराम–तुकाराम नांवाच्या माणसानें खून केला म्हणतात ना तो इथेंच रहात असे' असें ते एकमेकांना सांगूं लागतील, हें अटळ दृश्य त्यांच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें. पण त्यांचें सारें दुःख म्हणजे तुकाराम आपल्याला अंतरणार, आणि एक फार भला आणि थोर माणूस कुत्र्याच्या मोलानें मरणार हें होतें !

गेन्या बदमाष होता; आणि तुकारामाला चीड येईल असेंच त्याचें वर्तन होतें, हें खरें होतें. पण असें असलें म्हणून तुकारामानें त्याचा खून करावा ही गोष्ट कोणालाच पटण्यासारखी नव्हती. घरच्या घरीं बोलतांना गेन्याला चांगलें शासन हवें होतें. आणि तुकाराम भडकला तें बरोबरच होतें असें त्याना वाटे. पण या वाटण्याचा आतां कांहीं उपयोग नव्हता. तुकारामानें गेन्याला केलेली शिक्षा कायद्याच्या दृष्टीनें गेन्याच्या अपराधाच्या मानानें जास्त कडक ठरणार होती; आणि तिचें प्रायश्चित्त आतां तुकारामाला निश्चित भोगावें लागणार, या विचारानें सावित्री आणि बाळा अगदीं गडबडून गेलीं.

तुकारामाची स्थिति तर अगदींच केविलवाणी झाली होती. 'तुम्हीं खून केला असला तरी आम्ही तुम्हांला कमी लेखत नाहीं; तुम्हीं केलें तें बरोबरच केलें असा भाव सुचविणारी सावित्री व बाळा यांची चर्या पाहिल्यावर त्याला थोडासा धीर येई. आपलीं जीवाभावाचीं माणसें आपल्याला अजूनहि दूर करीत नाहींत किंवा कमीहि लेखीत नाहींत, या जाणीवेनें तुकारामाचा सुटत चाललेला धीर कायम राहिला.

पण हा सारा परस्परांच्या भावनांचा खेळ होता. एक गोष्ट त्याच्या मनाला पटली होती कीं, आपण खून केला आहे, तर आज ना उद्यां आपल्याला फांशीं जावें लागणारच. आपल्यासंबंधानें गांवांत चांगलें असलेलें मत आतां गढूळ होणार, आणि गांवकऱ्यांच्या पसंतींतून आपण कायमचे उतरणार, या जाणीवेनें त्याचें मन जास्तच खिन्न होत चाललें होतें. स्वतःच्यासंबंधानें लोकांत आपण किती विश्वास उत्पन्न केला होता; पण त्या विश्वासाला आपण यापुढें पात्र ठरणार नाहीं, ही अपमानाची जाणीव तुकारामाच्या मनाला सारखी खाऊं लागली. तरणीताठी बायको, सोन्या-

सारखीं मुलें, अन् घरांत व शिवारांत आपल्या शेजारीं उभा राहणारा बाळासारखा मर्द छावा यांना आपण आतां कायमचें अंतरणार या भावनेनें तर त्याचें चित दर क्षणीं करपत चाललें होतें. सावित्रीला आणि बाळाला वाटे कीं, प्रत्यक्ष फांसावर जाण्याच्या आधींच अब्रू गेल्याच्या दुःखानेंच या भल्या गृहस्थाचा अंत होतो कीं काय?

पोलिस ठाण्यावर जमादारसाहेब एका मोडक्या खुर्चीवर पाय ताणून बसले होते. एकजण चिलीम पेटवून जमादारांच्या हातांत देत होता. निशा संपली तरी साहेबांची नशा अजून थोडीबहुत उरलीच होती. इतक्यांत एक पैलवान वळणाचा माणूस गेटासमोर येऊन उभा राहिला. हा कोण असावा म्हणून शिपाई लोक पाहत आहेत तोंच त्यानें हातांतला कोयता जमादारापुढें टाकला आणि कांपऱ्या आवाजानें तो म्हणाला, "साहेब, म्यां गुन्हा केला हाये. मी माजा वाघ्या मारला हाय्. माझं डोचकं तुमी मारा. मला तुम्ही फांसावर द्या." सारे पोलिस लोक त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले. त्याच्या डोळ्यांत खून चढलेला दिसत नव्हता, पण आपण गेन्याचा खून केल्याची वार्ता तो आपणाहून सांगत होता; आणि ज्या कोयत्यानें गेन्याला तोडला तो कोयताहि त्यानें चावडीपुढें आणून टाकला होता. थोड्या वेळानें जमादार आणि शिपाई गुन्ह्याच्या जागीं जावयास निघणार होते. जमादारसाहेबांची धुंदी पुरती उतरण्याची वाटच शिपाई पहात होते. इतक्यांत हा गुन्हेगार जातीनें येऊन ठेपला होता. एक शिपाई म्हणाला, "अरं ह्यो तर बाळा पैलवान् नव्हं का? अरं बाळ्या, लेका मस्ती फार झाली व्हय रं?" आतां जमादाराचें तोंड सुरू झालें, "यांना खायला फार झालं आहे. मस्ती चढलेय साल्यांना. दुसरीं माणसं म्हणजे यांना उंदीर, घुशी वाटतात अरे! हा त्या तुकारामाचा भाऊ कीं काय?" बाळानें मान हालवली. "अरे, असल्या भावाच्या घरांत वाढलास अन् खून करतोस! तुला म्हणावं तरी काय?" बाळा आतां रडूं लागला. 'अरे, आतां रडून काय होतंय. गेन्याची मान कापलीस तर आतां तुझी मान तुटलीच म्हणून समज. शिपाई, याच्या मुसक्या बांधून ठेवा!"

* * *

सावित्री सारखी स्फुंदत होती, आणि तुकाराम तिच्याकडे शून्य नजरेनें पहात होता. एरंडेल तेलाच्या दिवलीचा प्रकाश तो कितीसा पडणार ? पण त्याहि प्रकाशांत दिसणारी सावित्रीची गोजिरवाणी मूर्ति पाहून तुकारामाला मधून मधून हुंदके येत होते. आपण दोघें एकमेकांना कायमचीं अंतरणार हा विचार त्यांचें काळीज सारखें कुरतडत होता. आपला भरला संसार गमावणार, अन् आपण रांडाव बनून मातीमोल होणार हें पाहून सावित्री हैराण होऊन गेली. आणि वाडवडलांपासून चालत आलेली आणि अंगमेहनत करून आपण वाढवलेली ही शेतवाडी खुनाच्या दोषानें कायमची कोळपणार, हें पाहून तुकाराम खरोखर घाबरा होऊन गेला. पण आतां दुसरी गति नव्हती.

" कुनी काइ म्हनालं आन् खून खून म्हणून वरडा केला तरी माझीं मानसं कशीं हायती ह्ये मला नीट कळतंया. आजून सवताला अवगाड वाटुन नई घ्याव. " सावित्री धीर देत होती.

तुकाराम खिन्न होऊन म्हणे, " कारभारनी ! तूं एक तरी अशी राहलीयास. जो भेटतुया त्यो लांबून जातुया. तूं मातुर मला सोडूनशान जात नाइस. आतां तुज्या सांगाती मी लई दीस राह्याचा न्हाइ. त्ये मला वोढून नेत्याल, पन् कारभारनी, पंढरीच्या इठुबाला समदं कळतंया ! "

रात्र गडद होत चालली होती, अन् रात्रीचें तिमिर त्या दोघांच्या जीवात्म्यावरसुद्धां जलदीनें पसरत चाललें होतें. माणसाचें शरीर भारीच लवचिक अन् ढिसुळ असतें. पण या शरीराची खोळ ज्या अंतःकरणानें पांघरलेली असते तें मात्र आपण समजतों तितकें नाजुक नसतें. त्याच्यावर सहस्र प्रहार झाले तरी त्याचा टवकासुद्धां निघत नाहीं. तें काहील झाल्यासारखें दाखवतें; कासाविसहि होतें; आणि आतां शरीरासकट खालीं कोसळेल कीं काय असें वाटतें. पण शरीर कोसळलें तरी हें निगरगट्ट अंतःकरण लोचटपणें, होत असलेल्या दाहांतून बाहेर पडून, पाहिल्यासारखें रहातें.

हा प्रसंग तरी साधा होता काय ? नवराबायकोच्या चित्ताच्या चिरफळ्या व्हायला हव्या होत्या; चिंध्या बनायला हव्या होत्या; ठिकऱ्या उडायला हव्या होत्या. पण दाहक दुःखाच्या तापलेल्या कढईत सारखें तळत राहिलें तरी सावित्रीचें किंवा तुकारामाचें चित्त भंग पावलें नाहीं. सारा गांव,

गुरेंढोरें, लहान पोरें, अन् कदाचित् पाठचा भाऊ हीं स्वस्थ झोपीं गेलीं होतीं. पण सावित्री आणि तुकाराम यांच्याभोंवतीं दुःखाचा खडा पहारा चालू होता.

घंटामागून घंटा गेला, अन् दोघेंजणें शेजारच्या माळींत जाऊन पहातात तों बाळा नाहीं असें त्यांना दिसून आलें. बाळा पहांटे उठत असे हें खरें, पण येवढ्या पहांटेचा मात्र खास नव्हे. मनांत चर्रर होऊन दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें, आणि येऊं नये तो विचार तुकारामाच्या मनांत आला. स्फुंदत स्फुंदत तो सावित्रीला म्हणाला, "कारभारनी, माझा बाळाहि मला कंटाळला का ग ? त्योहि मला सोडून ग्येला का ? " अन् आक्रोश करून तो धरणीवर कोसळला.

कोणी कोसळो नाहीं तर कोणी ताठ उभें असो; कोणी मरो किंवा कोणी जन्माला येवो, दिवस-रात्रींचें वेळापत्रक कशाचीहि पर्वा न करतां बिनचूक चाललेलें असतें. त्या दोघांचा तो सारा दिवस बाळाच्या शोधांतच गेला. बाळावांचून सारें घर, अवघी शेतवाडी, इतकेंच काय – अलम दुनिया तुकारामाला आणि सावित्रीला ओस वाटूं लागली. 'बाळाहि मला सोडून गेला का ?' असें पहांटेच्या वेळीं तुकाराम उद्वेगानें म्हणाला होता; पण त्याला पक्कें माहीत होतें कीं, असल्या संकटांत आपण सांपडलों असतां बाळा आपल्याला कधींहि अंतर देणार नाहीं. सावित्रीहि त्याला हेंच बजावीत होती कीं, देवर्जी असलें काम कधीं करायचे नाहींत. होतां होतां संध्याकाळच्या वेळीं चोकीकडून आलेलीं कांहीं माणसं सांगूं लागलीं कीं, बाळाला आम्हीं गेटावर पाहिला, अन् तो पोलिसांना सांगतोय कीं, गेन्याचा खून आपणच केला !

हे शब्द कानीं पडतांच लिंबाखालीं सचिंत उभा असलेला तुकाराम दोन्ही हात कमरेवर देऊन दुःखानं मटकन् खालींच बसला. त्याला धीर देत असलेली सावित्रीहि एकदम गांगरून गेली आणि म्हणाली, "तरी सकाळपासून पहात्येंय पण कोयता कांहीं कुठं सांपडत नाहीं. " आणि आश्चर्य, दुःख, आणि प्रेम यांच्या लाटांखालीं त्यांचे जीवात्मे केवळ गुदमरून गेले.

त्यांना पुष्कळ बोलतां येत नव्हतें, कारण घरचीं आणि शेतावरचीं

सारीं कामें न बोलतांच त्यांना करावीं लागत. तीं दोघें जर शिकलेलीं असतीं, आणि त्या दोघांच्या जिव्हा शहरांतल्या शिष्टांसारख्या हालत राहिल्या असल्या तर उन्मळून येणारीं आपलीं चित्तें त्यांनीं सहस्र शब्दांनीं व्यक्त केलीं असतीं.

तुकाराम अन् सावित्री अडाणी होतीं खरीं, पण अडाण्यांनाहि भावना असतातच. त्यांनीं नुसतेंच उर बडवून घेतले. असला भाऊ आपल्याला सोडून गेला ही कल्पना तरी आपल्याला कशी शिवली असें मनांत येऊन तुकारामानें थाड्थाड् थोबाडींत मारून घेतल्या. सावित्रीनें त्याचे दोन्ही हात आपल्या कवळ्यांत धरले; पण पुढें काय करावें हें तिलाहि कळेना.

शेवटीं भावनांचा पूर ओसरल्यावर तुकाराम म्हणाला, "कारभारणी, मी बाळाला मरूं देणार नाहीं. खून मीं केला आहे, अन् बाळा माझा धाकटा भाऊ आहे. आतां तूं या प्रपंचाकडे बघ. हीं जितरापं तूंच संभाळ;–आणि पोरं मोठीं झालीं म्हणजे त्यांच्या हवालीं सारी जिनगानी कर. कोणी सांगावं ? आम्हांला कायदा कळत नाहीं. कदाचित् दोगबी फांशीं जाऊं. आतां मी निघालों म्हणून समज."

तुकारामाचे अश्रु आतां पुरते आटले. त्याच्या मनांत ईर्षा उत्पन्न झाली, आणि एखादी गोष्ट घडवून आणण्यासाठीं माणसानें जसें दंड ठोकून बाहेर पडावें तसा तुकाराम वाडग्याबाहेर पडला. तो कबुलीजबाब देऊन भावाचा जीव वांचवणार होता. सावित्री 'थांबा मालिक ! थांबा मालिक !' असें म्हणत असतांनाच तुकाराम झापा लावून घेऊन त्वरेनें झटकला आणि अंधारांत दिसेनासा झाला.

आतां सावित्रीचा नवरा आणि सावित्रीचा दीर दोघेंहि घराबाहेर पडलीं होतीं;–भोंवतालीं अंधार पसरला होता. वाडींतलीं माणसें भयभीत झालीं होतीं. रात्र करकरूं लागली. हळूहळू सारें जग झोपीं गेलें. फक्त सावित्रीला झोंप आली नाहीं.

वास्तविक प्रसंग फार करुणास्पद होता. पण माणसाच्या मनाला केव्हां कोणता हेलकावा बसला म्हणजे त्याचे व्यापार चालू होतात हें खरोखरच पहाण्यासारखें असतें. पोलिस ठाण्यावर जातांना तुकाराम अगदीं खिन्न आणि

कष्टी दिसावयास हवा होता. पण भावानें आपल्यासाठीं दाखविलेली त्यागबुद्धि, आणि भलत्याच साहसांतून त्याला वांचवण्यासाठीं आपलें प्राप्त कर्तव्य— यांच्या जाणीवेनें तुकारामाच्या मनाला उदात्ततेचा उन्माद चढला, आणि कांहींशा वीरश्रीच्या भावनेनें तो गेटावर जाऊन दाखल झाला.

गेटावर त्या वेळीं फौजदारसाहेब होते. जमादाराच्या तोंडून बाळाची जबानी त्यांनीं ऐकली होती; आणि बाळाला कोठडींत कोंडूनहि ठेवलें होतें. पण बाळानें आपण होऊन कबुलीजबाब दिलेला असला तरी स्वतंत्र पुराव्याशिवाय त्याची जबानी प्रमाण कशी मानावी ? अशा कांहींशा विचारांत फौजदारसाहेबांचें मन गुंतलेलें होतें. इतक्यांत तुकाराम तिथें येऊन दाखल झाला.

त्यानें फौजदाराला लवून रामराम केला, आणि मग ताठ होऊन व छाती फुगवून तो फौजदाराला म्हणाला, "साहेब, गेन्याचा खून म्या केलाया ! अन् ही वर्दी मी आपल्या मनानं आपल्याला देतुया."

फौजदार चकित होऊनच त्याच्याकडे पाहूं लागले. "तूं कोण रे ' वाडीचा तुकाराम तुकाराम म्हणतात तो तूं कीं काय ?"

"व्हय, धनी ! मीच त्यो तुकाराम."

"अरे ! तुम्हीं हा काय तमाशा मांडलाय ? आम्हांला वेड लावायचा तुमचा बेत दिसतोय. शिपाई, जमादारसाहेबांना बोलावून आणा; थांब तूं इथं जरा."

जमादाराला विचारतांच त्यानें सांगितलें कीं, 'गेन्याचा खून आपण केला आहे, असा कबुलीजबाब बाळानें दिलेला आहे.' जमादाराच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतांच फौजदार प्रश्नांकित मुद्रेनें तुकारामाकडे पाहूं लागले; आणि मग तुकारामाच्या मनाचे बंधारे फुटून तो म्हणाला, "न्हाअी, न्हाअी; माझ्या भावानं खून केलेला नाहीं. गेन्याचा खून म्यां केलेला हाये. गेन्या माझी टवाळी करत हुता, त्याचा खून मीं केलेला हाय."

फौजदारांनीं फर्मावलें कीं, "तुकारामला एका कोठडींत ठेवून द्या. आतां मात्र पोलिसतपास जारी चालू झाला. पण शिपायांना गुन्हा हुडकून

काढावयास फारसा त्रासहि पडला नाहीं, आणि विशेष अक्कलहि खर्च करावी लागली नाहीं. गेन्या, तळें, तरवडाचा झाडोरा, हातांत कोयता घेतलेला तुकाराम, व गेन्याचा टवाळखोरपणा,–या साऱ्या गोष्टी गांवकऱ्यांच्या परिचयाच्या होत्या ! आणि खून झाला आहे,–तर तो कोणीं केला असला पाहिजे याचें अनुमान कोणालाहि सहज करतां आलें असतें.

होतां होतां गेन्याचें प्रेत अन् मुंडकें तळ्यांत फेकून देतांना तुकारामाला ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें होतें त्यांच्यापर्यंत पोलिस तपास येऊन ठेपला; आणि पोलिसांनीं थोडी जरब देतांच कोंडाई, ग्यानबा, आणि त्याचा पाहुणा या तिघांनींहि सांगून टाकलें कीं, " गेन्यावर कोयता चालवून त्याचें प्रेत आणि मुंडकें तळ्यांत फेकून देतांना आम्हीं तुकारामाला प्रत्यक्ष पाहिलें आहे. " पोलिसांचें काम झालें. गुन्हा सांपडला, आणि तुकारामाच्या मानेला बसणारा फांस सर्वांना चक्क दिसूं लागला.

बाळाच्या जबानीचें कोडेंहि पोलिसांना सहज उलगडतां आलें. नियमाप्रमाणें त्यांनीं बाळाच्या बाबतींतहि चौकशी केली. तेव्हां खुनाच्या वेळीं बाळा तालमीच्या आखाड्यांत होता अशी चक्क जबानी धोंडी आणि सुभाना या त्याच्या पहिलवान मित्रांनीं दिली. अर्थात् केवळ वडील भावाला वांचवावें येवढ्यासाठींच हा कांहीं तरी बोलत आहे हें उमगून, फौजदारांनीं बाळाला जरब दिली, आणि घरीं पिटाळून लावलें; आणि तुकारामवरचा खटला त्यांनीं कोर्टांत रीतसर भरला.

जाबजबान्या, साक्षीपुरावे, वकीलांचीं भाषणें इत्यादि सर्व विधि उरकल्यानंतर कोर्ट खटल्याचें स्वरूप पंचांना समजावून सांगूं लागलें. खटला खुनाचा असल्यामुळें कोर्टाचा दिवाणखाना माणसांनीं गच्च भरून गेला होता. सावित्रीहि कोर्टांत आली होती; आणि तिचा दुःखी-कष्टी देह सावरून धरून तिला बसती ठेवण्याला तिच्या दोन बहिणीहि आल्या होत्या. वेडगळ म्हणून पिटाळून लावलेला बाळा खाचितच वेड-गळ नव्हता. तोहि आपल्या मित्रांना घेऊन तेथें स्फुंदत उभा होता. गेन्या टवाळ असेल, पण त्याच्याहि मायेचीं कांहीं माणसें होतींच; आणि चांगला साक्षीपुरावा देऊन तुकारामानें खून करावा एवढा अपराधी

गेल्या नव्हता हें वकिलांनीं कोर्टापुढें सिद्ध करून दिलें होतें. अर्थात् तुकारामाच्या ललाटीं काय लिहिलें आहे हें जमलेल्या सगळ्या लोकांना कळून चुकलें होतें. कोर्टाचें भाषण सुरू होतांच जिकडेतिकडे चिडीचीप झालें. साक्षीपुराव्याची मांडणी पंचांपुढें उलगडून मांडून शेवटीं कोर्ट म्हणालें कीं, " आतां तुम्ही थोडा वेळ थांबा; खोलींत जाऊन चर्चा करा; आणि तुमचें मत काय होतें तें सांगा. "

दहाच मिनिटांत पंचमंडळी बाहेर आली, आणि त्यांच्या मुखत्यारानें सांगितलें कीं, " सर्वहि पंचांच्या मतें तुकाराम हा दोषी आहे. " त्यांच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच तुकारामाच्या बाजूची मंडळी एकदम हादरून गेली. कोर्ट म्हणालें, " पंचांचा निर्णय मला मान्य आहे. तुकाराम खराच दोषी आहे. " कोर्टाचे हे शब्द म्हणजे आपल्या डोक्यांत कुऱ्हाड पडली असें सावित्रीला आणि बाळाला वाटलें. सावित्री भुईवर कोसळली, आणि गडबड होऊं नये म्हणून पट्टेवाल्यानें त्या बायांकडून तिला दिवाणखान्याच्या बाहेर नेलें. इतक्यांत मुसमुसत असलेला बाळा सपूकन् कोर्टापुढें आला. पट्टेवाले तरतुदीनें पुढें झाले आणि त्यांनीं त्याला अडवून धरलें. तो हात जोडून म्हणाला, " साहेब ! अवो असं कसं म्हनतां ! अवोऽखून म्यां केलाया ! ! ह्ये साक्शीवाले खोटं बोलत्यात. खरंच खून म्यां केलाया ! माझ्या भावानं काय बी केलं न्हाअी ! " बाळानें हे शब्द एवढ्या मोठ्यानें आणि सद्गदित आवाजानें उच्चारले कीं, दिवाणखान्यांतील चट् सारीं माणसें त्याच्याकडे आणि एकमेकांकडे टकमकां पाहूं लागलीं. योग्य त्या पोलिस अधिकाऱ्यांनीं शिपायांना आंत बोलविलें. त्यांनीं बाळाचें गचांडें धरून, ' अवो खून म्या केलाया, म्या केलाया ! " असें तो जोरजोरानें ओरडत असतां, धक्के देत त्याला दाराच्या बाहेर नेलें.

कोर्टानें खड्या आवाजानें मत सांगितलें, " कायद्याप्रमाणं तुकारामाला मी फांशीची शिक्षा फर्मावीत आहें. " इतकें बोलून कोर्ट तट्कन् आंत निघून गेलें. पंच आणि वकील कोर्टानें खुणावल्यावरून त्यांच्या रूमकडे ( खोलीकडे ) गेले. हातकड्या घातलेल्या तुकारामाला पुरते वेढून शिपाई घेऊन गेले. दिवाणखाना रिकामा झाला. पंचक्रोशींतली जमलेली मंडळी गजबज करीत आणि हळहळत आपआपल्या मार्गानें निघून गेली.

मनांत नसूनहि सावित्री अन् बाळा यांना घरीं जाणें प्राप्तच होतें. अखेरीच्या दिवशीं तुकारामाला फांशीं दिल्याचें वर्तमान आलें.

* * *

आतां पूर्वीचा तो जवान बाळा अंगानें सुरकुतला आहे. तो आतां पन्नाशीच्या घराला आलेला आहे. त्याची करडी दाढी बरीच वाढलेली आहे. तो मारुतीच्या देवळांत निजतो; आणि दोन्ही वेळां पुतण्यांनीं वाढून आणलेलें ताट अश्रुढाळ करीत खातो. दिवसभर तो तुकारामाच्या शेतावर राबतो; त्यानें तुकारामाची जिनगानी चांगली सांभाळली आहे. म्हातारी होत चाललेल्या भावजयीला तो आई मानतो. तो जन्मभर सडाच राहिलेला आहे. तुकारामाचें उत्पन्न त्यानें दुपटीनें वाढविलें आहे. गणू, बाबा, शिवराम या तुकारामाच्या मुलांना त्यानें गांवकीची माहिती करून दिलेली आहे, आणि तरवडीचें सारें रान कापून काढून तिघांहि पुतण्यांना पुरेल एवढी जमीन नांगराखालीं आणली आहे. " काका, घरीं चला " असें पुतणे आग्रहानें म्हणाले म्हणजे तुकारामाच्या महाळाच्या दिवशीं बाळा घरीं जातो. गोड घांस खातांना तो त्याच्या तोंडांत दहादां घोटाळतो.

वर्षांमागें वर्षें गेलीं. बंधुप्रेमानें टिकलेली बाळाची कुडी जीर्ण झाली, आणि एके दिवशीं सकाळीं पुतणे देवळांत जाऊन पहातात तों, बाळाला घरघर लागली आहे असें दिसलें. सावित्रीहि आली. सर्वांकडे शून्य नजरेनें त्यानें पाहिलें. वर्तमानपत्राच्या कपट्यावर आलेल्या तुकारामाच्या चित्राकडे पाहून त्यानें हात जोडले, आणि आपल्या नश्वर कलेवराचा नाद सोडून देऊन आपल्या भावाला भेटण्यासाठीं तो कायमचा निघून गेला !

# ११

# नशीब आणि सौंदर्य

पोलिश जातीचीं नवराबायको जिवाला अगदीं कंटाळलीं होतीं. दारिद्र्यानें त्यांना जीव नकोसा केला होता. शेवटीं गांव सोडून जावें, आणि जिकडे पोट भरेल तिकडे हिंडावें, असें ठरवून उगवतीकडे जातां जातां तीं लिथ्होनिया परगण्यांत येऊन ठेपलीं. समुद्रकांठच्या एका खेड्यांत त्यांनीं एक खोपट उभें केलें; आणि आतां गुजारा कसा करावा म्हणून इकडे तिकडे पाहूं लागलीं. शेवटीं नवऱ्यानें मासोळी पकडण्याचा धंदा सुरू केला; आणि बायकोनें गांवांत पडेल तें काम पत्करलें. दिवसाच्या कांठीं एकदां पोटभर जेवायला मिळालें म्हणजे आपण मोठे दैववान् आहों असें तीं मानूं लागलीं.

एक लहानसा पोरगा होता. त्याला तीं जीव कीं प्राण करीत. समुद्राच्या रेताडांत तें पोर इकडे तिकडे भिरभिरत राही. होतां होतां दोन तीन वर्षें गेलीं, आणि त्यांना एक मुलगी झाली. हिचें नांव त्यांनीं मर्था असें ठेवलें. आईच्या शुष्क स्तनांतून मिळेल तें दूध प्यावें आणि समुद्रावरचा खारा वारा तोंडीं लावावा, अशा रीतीनें मर्था वाढूं लागली. असल्या कऱ्या दारिद्र्यांतसुद्धां नवराबायको आणि मुलें आनंदानें रहात होतीं.

दैवाला एवढा आनंदहि बघवला नाहीं ! महामारीची सांथ गांवांत आली, आणि माणसें पटापट मरूं लागलीं. त्यांत मर्थाचे आईबापहि मरण पावले. चार वर्षांची बहीण आणि सहा वर्षांचा भाऊ हीं दोन पोरें उघडीं पडलीं.

पण दैवालाहि पुष्कळदां दया येते. एका शेजाऱ्याच्या मनांत करुणा उत्पन्न झाली, आणि त्यानें त्या मुलाला आपल्या घरीं नेलें. आतां मर्थाचें काय होणार असा प्रश्न पडला. तेव्हां देवळांतला बडव्या म्हणाला, ‘ तुम्ही

पोरला सांभाळतां, तर मी या पोरीला सांभाळतों.' रानावनांत आणि गरीबींत वाढलेली खरी; पण मर्था दिसायला फारच मोहक होती. बडव्याच्या घरीं तिचें लालनपालन चांगलें झालें.

पण दुर्दैव तिच्यामागें हात धुवून लागलें होतें. तो बडव्याच एकाएकीं आजारी पडला आणि त्यानें राम म्हटलें. आतां या पोरीचें काय करावें अशी चिंता बडव्याच्या बायकोला लागून राहिली.

इतक्यांत पलीकडच्या गांवांतील एक उपाध्येबोवा बडवीणबाईच्या समाचाराला आले. समाचाराचा विधि चालू असतां उपाध्येबुवांची दृष्टि मर्थाकडे वळली. कुतूहलानें ते बाईना म्हणाले, 'ही मुलगी कोणाची हो?' ते इतकें म्हणतात तों ती लडिवाळ लहान छोकरी त्यांच्याजवळ गेली आणि त्यांचा पदर धरून त्यांना 'बाबा, बाबा' म्हणूं लागली. उपाध्येबोवा म्हणाले, 'अग पोरी, मी तुझा बाबा कसा असेन?' पण ते असें म्हणाले तरी मर्थेविषयीं त्यांच्या मनांत वात्सल्य उत्पन्न झालें. त्यांनीं तिला पोटाशीं घेतलें, आणि ते बडवीणबाईना म्हणाले, 'आतां तुमच्या या अशा स्थितींत या पोरक्या मुलीला तुम्ही कसें संभाळणार? मीच हिला घेऊन जातों.' हवें होतें तेंच होत आहे असें पाहून बाईनें मोठ्या खुषीनें मर्थेला उपाध्येबोवांच्या पदरांत घातलें. तिकडे मर्थेचा मोठा भाऊ असाच कोठें तरी लोंबत राहिला होता.

खरें म्हटलें म्हणजे, मर्थेच्या दुर्दैवानें हे उपाध्येबोवाहि मरावयास हवे होते! पण तसें झालें नाहीं. त्यांच्या लहान मुलांच्या संगतींत ही गोजिरवाणी अल्लड पोर सुखानें वाढूं लागली. उपाध्यीणबाईहि तिला आपलीच मुलगी मानूं लागल्या. त्यांच्या घरचें चांगलें डगडगीत होतें; अर्थात् समुद्रकांठच्या रेताडांत अर्धपोटीं लहानपणीं फिरत असलेल्या या पोरीला सुखाचे दिवस लागल्यावर ती भराभर सरळत गेली; आणि सुपारीचें रोप जसें तजेलदार दिसतें तशी ही मुलगी दिसूं लागली.

मर्थेचे नाकडोळे अगदीं जेथल्या तेथें होते. नाक चांगलें घरघरीत असून, कपाळाची पट्टी उंच, आणि हनुवटी भरीव व थोडीशी चिंचोळी होती. एखाद्या वेळीं ती कोणीकडे तरी रोखानें पाहूं लागली म्हणजे

तिचें कुतूहल दोन्ही डोळ्यांच्या भिंगांतून तीव्र किरणांनीं बाहेर पडत आहे असें वाटे.

उपाध्येबुवांना मर्थेहून थोडासा मोठा असा एक मुलगा होता. सौंदर्याचें आवाहन मुलांच्या मनाला लहानपणींसुद्धां पोहोंचतें. थोडासा गावंढा दिसणारा हा पोरगा मर्थेच्या तोंडाकडे टकमक पहात उभा राही; मर्था यौवनांत येऊं लागली; सुंदर, पराक्रमी, वैभवशाली असें जग तर तिनें अजून पाहिलेलें नव्हतें; अर्थात् तिलाहि बुवांच्या या बटूचा लोभ जडला. उपाध्यीणबाईच्या हें ध्यानांत आलें; आणि त्या मनांत म्हणाल्या, "हा प्रकार कांहीं चांगला नाहीं; आपली भिक्षुकाची जात; ही पोरगी आपल्याला पचायची नाहीं. ही चांगली पणांत आली म्हणजे माझ्या पोराकडे पाहून तिरस्कारानें हसूं लागेल." मग तिनें एक निराळाच इलाज योजला.

पलीकडच्या लष्करी ठाण्यावर त्यांच्या ओळखीचा एक नवजवान होता. तो चांगला उंच, सकस आणि पाणीदार दिसे. कांहीं तरी निमित्त काढून बाईनीं त्याला आपल्या घरीं बोलावलें. हेतु हा कीं, मर्थेचें मन आपल्या मुलावरून उठून या तरुण सैनिकावर बसावें. हा सैनिकहि एक–दोनदां आला गेला. आणि बाईचा डाव यशस्वी झाला.

त्यालाहि ती कोवळी किरळी आणि मोहक मुलगी भारीच आवडूं लागली. उपाध्येबोवांचें पोर मागें पडून मर्था आणि हा तरुण सैनिक यांचें लवकरच शुभमंगल झालें. नवरदेवांची स्वारी बहोत खुषींत होती; आणि त्यांची ती सैनिकांची ऐट, आणि चेहेरेपट्टीचा तो रुबाब पाहून मर्था तर हरकून गेली होती. मधुमास सुरू झाला; आणि हीं तरुण पति–पत्नी आनंदांत डुंबत राहिलीं.

पण मर्थेचें दुर्दैव आजूबाजूला कोठें तरी अंधारांत, तिच्यावर झडप केव्हां घालतां येईल म्हणून पाळत ठेवून, हिंडत होतें. मधुमासाचे सात दिवस लोटतात न लोटतात, तों या नवरदेवाला वरून हुकूम आला कीं, 'युद्धाचें शिंग वाजलें आहे, तुम्ही ताबडतोब शिबिरांत दाखल व्हा!'

मधुमासाचा लताकुंज एकदमच वाळून गेला; आणि डगला-पट्टा घालून, बायकोकडे बघत बघत, शिपाईबोवा लष्करांत निघून गेले. मर्था तर अगदीं हैराण होऊन गेली; आणि त्याच्या मागें जावें असें तिला वाटूं लागलें. शेवटीं उपाध्येबोवा तिला म्हणाले, "पोरी, तूं कुठें जाणार? आणि तुला शिबिरांत कोण येऊं देणार? तूं आमच्या घरीं लहानाची मोठी झालीस, तशी आणखी कांहीं दिवस रहा. लढाई संपेल; नवरा परत येईल; मग तूं त्याच्याबरोबर जा." नाइलाज होऊन मर्था उपाध्येबोवांच्या घरींच राहिली.

मर्थेचें यौवन प्रफुल्लित होत चाललें होतें; आणि लढाई तर संपेल असें दिसेना. रशियन लोकांनीं लिव्होनिया प्रान्तावर स्वारी केली, आणि मर्थेचा मानीव पिता जो उपाध्येबुवा त्याच्या गांवाला त्यांनीं वेढा दिला. गांवाचें कुसूं चांगलें बळकट होतें. परंतु वेशीवरचे पहारेकरी असावे तेवढे शूर आणि विश्वासू नव्हते. वेढा घालणारांनीं थोडासा जोर करतांच हे वेशीवरचे लोक कच खाऊं लागले; आणि गांवकऱ्यांना दिसूं लागलें कीं, जर का प्रत्यक्ष लढाई होऊं दिली तर रशियन फौजा या पहारेवाल्यांना सफा कापून काढतील, आणि गांवांत शिरून लुटालूट करूं लागतील. म्हणून सारे गांवकरी एकत्र जमले; आणि त्यांनीं उपाध्येबोवांच्या बरोबर रशियन सेनापतीकडे शरणागतीचा निरोप धाडला. उपाध्येबोवा आपले सगळे 'खटले' घेऊन रशियन सेनापतीकडे गेले, आणि त्यांच्या हातापाया पडून त्यांनीं सांगितलें कीं, 'आम्ही शरण आलों आहों, आमचा गांव तुम्ही ताब्यांत घ्या. पण कुणालाहि कसलाहि उपद्रव देऊं नका.' उपाध्येबोवांची गयावया पाहून रशियन सेनापति अगदीं विरघळला; आणि म्हणाला, 'आम्ही गांव ताब्यांत घेतों; पण तुमच्या केसालाहि धक्का लावणार नाहीं.' पण हें आश्वासन देत असतांना सेनापतीची नजर बुवांच्या खटल्यांतील माणसांवर खिळलेली होती. त्यांतल्या त्यांत मर्थाकडे पाहून तर सेनापतीसाहेब थोडेंसे कावरेबावरे झाल्यासारखे दिसले.

तहनाम्याचें बोलणें संपलें, आणि उपाध्येबोवा आपल्या लवाजम्यासह घरीं परत आले. बोवांनीं आपलें काम फत्ते केलेलें पाहून गांवकऱ्यांचा

जीव भांड्यांत पडला. रशियन शिबंदी गांवाच्या कोतवालींत शिरली; पण तिनें कोणाला उपद्रव मात्र दिला नाहीं.

इतक्यांत मूळच्या पहारेकऱ्यांपैकीं कोणाला अवदसा आठवली म्हणून म्हणा, किंवा त्यांच्या हातून चूक झाली म्हणून म्हणा, कोतवालीला आग लागली; आणि त्या भडाग्नींत अनेक रशियन शिपाई जळून मेले. रशियन सेनापतीचा क्रोध अनावर झाला; सगळा गांव लुटून व भाजून काढावयाचा हुकूम त्यानें दिला. कैक माणसें त्यानें धरूनहि नेलीं. पण धरपकडीच्या या घाईत सेनापतीनें आपल्या शिपायांना आज्ञा केली कीं, बोवांच्या घरची ती नाकेली पोरगी आमच्या गोटावर आणून सादर करावी. शिपायांनीं तिला धरून नेलें, आणि उपाध्येबोवांच्या मंडळींची व तिची कायमची ताटातूट झाली.

सेनापतीची खोटी नजर मर्थेवर होती खरी; पण हें रत्न त्याला पचण्यासारखें नव्हतें. तिच्या सौंदर्याची कीर्ति वरिष्ठ सेनापति बॉर यांच्या कानीं गेली; आणि 'लुटींतलीं असलीं माणसें स्वतःपाशीं ठेवून घेण्याचा अधिकार तुम्हांला मुळींच पोंचत नाहीं; म्हणून त्या मुलीला आमच्या शिबिरांत पाठवून द्या!' अशी जरबीची आज्ञा त्यानें दिली. नाक मुठींत धरून सेनापतीनें हें स्त्रीरत्न बॉरच्या शिबिरांत पाठवून दिलें. ही दंगल चालू असतां, लढाईवर गेलेला आपला नवरा एका वेढ्यांत गोळी लागून पडला असें वर्तमान मर्थेला कळलें; आणि दैवाचा खेळ आतां कोणीकडे झुकत जाणार आहे हें ती अधीर मनानें पाहूं लागली.

लुटींतलें हें माणिक घेऊन सरसेनापति बॉर मॉस्को नगरीला आला; आणि त्यानें आपल्या घरगुती सेवकवर्गांत मर्थेची नेमणूक करून टाकली. त्याचा हिशेब असा होता कीं, मर्था ही एकदां खाजगी जिंदगी झाली म्हणजे राजरोसपणें तिला आपल्या अंतःपुरांत घालावयास कांहींच हरकत पडणार नाहीं.

पण 'चोरावर मोर' सगळीकडेच सांपडतात! रशियांत प्रिन्स अमका, प्रिन्स तमका असे राजघराण्यांतले श्रीमंत आणि शूर पुरुष पूर्वी पुष्कळ असत. प्रिन्स मेन्ट्‌चिकोफ् हा यांपैकींच एक होता. बॉरच्या घरीं एकदां कसलीशी मेजवानी होती; मेजवानीला हा प्रिन्स आलेला होता.

वाढायला वगैरे आलेल्या सेवकवर्गात मर्था ही इकडे तिकडे मलपत होती. सेनापति तो सेनापति, आणि प्रिन्स तो प्रिन्स ! मेन्ट्रॅचिकोफ् यानें बॉरला आज्ञापत्र लिहिलें कीं, 'मर्था हिची योजना आम्ही आमच्या सेवकवर्गात केली आहे. तर तिला आमच्या राजवाड्यावर पाठवून द्यावी.' नाहीं म्हणण्याची बॉरची छाती होईना. एक-दोन दिवसांतच मर्थेची रवानगी प्रिन्स मेन्ट्रॅचिकोफ् याच्या राजवाड्यांत झाली.

नवरा मेल्यामुळें आणि उपाध्येबोवांची प्रेमाची पाखर मागेंच संपलेली असल्यामुळें मर्थेचे सारेच पाश तुटल्यासारखे झाले होते; आणि टक्के खात खात आपण कोणीकडे चाललों आहों हें तर तिच्या ध्यानांतच येईना. पण मर्था अतिशय धूर्त, प्रसंगावधानी, आणि शहाणी स्त्री होती. हे सारे लोक आपल्या सौंदर्याला भाळलेले आहेत, आणि म्हणून लुटीच्या नांवाखालीं आपल्या बदल्या होत आहेत हें ती केव्हांच उमगली होती. मग आल्या प्रसंगाचा उपयोग कां न करून घ्यावा, असें तिनें मनाशीं ठरविलें.

प्रिन्स आपल्याशीं कोणतें नातें ठेवणार हें तिला निराळें कोणी सांगावयास हवें होतें असें नाहीं. आणि त्या प्रिन्सच्या आढ्याखालून निघून जाणें हें तर सर्वथा अशक्य होतें. शेवटीं जमवून घेण्याची तिची प्रवृत्ति बळावत गेली; आणि मेन्ट्रॅचिकोफ् याच्या राजवाड्यांत ती मोठ्या तोलदारीनें आणि अधिकारानें वागूं लागली. मात्र तिला पुन्हां पुन्हां शंका येई कीं, साध्या सेनापतीकडून सर-सेनापतीकडे, सर-सेनापतीकडून प्रिन्स मेन्ट्रॅचिकोफ्कडे असा आपला होत असलेला हा चढता प्रवास बहुधा येथेंच थांबावयाचा नाहीं. आणि तिचा हा अंदेशा लवकरच खरा ठरला.

प्रिन्स अमूक, प्रिन्स तमूक असे अनेक राजपुरुष राजधानींत असले तरी सर्वांच्या वर पीटर दि ग्रेट हा अखिल रशियाचा तेव्हांचा झार होताच; आणि हे सारे एकाच माळेचे मणी होते. बड्या लोकांत तरी नीतीचें मान इतपतच बेताचें असतें हें मर्थेला कळून चुकलेलें होतें. पण तिला वाटलें होतें त्याहिपेक्षां लवकर पुढला झोका तिला मिळाला.

प्रिन्स मेन्ट्रचिकोफ् याच्याकडे एकदां झार साहेबांची स्वारी मेजवानीला आली. आपल्या घरचें सारें वैभव झारला दाखवावें म्हणून मेन्ट्रचिकोफ्नें पुष्कळच थाटमाट केलेला होता. मेजवानीचें मंदिर सुंदर शृंगारलेलें होतें. आणि वाढा–करायला अर्थातच खुबसूरत माणसें मुद्दामच ठेवलेलीं होतीं. या सर्व रूपसुंदर माणसांत मर्था सर्वांच्या वर झळकत होती. झार महाराज पंक्तींत येऊन बसले, आणि चमच्या-कांट्यांचा कणकणाट ऐकूं येऊं लागला. पण झार साहेबांचें लक्ष खाद्यपेय पदार्थांपेक्षां एका दृश्य पदार्थाकडेच जास्त लागलें. मर्था या वेळीं सुमारें बावीस एक वर्षांची असावी. तिची अंगकान्ति आणि तिची रूपसंपदा अशा भरांत आलेली होती कीं तिच्याकडे पहातांच माणसानें वेडेंच होऊन जावें. पंक्तींत वेडें होऊन जाण्याचा हक्क फक्त झार साहेबांचा होता ! त्याच्या हालचालींतील चलबिचल सर्वांच्याच ध्यानीं आली; आणि आपलें पुढचें भवितव्य काय याची निरगांठ मर्थेच्या मनांत बसली.

वेडाच्या उन्मादांत झारनें मेन्ट्रचिकॉफला सांगितलें कीं, ‘ हें स्त्रीरत्न तुम्ही आम्हांला नजर करावें. ’ सेनापति, सर-सेनापति, प्रिन्स मेन्ट्रचिकोफ् हे सारे चिणचिण करीत खालीं बसले; आणि सौंदर्याच्या हिंदोळ्यावर बसलेली मर्था झारच्या अंतःपुरांत जाऊन बसली. समुद्राच्या रेताडावर एका भिकारी शेतकऱ्याच्या घरीं जन्माला आलेली ही मुलगी नशिबाचे हेलकावे बसत बसत झारच्या अंतःपुरापर्यंत जाऊन पोहोंचली.

पण मर्था ही मोठी मानी स्त्री होती. तिच्या अंगीं शहाणपण होतें, कसब होतें. तिच्या बोलण्यांत विशेष प्रकारचें हुन्नर होतें; आणि मिळालेल्या प्रसंगाचा उपयोग कसा करून घ्यावा हें कळण्याची चतुराई तिच्या अंगीं होती. सर्वांच्या वर म्हणजे ती स्वाभिमानी बाई होती. झारच्या सुखोपभोगाची एक सोय, हें नातें तिला अत्यंत अवमानाचें वाटूं लागलें. तिनें राजवाड्यांत आणि दरबारांत आपली पत आणि जरब इतकी वाढविली कीं, या बाईला तिचें योग्य तें पद दिलेंच पाहिजे, असें झारला हळूहळू वाटूं लागलें.

पीटर हा मोठा शूर आणि बलदंड मनुष्य होता. रानटी लोकांचा रशिया देश त्यानें संस्कृतीच्या अंगणांत आणून सोडलेला होता. पण

पीटर भारीच लहरी, हेकेखोर, आणि तुफानी स्वभावाचा माणूस होता. एकदां भडकला म्हणजे त्याच्यापुढें जाण्याची कोणाची मात्रा नसे. प्रसंगीं तो कोणाला ठारसुद्धां मारीत असे. पण असल्या या कर्दनकाळ माणसाला-सुद्धां मर्थेनें हळूहळू वठणीवर आणलें.

आपण या बादशहाची राणी होणार, अशा निश्चयानेंच ती आतां कामाला लागली. पीटरच्या लहरी आणि तामसी स्वभावामुळें राज-वाड्यांतील आणि राजसभेंतील कामें जुळून येत नसत, आणि जुळलेलीं विसकटत असत. मर्था हिनें आपल्या मनमिळाऊपणानें आणि योजना-चातुर्यानें प्रत्येक गोष्टीचा बनाव बादशहालासुद्धां आनंदकर वाटेल अशाच रीतीनें घडवून आणण्याची शिकस्त केली. विसकटलेल्या घड्या तिनें पुन्हां चापूनचोपून बसवल्या; आणि राजवाड्यांतील सेवकवर्ग व दरबारांतील मानकरी मंडळी या दोघांचीहि प्रीति संपादन केली. मर्थेच्या अलौकिक सौंदर्यावर पीटर कायमचाच लुब्ध झालेला होता. आणि पीटरचें तें सैनिकी बाण्याचें रुबाबदार रूप पाहून मर्थाहि त्याच्या-वर तितकीच लुब्ध झाली होती. सर्वच लोकांनीं त्यांच्या स्वभावांतील ही गोम ओळखलेली असल्यामुळें, कामें करून घ्यावयाचीं म्हणजे बादशहा-पेक्षां मर्थाबाईकडेच जाणें जास्त बरोबर, असें सर्वांनाच वाटूं लागलें. जों जों दायित्व वाढूं लागलें तों तों मर्थेचीं सर्व सामर्थ्यें जोरानें विकसित होऊं लागलीं; आणि पीटर जरी सिंहासनावरचा बादशहा असला तरी त्या सिंहासनाच्या मागें उभी असलेली प्रभावी शक्ति म्हणजे मर्था होय, हें सर्वांना कळून चुकलें.

राजवाड्याचा आणि दरबाराचा पुरता आटोप केल्यावर ती पीटर-बरोबर रणांगणावरसुद्धां जाऊं लागली. तिला नको म्हणणें बादशहाच्या जिवावर येऊं लागलें. आणि नवलाची गोष्ट ही कीं, जशी राजवाड्यांत आणि दरबारांत, तशी रणावरील हालचालींतहि तिची चतुराई बादशहाला दिसूं लागली. एकदां तर एका मोठ्याच प्रसंगांतून तिनें बादशहाला शिरसलामत बाहेर काढलें.

१७७१ त तुर्क लोकांशीं युद्ध सुरू झालें. रणांगणावरच्या हालचाली अशाच होत गेल्या कीं पीटरची फौज तुर्कांच्या वेढ्यांत सांपडल्यासारखी

झाली. पीटर रणशूर खरा; पण रणावरची हवाहि पुष्कळदां बिघडते; आणि सर्व कांहीं ठीक चाललें आहे असें वाटतां वाटतां योद्धा पेंचांत सांपडतो. पीटरचीं सैन्यें तुर्कांच्या वेढ्यांत सांपडलीं. पण पीटर म्हणूं लागला कीं, रात्र पडतांच निकराचें झुंज करून, शत्रूची फळी फोडून मी वेढ्यांतून बाहेर पडेन. हाताखालच्या सेनापतींना चक्क दिसत होतें कीं यांतलें कांहींहि साधण्यासारखें नाहीं. शत्रूंचा वेढा गच्च आणि बळकट बसलेला होता, आणि त्या मानानें पीटरच्या जवळची फौज तर फार थोडी होती. पण पीटरला हें सांगावें कोणीं, असा प्रश्न पडला !

मर्थेनें हें काम अंगावर घेतलें. तिनें सर्वांना शान्त रहावयास सांगितलें; आणि आपण थोडें धिमेपणानें वागलें पाहिजे, असें बादशहालाहि समजावलें. 'तुला काय करायचें आहे तें कर' असें म्हणून, खिन्न होऊन बादशहा दार दपटून पलंगावर जाऊन पडला; आणि आंत कोणी आलें तर ठार मारीन, अशी धमकावणीहि त्यानें देऊन ठेवली.

प्रसंगाकडे लक्ष देऊन, मर्थेनें एक निराळाच इलाज योजला. तुर्की सेनापतींचें एक वैगुण्य तिला माहीत झालें होतें. त्यांना पैशाचा लोभ फार असे. थोडा वेळ युद्धाची तहकुबी करून घेऊन, तिनें आपल्या वकिलाबरोबर तुर्की सेनापतीला निरोप धाडला, आणि पैशाची मोठीच लालूच दाखविली. सेनापतीनें देशाभिमान वाऱ्यावर सोडला ! आणि स्वतःला पैसा मिळत असेल तर घेढा उठवण्याचें मान्य केलें. रणांगणावरचा रंग एकदम पालटला. मर्थेनें तहनामा लिहून काढला, सेनापतीची सही घेतली, आणि कागद हातांत घेऊन तिनें पीटरच्या दारावर ठोठावलें.

'कोण आहे ?' म्हणून पीटरनें जोरानें डरकाळी फोडली. हिनें पुनः ठोठावलें. आणि दार उघडतांच—तें आपल्या प्रीतीचें आणि मांगल्याचें सुस्वरूप ध्यान आंत येतांना पाहून पीटरचें सगळें अवसान गळालें. आणि मर्थेनें केलेल्या तहनाम्यावर त्यानें सही केली. दोन्ही बाजूंच्या फौजा अब्रूनें दूर सरल्या; आणि एक मोठा बिकट प्रसंग मर्थेनें निभावून नेला. याच तहाला प्रूथ येथील तहनामा असें म्हणतात. सर्व रशियाभर मर्थेच्या नांवाचा जयजयकार झाला, आणि रशियन राष्ट्राची पणाला

लागलेली फत्त या बाईनें बांचवली असें युरोपांतील सर्वच लोक म्हणूं लागले.

या गोष्टीचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. अशा थोर स्त्रीला राज्ञीपणाचा मान दिला पाहिजे असें बादशहाला वाटूं लागलें; आणि १७११ त त्यानें तिचें पाणिग्रहण केलें. पुढल्या वर्षी सेंट पीटर्सबर्ग येथें मोठा भव्य समारंभ झाला. देशोदेशींचे राजेरजवाडे, सेनापति, शास्त्री–पंडित पीटरनें आपल्या राजधानींत बोलावले, आणि सर्व प्रजांच्या जयजयकारांत मर्थेला आपल्या शेजारीं सिंहासनावर बसवून तिला राज्ञीपणाचा अभिषेक केला. मर्था आतां सर्व रशियाची राज्ञी म्हणजे झारीना झाली. पीटरनें तिचें नांव कॅथरिन असें ठेवलें. अशा रीतीनें, जुनेरें नेसलेली मर्था नाहींशी झाली, आणि भरजरी पैठणी नेसलेली कॅथरिन जगापुढें उभी राहिली. पण या नवलकथेचें एक बहारीचें अंग अजून आपल्याला कळावयाचेंच आहे.

एकदां असें झालें कीं, पोलंडच्या राजाचा वकील पीटरच्या दरबारांत जाण्यासाठीं म्हणून निघाला. कूरलँड नांवाच्या परगण्यांतून जात असतांना सडकेकांठच्या एका खाणावळींत तो थोडा वेळ उतरला. खाणावळींत थोडे धुंद झालेले कांहीं शेतकरी बसलेले होते. त्यांचें आणि एका पोलिश शेतकऱ्याचें भांडण सुरू होतें. हा शेतकरी चांगलाच धुंद झालेला होता. शब्दाशब्दी बराच वेळ चालली होती; शेवटीं ते गुद्दागुद्दीवर आले. तेव्हां तो पोलिश शेतकरी बाकीच्यांना म्हणाला, “ मला एकट्याला बघून तुम्ही मला मारतां आहां; पण माझीं नात्याचीं माणसें अशीं आहेत कीं त्यांना जर मीं हें कळविलें तर, भिकारड्या लोकांनो, तुमचीं शरीरें धडापासून एकदम वेगळीं होतील ! ” कूरलँडमधील ते शेतकरी तिरस्कारानें हसूं लागले. ते म्हणाले, ‘ तुझी असली बढाई आम्हीं अनेकदां ऐकली आहे. तुझीं नात्याचीं बडीं माणसें कोण,–त्यांना एकदां घेऊन तर ये ! ’ खाणावळींत उतरलेला वकील त्यांच्याकडे लक्षपूर्वक पहात होता. त्या पोलिश शेतकऱ्याकडे पाहतां पाहतां त्याच्या डोक्यांत कांहीं निराळीच कल्पना आली.

या वकिलानें कॅथरिन राणीला पुष्कळदां पाहिलेलें होतें. त्यानें त्या पोलिश शेतकऱ्याकडे पुन्हां पुन्हां पाहिलें, आणि तो मनांत म्हणाला, ‘ काय नवल आहे पहा ! हा तरुण शेतकरी हुबेहुब झारीनासारखा दिसतो ! ’

पण हें साम्य केवळ करमणुकीपुरतें त्यांच्या उपयोगी पडलें असें नाहीं. झारीना हिला एक भाऊ आहे अशी गुणगुण रशियांत सर्वत्र चालू होती; आणि झारीनानेंहि त्याची पूसतपास केलेली होती. पण अजूनहि त्याचा पत्ता लागलेला नव्हता. त्या पोलिश शेतकऱ्याचें राणीशीं असलेलें साम्य या वकिलाच्या मनांत इतकें भरलें कीं, राजधानींतील आपल्या एका मित्राला त्यानें ही गोष्ट लिहून कळविली. त्या मित्रानें हें पत्र एका बड्या माणसाला दाखवलें;—असें होत होत तें पीटरच्या हातीं जाऊन पडलें.

पीटर नेहमींच भारी उतावीळ असे. आतां तर त्याला अशा पत्राचाहि चांगला आधार होता. त्यानें रिगा प्रान्ताच्या गव्हर्नरला ताबडतोब लिहून कळवलें कीं, 'चार्लस शारोन्स्की या नांवाचा एक पोलिश शेतकरी कुरलँड परगण्यांत कोठें तरी सांपडण्याचा संभव आहे. वाटल्यास त्याच्यावर कसलेंहि वारंट घ्या, आणि त्याला धरून आणून आमच्याकडे पाठवून द्या.' बादशहाचें आज्ञापत्र हातीं पडतांच गव्हर्नरनें आपलीं माणसें कुरलँडमध्यें पिटाळलीं. हा पोलिश शेतकरी आतां एक निराळाच धंदा करीत होता. एका भटारखान्याचीं तावदानें बसवण्याच्या कामांत तो गुंतला होता; तोंच सरकारचे शिपाई तेथें आले, आणि चार्लस शारोन्स्की तो हाच, एवढी खात्री होतांच त्यांनीं त्याला बेड्या ठोकल्या, आणि रिगाला पाठवून दिलें. आपण काय केलें आहे, आणि आपल्याला रिगाला कां पाठवीत आहेत, हें शारोन्स्कीला मुळींच कळेना ! नशिबाला दोष देत तो रिगाला पोहोंचला. गव्हर्नरनें ताबडतोब त्याला दुसऱ्या एका तुकडीच्या हवालीं केलें; आणि झारच्या राजधानीला पाठवून दिलें. आपल्याला बेड्या ठोकल्या आहेत तरी शिपाई लोक आपल्याशीं फार ममतेनें वागत आहेत, आणि आपल्याला फार चांगलें खाऊंपिऊं घालीत आहेत हें पाहून शारोन्स्कीला नवल वाटलें. विशेष म्हणजे रिगाहून निघतांना शिपायांनीं त्याच्या हातकड्या काढून घेतल्या.

राजधानीला पोहोंचतांच, त्याला राजवाड्यावर नेण्यांत आलें. आणि बादशहाच्या खासगी कारभाऱ्याच्या हवालीं त्याला करून राजाचे शिपाई परतले. कारभाऱ्याचें काम हें होतें कीं, आपण कोण हें त्याच्याकडून

बदवावें. शारोन्स्की अगदीं भांबावल्यासारखा झाला होता. बेड्या कां घातल्या आणि कां काढल्या हेंहि त्याला कळलें नव्हतें. आणि राजवाड्यांतील एका दिवाणखान्यांत आपल्याला कां आणून बसवलें आहे, आणि शेजारीं खुर्ची टाकून कारभारीसाहेब कां बोलत आहेत, हेंहि त्याच्या ध्यानांत येईना. त्याचा संशय बळावत चालला, आणि आपला पूर्वीचा इतिहास सांगावयास तो कांकूं करूं लागला. कारभाऱ्याच्या एका गुप्तचरानें त्याला बरेंच मद्य दिलें; आणि मग शारोन्स्कीचा संकोच व शंका नाहींशी झाली आपण कोण कुठले हें त्यानें भडाभड सांगून टाकलें. आपल्याला एक बहीण होती, पण तिची आणि आपली ताटातूट लहानपणींच झाली; आणि तिचें पुढें काय झालें हें आपल्याला माहीत नाहीं असेंहि तो म्हणाला. पण ताटातूट होईपर्यंतच्या बाळपणच्या आपल्या बहिणीच्या त्यानें सांगितलेल्या खुणा अगदीं निश्चित स्वरूपाच्या होत्या. 'प्रिन्स मेन्ट्राचिकॉफ हा माझ्या बहिणीला घेऊन गेला एवढें मीं ऐकलें आहे.' या त्याच्या वचनानें तर सगळ्या गोष्टींचा निकाल झाला. खासगी कारभाऱ्यानें सारी माहिती झारला जाऊन सांगितली.

मग एके दिवशीं, आधीं वर्दी न देतां झार खासगी कारभाऱ्याकडे जेवायला आला. जेवण झाल्यावर कारभाऱ्यानें शारोन्स्कीला बादशहापुढें आणलें. त्यानें त्याला अनेक बारीकसारीक प्रश्न विचारले. आणि त्याची खात्री होऊन चुकली कीं, आपल्या राणीचा नाहींसा झालेला भाऊ तो हाच असला पाहिजे. मग तो मुद्दामच त्याला दरडावून म्हणाला, 'रिगाचे गव्हर्नर सांगतात कीं, तूं फार मोठा गुन्हा केला आहेस. अर्थात् योग्य तो न्याय आम्हाला केला पाहिजे. उद्यां मी पुन्हा येथें येणार आहे. कारभारी, या माणसाला उद्यां हजर ठेवा!' इतकें बोलून पीटर झटकन निघून गेला.

दुसरे दिवशीं त्याच वेळीं, राणीला बरोबर घेऊन पीटर कारभाऱ्याच्या घरीं आला. राजाराणी आसनस्थ झाल्यावर कारभाऱ्यानें शारोन्स्कीला त्यांच्यापुढें आणलें. अंगांत एक कातड्याचें डगलें घातलेला, आणि दीनवाणा दिसत असलेला तो गांवढा माणूस राजाराणीपुढें उभा राहिला.

काय बोलावें अन् काय करावें हेंच त्याला कळेना. आदल्या दिवसाचे सारे प्रश्न पीटरनें त्याला मुद्दामच विचारले. तो उत्तरें देऊं लागला. तों राणीच्या मनांत मोठी चलबिचल सुरू झाली. तिनें त्याच्याकडे न्याहाळून पाहिलें. लहानपणचें त्याचें रूप आठवून आणि बंधुप्रेमाचा उमाळा येऊन राणी विव्हल झाल्यासारखी दिसली.

पीटर म्हणाला,

'राणीसाहेब, हा पोलिश गावंढा कोण असावा बरें ?'

'मी आतां काय सांगूं ?—काय सांगूं ?'

झारनेंच निकाल केला. तो शारोन्स्कीला म्हणाला,

'बाबा, ही राणी तुझी बहीण आहे ! !'

मग डोळ्यांतून अश्रुधारा वहात असलेल्या आपल्या बहिणीला शारोन्स्की कडकडून भेटला. राणीला आनंदातिशयानें मूर्च्छा आली. शुद्धीवर येतांच तिनें भावाला जवळ घेतलें; बाळपणच्या दारिद्र्याच्या कथा,—आणि आईबापांच्या आठवणी एकमेकांना सांगून तीं दोघें ढसढसां रडूं लागलीं. कृतान्तासारखा क्रूर पीटर, पण तोहि हा देखावा पाहून रडूं लागला.

मग त्यांनीं शारोन्स्कीला कारभाऱ्याच्या हवालीं केलें. त्यांनीं त्याच्या अंगावरचीं रकटीं फेकून दिलीं. त्याचे केस कापविले. त्याच्या अंगावर मूल्यवान् वस्त्रें घातलीं. बहिणीसारखाच तो अतिशय देखणा होता. थोड्याच दिवसांत राजशालक म्हणून तो राजवाड्यांत झळकूं लागला. पीटर बायकोला म्हणाला, "याच्या अंगांत कांहीं गुण असले तर याला मी थोर पदाला चढवीन. पण सारेच गुण तुझ्या वांट्याला गेले असले तरी याला मी जन्मभर सुखी ठेवीन." एका संपन्न सरदारानें आपली मुलगी शारोन्स्कीला दिली. आणि पीटरच्या दरबारांत तो मानकरी म्हणून राहूं लागला.

समुद्राकांठच्या रेताडांत आणि गरीबींत इकडे तिकडे भिरभिरणारीं हीं दोन पोरें, नशिबाचे प्रचंड हेलकावे मिळून झारच्या राजघराण्याचीं आधारस्तंभ बनलीं !

# १२

# विधवेची माणुसकी

तिला सगळे लोक ' यमी ' म्हणत असत. ती चांगली तीस-पसतीस वर्षांची असेल; पण आम्ही लहान पोरेंसुद्धां तिला 'यमी'च म्हणत असू. यमीचें नांव निघालें म्हणजे मोठीं माणसें डोळे मिचकावीत असत. आम्हांला त्याचा अर्थ कळत नसे; पण यांत कांहीं तरी गोम आहे असा एक बारीक संशय आम्हांला त्या वयांतहि येई. ती आतां असती तर मी तिला 'यमुताई' म्हटलें असतें; आणि तिच्यासंबंधानें मी अत्यंत आदरानें बोललों असतों. त्या दुर्दैवी स्त्रीचा पक्ष घेऊन बोलण्याचें माझें तेव्हां वय नव्हतें. ' यमी ' विधवा होती;–बालविधवा होती. संस्कृतीचा अतिरेक करून माणसें माणुसकीला पारखीं केव्हांपासून तरी झालेलीं होतीं;आणि म्हणूनच या बालविधवेचें वपनहि झालेलें होतें. 'यमी' तांबडें अलवण नेसे. यमीची त्वचाहि तांबडी झाली होती. पण यमी विधवा होती,–आणि बालविधवा होती. माणसें पिढ्यान् पिढ्या माणुसकीला पारखीं झालेलीं होती. त्यांनीं तिला विद्रूप बनविलें होतें. विद्रूप बनविण्यानें लोकांचें लक्ष विधवा स्त्रियांकडे जात नाही असा एक समज होता; आणि ही विद्रूपता संन्यासाच्या पोटीं येत असे. बालविधवांना संन्यास देत असत; पण तेवढ्यानें त्यांच्याकडे लोकांचें पापी लक्ष जात नसे हें मात्र खरें नाहीं. नाहीं तर यमीविषयीं माणसें चावटपणानें कां बोललीं असतीं ? म्हणजे स्त्रियांच्या पदरीं विद्रूपता तर पडायचीच; अन् वरती लोकांची कुचाळकी चालूच रहायची.

विधवा असणें आणि त्यांत सुस्वरूप असणें हें खेडेगांवांत मोठें संकटच असे. अलीकडे खेडीं–गांवें पुष्कळच सुधारलीं आहेत व संभावित झालीं आहेत असें सांगतात; पण पूर्वी खेडेगांवांतील लोक फार कुत्सित असत. ते स्त्रियांची व त्यांतहि बिनवारशी दिसणाऱ्या व विधवा स्त्रियांची फारच कुचाळी करीत. यमीला या पद्धतीनें छळणारे पुष्कळ लोक होते. मोठ्या

माणसांत चालू असलेली ही क्षुद्र निंदा पाझरत पाझरत मुलाबाळांच्यांत येऊन पोंचत असे; आणि यमी म्हणजे एक उपहासाचा, तिरस्काराचा एक विषय बनून राहिली होती.

यमीला दुसरें कोणी नव्हतें. बहीण, भाऊ, सासरा, नणंद, दीर, जाऊ-कोणी असतें तर बरें झालें असतें. पण दुर्दैव तिच्यामागें हात धुवून लागलें होतें. यमी अकरा बारा वर्षांची असतांनाच तिचा नवरा वारला. तो कशानें वारला हें माहीत नाहीं. पुढें प्लेगचा अवतार होऊन यमीच्या घरांतील सर्व माणसें उंदराप्रमाणें पटापट मरण पावलीं. पण यमीच्या अंगाला हात लावण्याची प्लेगचीहि प्राज्ञा झाली नाहीं ! यमीचें खोटें नशीब येवढें प्रबळ कीं तिला घेऊन जाणें असल्या अघोरी सांथीलासुद्धां साधलें नाहीं. ज्यांचा जगाला कांहीं उपयोग होता, आणि जगाचा ज्यांना कांहीं होता तीं घरांतील सारीं माणसें पटापट मरून गेलीं; आणि जिला जगाचा कांही उपयोग नव्हता, आणि जिचा उपयोग जगाला नव्हता ती मात्र शाबूत राहिली ! पण तिचा उपयोग जगाला थोडाबहुत होता असें म्हटलें पाहिजे. माणसांच्या मस्करीला, चावटपणाला, अवहेलनाबुद्धीला, कुचाळीला कांहीं तरी खाद्य हवें असतें. चारचौघांनीं एकत्र बसून कुणाचीं तरी आंतलीं आंतडीं चघळल्याशिवाय कांहीं लोकांना चैनच पडत नाहीं. अशा लोकांना यमीचा उपयोग खचितच होत असे. बाकी सारें जग यमीला भकासच होतें. दुर्दैवांत सुदैव असें होतें कीं यमीच्या सासऱ्यानें तिची तरतूद बरी करून ठेवली होती. तिला रहातें घर होतें, घरांत भांडींकुंडीं होतीं, लहानसें परडें होतें, रानांत एक मळी होती. बापडा वांटेकरी पन्नास वर्षांचें नातें लक्षांत ठेवून यमीला तिचा वांटा न चुकतां पोंचता करी. सडकेकांठीं घर होतें. यमीच्या सोबतीसाठीं दोन बायामाणसांना रहायला जागा दिलेली होती. या आढ्याखालीं बारा वर्षांच्या वयाला विधवा झालेली यमी आतां तीस पसतीस वर्षांची झाली होती. आपलें असें तिला कोणीच नव्हतें. अडल्यापडल्याला त्या बाया उपयोगी पडत. यमी कशी आहे हें त्यांना पक्कें माहीत होतें. पण लोकांच्या तोंडाला हात कोण लावणार ? कोणी कांहीं म्हणालें तरी त्या गप्प बसत, किंवा फार झालें तर ‘ बाबा, असें कांहीं बोलूं नका,’ येवढें म्हणत.

गांवाला पाण्याची गैरसोय फार. उन्हाळ्याच्या दिवसांत गांवचा ओढा, ओढ्यांत खणलेले तात्पुरते हेळ, आणि बांधलेले कायमचे हेळ आटून जात असत; आणि दूरदूरच्या मळ्यांतल्या विहिरींचें पाणी आणावें लागे. लहान असो, मोठा असो, स्त्री असो, पुरुष असो, पाणी आणण्याचें काम सर्वांनाच पडत असे. ज्याच्या घरीं छकडे असत किंवा माकणी असत त्यांचें साधारणपणें ठीक असे. पण असे लोक शेंकडा पांचसुद्धां नसायचे. बाकीच्या सर्वांनीं पहाटे तीन वाजल्यापासून ऊन तापूं लागण्याच्या आंत पाणी आणलेंच पाहिजे. आपण ज्याला सध्यां 'क्यू 'लावणें किंवा बारी लावणें म्हणतों त्यालाच 'परवड' म्हणत असत. ही परवड पहाटेपासून लागत असे. या परवडीसाठीं माणसांना धांवाधांव करावी लागे. यमीहि त्या धांवपळींत शिरत असे. भीड, लाज, संकोच याला थाराच नव्हता. पण त्यांतल्या त्यांत उजेड चांगला पडला म्हणजेच यमी बाहेर पडे. कां तें सांगावयास हवें कां? बाहेर पडतांना प्रत्येकजण जितकीं भांडीं बरोबर घेतां येतील तितकीं घेण्याची शिकस्त करी; पण तीं भरून परत आणतांना होणारी प्रत्येकाची कसरत पाहाण्यासारखी असे. त्यांतहि स्त्रियांना नेहमींच्या संवयीमुळें अनेक भांडीं वाहून आणतां येत. एक घागर कमरेला घ्यावी; एक हंडा डोक्यावर घ्यावा; हंड्यावर एक तपेलें घ्यावें; उजव्या हातांत एक कळशी घ्यावी; आणि साधल्यास खांद्यावर चार पिळेहि टाकलेले असावे; असे देखावे किती तरी दिसत. माणसाचें शरीर संवयीनें कसलेंहि कष्ट करूं शकतें. पुरुष माणसें दोन खांद्यांवर दोरीच्या वेष्टनानें अडकाविलेल्या दोन घागरी घेऊन हिमतीनें डुलत घरीं येत, आणि स्त्रिया आतांच सांगितल्याप्रमाणें कमरेवर, डोईवर, हातांत अशीं लहानमोठीं भांडीं भरून आणीत. यमीहि चारचौघांप्रमाणें करी.

काम खरें, पण तें करतांना कांहीं माणसें विशेष देखणीं दिसतात. नाटकांत काम करतांना कोणीहि देखणें दिसतें! पण एरवींचीं कष्टाचीं कामें करतांनासुद्धां कोणी कोणी विशेष खुलून दिसतात. आणि त्यांच्याकडे इतरांचें लक्ष विशेष प्रकारें जातें. शरीराला व्यायाम झाल्यामुळें रक्ताचें अभिसरण

जोरानें होतें व तोंडहि जास्त तजेलदार दिसूं लागतें. पाणवठ्यावरून परत येतांना हा तजेला स्त्रियांच्या तोंडावर जास्त दिसत असला पाहिजे हें खरेंच आहे. यमीचें असेंच होई. अगोदरच बायकांच्याकडे पुरुषांची दृष्टि आपोआपच जाते; त्यांतहि ती स्त्री विशेष सुस्वरूप असली तर, टक लावून पाहण्याचा दोष येऊं न देतां, पुरुष तिच्याकडे पुन्हां पुन्हां पहातात. सहज पाहिल्यासारखें करतात; पण पहातात. ही स्त्री जर विधवा असली तर समंजस व संभावित माणसें, संस्कृतीचा भाग म्हणून, तिच्याकडे पहाणें गैर मानतात. पण जीं अशीं नसतात तीं मुर्दाडपणानें तिच्याकडे मुद्दामच पहातात. विधवा स्त्रीला कोणी धनी नाहीं, व म्हणून थोडया धिटाईनें तिच्याकडे पाहिलें तरी चालतें अशी एक निलाजरी भावना अनेकांच्या मनांत असते. यमीला या भावनेचा उपसर्ग एरवींसुद्धां फार होत असे.

तिनें तरी काय करावें ? तिनें काय आपल्या त्वचेला काळा रंग फासावयास हवा होता ? तिनें काय आपली काया म्लान व फिकट करावयास हवी होती ? तिनें काय आपले डोळे निस्तेज बनवून खोल घालवावयास हवे होते ? तिनें काय आपलें नाक चपटें करावयास हवें होतें ? तिनें काय करणें शक्य होतें बरें ? ती जशी होती तशी होती, व तशीच ती वागत असे. शिवाय ते दिवस फार वाईट होते. माणसें स्त्रियांना विद्रूप तर बनवीतच. पण त्यांना वस्त्रहि एकच ठेवीत. अर्थात् विधवा स्त्रिया चार चौघांत जात येत नसत. पण पाण्याउदकाला जाणें खेडेगांवच्या वसतीला प्राप्तच होतें. वस्त्राचा तोटकेपणा अशा स्थितींत स्त्रियांना जास्तच भासमान होई. त्यांतहि कमरेवर, डोईवर, कांखेंत, हातांत अशीं भांडीं असलीं म्हणजे वस्त्र वरचेवर सावरणेंहि अशक्य बनतें. यमीला या साऱ्या अडचणी सोसाव्या लागत. पण या तिच्या अडचणी त्या चटोरांच्या संधी बनत. आणि त्यांचा उपयोग ही मंडळी पुरता करून घेत. माझी आठवण चांगली आहे. वय लहान असलें तरी कांहीं कांहीं गोष्टींचा ठसा मनावर लवकर व खोल उमटतो. चटोरपणा संसर्गशील असतो. उमेदवार तरुण, मध्यमवयीन प्रापंचिक, आणि रंगेल थेरडे यांना एकाच माळेंत गोंवणारा खेडेगांवचा दोरा म्हणजे स्त्रियांची अभद्र निंदा हाच असे. एरवींच्या वेळीं ही निंदा लपतछपत चालत असे; पण त्या सर्वांना प्रियकर असलेला तो शिमगा नांवाचा सण आला म्हणजे

हे सारे वृद्धतरुण एका समान भूमिकेवर येत, आणि आपल्याच पोरीबाळींची आणि सुनालेकींची निरर्गल निंदा करीत. या निंदेचा बहुतेक वांटा निराश्रित विधवा स्त्रियांकडे जात असे हें काय सांगावयास हवें ? अश्राप निराश्रितांवर हल्ला करण्यांत यांना मोठीच वीरश्री चढे. यमीला हीं दुःखें वर्षानुवर्षे सहन करावीं लागत. तिचा पक्ष घेणारें कोणीहि नव्हतें.

यमी तरुण होती हा काय तिचा गुन्हा होता ? वयानुरूप तिच्या शरीराला विशेष डौल आला होता हा काय तिचा गुन्हा होता ! अव्यय राहिलेलें तिचें शरीर सकस आणि बांधेसूद दिसे याला यमी काय करणार ? त्यांतहि यमीच्या ठिकाणीं एक गुण – म्हणजे तो दुर्गुणच होता. ती अतिशय स्वच्छ असे, आणि भांडींकुंडीं आरशासारखीं ठेवी. तिच्या अंगाखांद्यावरचीं तांब्याचीं भांडीं आंतून बाहेरून लालभडक दिसत. तिला जर सौभाग्य असतें तर यमीच्या नवऱ्यानें तिची नित्य वाहवाच केली असती; आणि तिच्या स्वच्छतेची व सुगरणपणाची तारीफ आपल्या स्नेह्यांसोबत्यांपाशीं केली असती. पण यमी विधवा होती. तिला चांगलें म्हणावयास व तिचें कौतुक करावयासहि कोणी नव्हतें. तिच्या स्वच्छतेची तारीफ करण्याऐवजीं लोक त्यासाठींच तिची टवाळी करीत. दुर्दैवाची गोष्ट ही कीं, खुद्द इतर स्त्रियाच एकमेकींत कुजबुजत कीं, " हिला येवढं कुणाला दाखवायचं आहे ? काय करायचं आहे इतकें घासूनपुसून ? " पण नवरा नसला तरी माणसाची हौस जाते काय ? आपलें म्हणून कांहीं स्वत्व स्त्रीला नसतेंच कीं काय ? यमीला हा मुद्दा म्हणून माहीत नव्हता, पण तिला आपोआपच वाटे कीं भांडीं स्वच्छ ठेवावीं. पहाणारे मात्र तिच्या प्रत्येक कृत्याचा अर्थ भलता लावीत. पहाटे उठून पाण्याला जावें तर कदाचित् अब्रूला धोका, उशीरां जावें तर 'येवढं कशाला ठुमकत जायला पाहिजे सगळ्यांच्या पुढं!' हा माणसांचा शेरा. विशेष म्हणजे बायका तिला नांवें ठेवीत याचें मला आतां दुःख वाटतें. बायकांनीं बायकांचें दुःख ओळखलें तरी निम्में जग सुखी होईल. खरोखर यमीला कोणीही वाली नव्हता.

अभिलाषसुद्धां सूक्ष्म तऱ्हेचे असतात. जे लोक अलिप्तपणा दाखवितात, संस्कृतीचे वारसदार आपण आहों असें मानतात, मंजुळ निरागस वृत्ति दाखवितात, त्यांनासुद्धां विरळ स्वरूपाचाच कां होईना, पण अभिलाष

असतो. हा स्वाभाविकच असतो. त्यांची थोरवी हीच कीं त्यांनीं तो कह्यांत ठेवलेला असतो, आणि त्याची परिस्फुटता ते सौम्य लाघवानें होऊं देतात. आमच्या शाळेंत एक मास्तर होते; ते मोठे सभ्य, समंजस आणि सत्त्वभाव असत. शिकविण्यांत पटाईत, वाणीचे रसाळ, आणि वागणुकीला दिलदार असत. ओरडून शिकविण्याची चाल असे; कारण ओरडण्यानें मुलांना लवकर समजतें असा समज होता. उन्हाळ्याचे दिवस; ओरओरडून मास्तरांचा घसा कोरडा होई. वर्गातील मुलांत शाळेच्या आसपास कोण राहतो ? बाळक्या रहातो. "बाळक्या, पाणी घेऊन ये रे!" मास्तर म्हणत. पाय चटचटत बाळक्या घरीं जाई; पण पाणी कुठून आणायचें हें त्याला उमगलेलें असे. तांब्याभांडें लखलखीत असलें पाहिजे. तें बाळक्याच्या घरीं नसायचें. मग तो शेजारणीकडे जाई. "यमूताई, मास्तरना पाणी देतां का थोडं ?" बाळक्या यमीला म्हणे. यमी स्वच्छ तांब्याभांडें गार पाण्यानें भरून देई. मास्तरांचा अंतरात्मा संतुष्ट होई. बाळक्या पाणीभांडें कुठून आणतो हें सर्वांना माहीत झालेलें होतें. आणि हें माहीत झालेलें आहे हें मास्तरांना माहीत झालेलें असे, व यामुळेंच त्यांना एक गूढरस्थ आनंद आणि प्रौढी वाटे. कुचाळखोर लोकांना हाहि विषय खसखशीला उपयोगी पडे. तात्पर्य, यमीचा संबंध कुणाशींहि व कसाहि येवो, या लोकांच्या मनांत एक वासना सदैव जागृत असे.

यमी स्वतः मात्र अगदीं निकोप मनाची स्त्री होती. लोक काय कुजबुजतात, कोणत्या गोष्टीचे कोणते अर्थ करतात, कुणाच्या नांवाशीं आपला संबंध लावतात हें तिला सारें उमगत असे. आणि एखाद्या वेळीं नच उमगलें तर शिमग्याच्या दिवसांत तिला तें सारें कळत असे, पण ती तशी खबरदार बाई होती. असलीं दुखणीं अंगावरच काढावीं लागतात हें तिनें ओळखलें होतें. म्हणून तिनें कोणासंबंधीं तक्रार म्हणून केली नाहीं; ती कुणाला वाईट वांकडें बोलली नाहीं, कीं तिनें कुणाशीं रदबदली केली नाहीं. तिला फारशा मैत्रिणीहि नव्हत्या. त्या बिऱ्हाडकरू म्हाताऱ्या या तिच्या मैत्रिणी. ती एकदां बाहेर पडली म्हणजे सरळ दृष्टीनें ओढ्यावर जायची, भांडींबिंडीं घासून, बारींत उभी राहून पाणी घेऊन यायची. तिनें इकडे पाहिलें नाहीं कीं तिकडे पाहिलें नाहीं. सारें कुत्सित जग तिच्या-

कडे निलाजरेपणानें किंवा झाकूनपाकून पाही. पण यमीनें त्या जगांतील दहा पुरुष माणसें तरी पाहिलीं होतीं कीं नाहीं कुणास ठाऊक ?

यमी तशी तुसड होती. "बाई मोठ्या प्रेमळ आहेत" ही विधवा स्त्रियांची स्तुति विशेषशी चांगली नसते. स्त्रियांचें मन मृदु व प्रेमळ असतें;–म्हणजे असावें अशी माणसांची अपेक्षा असते. पण स्वसंरक्षणाचीं जीं साधनें सृष्टीनें स्त्रियांना पुरविलेलीं असतात त्यांत तुसडेपणा व कांहींसा तामसीपणा हें एक जर असलें तर समाजांत त्या सुरक्षित रहाण्याचा बळकट संभव असतो. पण जर कां हें साधन त्यांच्या शस्त्रागारांत नसलें व त्या नुसत्याच मृदु आणि प्रेमळ असल्या,–तर तें लक्षण कांहीं बरें नव्हे. त्यांतहि त्या जर कां तरुण विधवा असल्या तर त्यांना संकटच उत्पन्न होईल. यमीला सृष्टीनें हें साधन चांगलें दिलेलें होतें. ती तुसड होती. आणि प्रसंगविशेषीं करारीहि वाटे. यामुळें लुलपुतु करणारे, उगाच भोंवतीं भोंवतीं करून मंजुळ स्मिताचा गुंजारव भोगणारे, किंवा उघड लाळ घोटणारे, किंवा शेपट्या हालविणारे यांची मात्राच तिच्यापुढें चालत नसे. ही यमी अशी रोकडी बाई होती. तिच्या या गुणांचें कौतुक नवरा असता तर हजारदां झालें असतें, पण आतां तें मातीमोलच होऊन गेलें होतें. हें उग्रपणाचें कवच मात्र तिनें अंगावर बळकट घातलें होतें.

अशा अस्ताप स्त्रीला तेव्हांचे लोक काय बोलत आणि कसें छळीत याचें स्मरण झालें म्हणजे आतां इतक्या वर्षांनीं माझ्या अंगावर शहारे येतात. तिचें तें एकवस्त्र आणि उग्र असहाय ध्यान मला चांगलें स्मरतें. स्त्रीला असें विद्रूप करूं नये आणि एकवस्त्रा बनवूं नये, हें सांगतां सांगतां आगरकर नांवाचा उमदा जीव अक्षरशः दम्यानें थकून मरून गेला. आतां आपली स्त्रीजात त्या शापांतून मुक्त झाल्यासारखी झाली आहे. अजूनहि चैतन्यमंदिरांतून कथा संपून तेथला तो रक्तवस्त्र व एकवस्त्र स्त्रीसमुदाय बाहेर पडलेला एखाद्या वेळीं दिसला म्हणजे माझ्या मनांत कालवाकालव होते. दुःखानें मनाचा कांदा उन्मळून येतो. माझी आई अठ्ठावन्न वर्षेपर्यंत मी याच वेषांत पहात होतों. यामुळें तर माझ्या मनांत त्या संन्यासवेषाची विलक्षण बोचक अढी बसलेली आहे. यमी याच वेषानें वागत असे. मला अजून कष्ट होतात कीं, मी ज्या शेजारांत आणि संगतींत वागत असें, व

ज्यांतील माणसें चांगलीं संभावित, मुलाबाळांचीं पोशिंदीं, आणि लेकी-सुना असलेलीं, त्या शेजारांत आणि संगतींतसुद्धां यमीची कुचाळी चालत असे.

एक भिकोबा नांवाचा माणूस होता. तो एरवीं मोठा गमत्या होता. आणि सर्वांना हवाहवासा वाटे. पण हीं असलीं बायकांचीं बोलणीं निघालीं म्हणजे तो काय काय बोलेल, आणि आवाजांत छद्म आणून कुणाच्या अब्रूला दंश करील याचा नेम नसे. एरवीं हे सारे लोक चांगले होते. ते ' संस्कृति ' वगैरे शब्दहि उच्चारीत असत; आणि पूजाअर्चा, हव्यकव्य, व्रतवैकल्य यांत यथाकाळ मग्न असत. त्यांना आपल्या धर्माचाराचें मोठेंच समाधान वाटे. पण हा मुद्दा आला म्हणजे खाजगतांत तरी त्यांचें तें संभावितपणें बावचळत असे, आणि ते यमीला फिदीफिदी हंसत असत. भिकोबाची जिभली तर सैल सुटे, आणि त्या अस्राप स्त्रीची तो विटंबना करी. यमीचें खरें दुर्दैव हें होतें. वाह्यात लोक हंसले तर त्यानें यमीला कष्ट होतच, पण आमच्या त्या शेजारांतलीं संभावित व वाडिलधारीं माणसें आपल्याविषयीं वाईट वांकडें बोलतात याचें तिला फार दुःख होई.

एकदां असें झालें कीं, आमच्या गांवांत प्लेग झाला. सगळीकडे होई तसा आमच्या येथें झाला. गांव भेदरून गेला. कुणाचें डोकें दुखूं लागलें, कुणाच्या कमरेंत शिळका मारूं लागल्या, कीं सर्वांच्या पोटांत धस्स होई. गोळा उठला कीं तें माणूस दगावलें म्हणून समजावें, असा प्रकार सुरू झाला. माणसें एकमेकांनाच भिऊं लागलीं, व आजाऱ्यापासून दूर पळूं लागलीं. दैववादी होते ते ' जें होईल तें होईल ' म्हणून घरींच राहिले. ज्यांना घरच्या ठेवरेवीचा लोभ सुटेना ते घरींच राहिले. पण हे सारे मरून गेले. पहिल्यानें त्यांच्या घरांतील उंदीर मरून गेले, आणि त्यांच्या मागोमाग हे गेले. जे रानांत पळाले, परगांवला गेले, ते जिवंत राहिले, ' भितरे ' म्हणवून घेऊन पण त्यांनीं जीव वांचाविला. आम्ही बरींच बिऱ्हाडें रानांत पळालों, व निदान प्लेगापासून तरी त्यामुळें बचावलों. चांगलीं चाळीस पंचेचाळीस माणसें आम्ही, पृथक् पृथक् पण एका आवारांत रहात होतों. मोकळी रानची हवा, विहिरीचें स्वच्छ पाणी, शाळा बंद, सुरपारंब्या खेळायला सडकेकांठचीं झाडें, असा मोठा आनंद होता. काळजी वडील

माणसांना होती; आम्हांला नव्हती. चोरांचा उपद्रव बराच होता. म्हणून जिवट माणसांनीं आपल्या जिनसापानसा मुरंब्याच्या बरणींत, पाण्याच्या तपेल्यांत अशा लपवून ठेवल्या होत्या. मोत्यांचे दागिने कांहीं जणांनीं कडब्याच्या कुडांत ठेवले होते !

आम्ही जसे रानांत गेलों तसे अनेक लोक गेले. कोणी कितीहि उपेक्षित असलें तरी ज्याचा जीव त्याला अप्रूपच असतो. अर्थात् असे उपेक्षित व क्षुद्र दिसणारे लोकसुद्धां रानावनांत जाऊन पडले होते. गांवांतील लोक जरी यमीला उणीं उत्तरें करीत, आणि तिला अवहेलनेनें वागवीत तरी याच लोकांची तिला सोबत असे. गांव बाहेर पडतांच यमीलाहि बाहेर पडणें प्राप्त झालें. सत्त्वभावाच्या वेष्टनांत ठेवलेला सौम्य अभिलाष तो बाळगणाराला जसा उपभोगावयास सांपडतो, तसा त्या अभिलाषाकडे काणाडोळा करून, सत्त्वभावाचा उपयोग करून घ्यावा असें अभिलषणीया स्त्रीला वाटणें स्वाभाविक असतें! त्या आश्रयाचा उपयोग करून घेण्यांत कांहीं धोका नसतो हें ओळखून आपण सूक्ष्म कां होईना पण अभिलाषाची वस्तु आहों या जाणीवेकडे दुर्लक्ष करणें सोयीचें असतें. मास्तर कोठें रहावयास जाणार आहेत याची चवकशी यमीनें करविली, व आपण जणुं कांहीं त्या गांवचे नव्हे अशा निर्लेपपणानें यमीनें आपली झोपडी त्यांच्या झोपडीपासून पुरेशी लांब पण अवश्य तितकी जवळ घातली. तिनें त्या म्हाताऱ्या बायाहि आपल्या सोबतीस घेतल्या. यमीचें झोपडीचें सामान जेव्हां आसपास आल्याचें मास्तरनीं पाहिलें तेव्हां मास्तरना एक खोल मानसिक समाधान व थोडीशी आढ्यता वाटली. ‘ कुणाचें सामान ? ’ मास्तरनीं एकदां उगाचच पृच्छा केली. घरीं आल्यावर “ इथें पलीकडे यमी रहायला येते आहे वाटतें ” असें ते आपल्या ‘ मंडळींना ’ केवळ माहिती देण्यासाठीं म्हणूनच जणुं कांहीं म्हणाले. मास्तरीणकाकू म्हणाल्या, ‘ इश्य ! ती का येतीय् इथं ? ”

बरेच दिवस गेले. रानची हवा पीत जो तो आपल्या वस्तीवर काळ कंठीत होता. झोपड्यावर पांझरण कडब्याचें, झोपड्यांच्या भिंती कडब्याच्या, कूड कडब्याचे—म्हणजे सरपणाच्या पोटांतच आम्ही रहात होतो ! सरपणाला आपल्या धर्माची आठवण झाली आणि तें पेटलें ! खेडेगांवचे रागलोभ

मोठे भडक असतात. आम्ही ज्यांच्या आश्रयानें त्या ठिकाणीं रहावयास गेलों होतों त्यांच्या वाइटावर कांहीं तालेवार लोक होते, आणि कसा ना कसा सूड उगवण्याच्या विचारांत ते होते. त्यांना ही संधि आयतीच लाभली. एके दिवशीं पहाटे चाराच्या बेताला त्यांनीं जळजळीत गोवऱ्या मागच्या अंगानें आमच्या झोपड्यावर पांचसहा ठिकाणीं ठेवून दिल्या. हां हां म्हणतां आग भडकली. सुदैवानें वर्दी वेळेवर लागली, आणि तसल्या त्या सरपणाच्या गराड्यांतून सगळीं माणसें बाहेर काढतां आलीं. बाकी कांहींहि शिल्लक राहिलें नाहीं. अंगावरच्या एका वस्त्राशिवाय बाकी एकूण एक वस्तु भस्मसात् झाल्या.

पहाटेच्या वेळच्या त्या धडधडीचें चित्र माझ्या डोळ्यांपुढें आज सत्तावन वर्षांनंतरहि कायम आहे. सकाळ झाली आणि सगळ्या आवारभर राखेचे ढीग दिसूं लागले. मग मात्र पुरुषांनासुद्धां दम निघेना. बायकामुलें तर आधींपासूनच रडतभेकत होतीं. पण सर्व संसाराची राखोंडी सकाळच्या उजेडांत दिसूं लागतांच पुरुषांनींहि धीर सोडला, आणि ते मुसमुसून रडूं लागले. समोर प्रपंचाची विझलेली चिता, आणि बायका-पुरुष ढसढसा रडत असलेले — करुण प्रसंग वैऱ्यावरहि येऊं नये. शेवटीं कांहीं हाताशीं लागतें का म्हणून पुरुष माणसें राख चाळूं लागलीं, आणि बायका दामट्या झालेलीं भांडीं बाजूस काढू लागल्या. आसपासच्या रानांत वसती नव्हती. कोणी आलें नाहीं आणि गेलें नाहीं. ऊन तावूं लागलें. आगीच्या राखेचा ताप शिल्लकच होता. विहिरीवर व ओढ्यापलीकडे जाऊन माणसें सर्व विधि उरकून आलीं. पोरें खाण्यासाठीं ओरडूं लागलीं. देण्यासारखें कांहीं नव्हतें. धान्यांची जळकी पेंड झाली होती. स्वच्छ भांडें उरलें नव्हतें; माणसांच्या अंगाची उभारी नष्ट झाली होती. इतक्यांत दूधवाले आले. सर्वांना हायसें झालें. त्यांच्याच भांड्यांत पोरें दूध प्यायलीं. मोठ्या माणसांनींहि समजूत घालून एकमेकांना प्यावयास दिलें. ते दूधवाले खिन्न होऊन गेले. रडूं लागले. आणखी दूध आणतों म्हणाले. पण अन्नावांचून चालणार नव्हतें. ते परत गेले आणि त्यांच्याबरोबर आगीची वार्ताहि चोहींकडे गेली.

राखेचे ढिगारे चाळण्याचें काम कांहींनीं चालू केलें. कारण वितळून गेलेलें सोनेंनाणें त्यांत सांपडण्यासारखें होतें. इकडे हें काम चालू होत आहे तों गांवांत जाऊन कांहीं तरी घेऊन आलें पाहिजे असें ठरलें. पलीकडच्या वाडींत ही वार्ता गेली, आणि कांहीं दिलदार आणि संभावित वांटेकरी मंडळी सामानसुमान घेऊन येत आहेत असें कळलें. इतक्यांत डाव्या हाताला पसरलेल्या सपाट माळाच्या त्या टोंकाला कोणी तरी दिसतेंसें वाटूं लागलें. माळ कुसळांनीं आणि रानझाडोऱ्यानें भरलेला होता. पण कोणी तरी येत आहे असें दिसूं लागलें. आगीची वार्ता दूधवाल्यांच्या बरोबर पसरली होती. न्याहाळून पहातां ही आकृति बाईमाणसाची आहे असें दिसूं लागलें. बाईचा वेष तांबडा असून तिच्या डोक्यावर बरेंच सामानसुमान दिसत होतें. तिच्या काखेला कसला तरी बोजा होता, आणि हातांत दोन तीन शिंकाळ्या होत्या. दहा साडेदहाच्या उन्हाच्या तिरपींत, कुसळांतून आणि झाडोऱ्यांतून एकटीच ही कोण येत आहे म्हणून माणसें पुढें होऊन पाहूं लागलीं. ती थेट आमच्याच रोखानें येत आहे हें पाहून माणसांची उत्सुकता जास्त वाढली. कांहीं बायकामाणसें पुढें झालीं.

शेवटीं गंगाकाकू गदगदून ओरडल्या, "अरे चंडाळानो, तिला तुम्ही नांवें ठेवतां, पण तीच तुमच्या संकटाला धावली बरें!" सारीं टकमकां पाहूं लागलीं. येतां येतां यमी त्या राखोडीपाशीं येऊन ठेपली. कोणसें पुढें झालें, आणि त्यानें तिच्या डोक्यावरचें खालीं घेतलें. तिनें शिंकाळ्या–बोचकें खालीं ठेवलें आणि ती सुन्न होऊन इकडे तिकडे, पाहूं लागली. कमरेंत लचक येऊन यमी खालीं बसली आणि रडूं लागली. ती मुसमुसून म्हणाली, "ऐकलं बाई, – कीं तुमच्या छपरांना आग लागली. प्रळय झाला. आतां काय करावं? तुम्ही सारीं खुशाल आहां ना? गंगाकाकू, मुलं सारीं बाहेर काढलींत ना?" तिनें दोन तीन मुलें पोटाशीं धरलीं आणि ती रडूं लागली. तिनें आणलेल्या सामानाचीं भांडीं सावित्रीबाईनीं निरनिराळीं केलीं. दीडदोन पायली तांदूळ, झुणक्याचें पीठ, भाकरीचें पीठ, तिखटमिठाच्या पुड्या, शिंकाळींत तेल, तूप, दहीं, मुलांना दूध, इतके सारे पदार्थ यमीनें डोंबलावर आणले होतें. यमी घामाघूम झाली होती. पण हा भयानक देखावा पाहून तिचे

श्रम मावळले आणि तिनें कंबर बांधली. इकडे तिकडे पाहून तिनें तीन धोंडे मांडले, आणि बरोबर आणलेल्या पातेल्यांत भाताचें आधण ठेवलें. आमच्या वसतींतल्या बायका तिला म्हणाल्या, " यमूताई, आतां तुम्ही नका बरं त्रास करून घेऊं. आम्ही सारं करतों. तुमचे उपकार आम्हीं किती मानावे ? तुम्ही केवढ्या थोर ! तुम्ही आम्हांला लाजविलंत बरं ! तुम्ही आमच्या नात्याच्या कां गोताच्या ! पण नुसतं आगीचं ऐकून तुम्ही धांवत आलां ! अन् हें ओझें डोक्यावर ! यमूताई, बसा त्या वडाखालीं जाऊन; भातापिठलं होतांच तुम्हांला बोलावितों. "

" काय केलंय मीं ह्यांत काकू ! " यमी म्हणाली, " तुमच्यावर प्रसंग ओढवला तर यायला नको का ? मला बघा ऐकल्यापासून चैन पडेना. अहो कांहीं माणुसकी आहे कीं नाहीं ? म्हटलं देवा, हीं माणसं पोरंबाळं आतां काय करतील ! काय खातील ! म्हणून हें घेऊन आलें. अहो माझ्यावर प्रसंग आला असता तर तुम्ही नसतां का आलां ? मी आतां जातें. तुम्ही करून खा. "

" नका नका, यमूताई, तुम्ही जाऊं नका. " गंगाकाकू म्हणाल्या. यमी म्हणाली, " असं कसं म्हणतां, काकू ? माझी अजून पूजा व्हायची आहे. पण अंग धुवून दांडीवरचं लुगडं वेढून घेतलें, अन् म्हटलं पाहिल्यानंदां हें पोचवावं आणि मग पूजा करावी. "

इतकें बोलून यमी झटकन् उठली. पत्रावळीवर रिकामीं झालेलीं भांडीं एकांत एक घालून तिनें तीं डोईवर घेतलीं, आणि आमच्या बायका आग्रह करीत असतां ती त्या उन्हाच्या तिरपींत, कुसळाच्या आणि झाडोऱ्याच्या माळावरून अनवाणी आपल्या झोपडीकडे जलदीनें निघाली. अजून तिची पूजा-अर्चा व्हावयाची होती.

ते सारे फिदीफिदी हंसणारे पुरुष भातझुणका होतांच जेवायला बसले. त्यांनीं डराडर ढेकरा दिल्या. गंगाकाकू संतापलेल्याच होत्या. पंगतींत बसलेल्या भिकोबाकडे पाहून, हात ओवाळून, त्या त्वेषानें म्हणाल्या, " कांहीं लाज बाळगा अन् तोंड आवरून बोलत जा. मेल्यांनो ! माणुसकी यमीला आहे, तुम्हांला नाहीं ! "

---